



( सर्जेराव घाडगा व त्रिंबकजी डेंगळा यांचीं चरित्रें )

विनायक गंगाधर लेले



प्रस्तावना लेखक

इतिहाससंशोधक दत्तोपंत आपटे

प्रथमावृत्ति: जानेवारी १९३५



किंमत १ रुपया

# तिसरें पुस्तक

'वळवांचे पाऊस' व 'पुनर्भेट भाग २ रा' हीं दोन पुस्तकें काढल्यानंतर 'दुर्दैवी मोहरे'—सर्जेराव घाडगा व त्रिंबकजी डेंगळा यांची ऐतिहासिक चरित्रें—आज प्रसिद्ध करीत आहे. चरित्रांचे लेखक व माझे स्नेही श्री. विनायक गंगाधर लेले यांनीं हें पुस्तक मला प्रकाशनाला दिल्यामुळें चालू जीवनांतून कांहीं काल बाजूला होण्याकरितां आपण जसें सिंहगड, रायगड वगैरे जुने किल्ले पाहून येतों त्याप्रमाणें हीं ऐतिहासिक चरित्रें मला व वाचकांना रुचिपालट व हवापालट यांस उपयोगी पडतील असें वाटतें.

हें झालें श्री. लेले यांबद्दल. ते माझे स्नेहीच असल्यामुळें अशी संधि ते मला नेहमींच देतील. पण सदर पुस्तकास प्रस्तावना लिहून देऊन सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. दत्तोपंत आपटे यांनीं या पुस्तकाला जें महत्त्व आणलें आहे त्याचा येथें प्रामुख्यानें उल्लेख करतों.

नम्र साहित्यसेवक

यशवंत गोपाळ जोशी

# अनुक्रमणिका



## सर्जेराव घाडगा



## त्रिंबकजी डेंगळा





## दोन शब्द

'शिवशाहीचा अस्त' लिहीत असतांना पेशवाईचा शेवट कसा झाला याचा तपास करूं लागलों तेव्हां खरेशास्त्र्यांचे नाना फडणिसांचें चरित्र वाचण्यांत आलें. त्यांत सर्जेराव घाडग्यानें केलेला पुण्याचा छळ वाचून मी चकित झालों व त्याचें साद्यंत चरित्र लिहावें असें मनानें घेतलें व तें लिहून क्रमशः 'यशवंत'मध्यें प्रसिद्ध केलें. सदर चरित्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याबद्दल माझ्या बऱ्याच स्नेह्यांनीं सुचविल्यामुळें त्याच्या जोडीस त्रिंबकजी डेंगळ्याचें चरित्र लिहून तें आज वाचकांच्या हातीं देतांना मनाला आनंद वाटत आहे.

माझे स्नेही रा. यशवंत गोपाळ जोशी यांनीं या कामीं बरीच चिकाटी व निकड लाविल्यामुळें माझ्या हातून हें लिखाण झालें, याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे. तसेंच माझे स्नेही रा. रा. शंकरराव जोशी ( वाई-कर ) यांनीं या कामीं मला आपुलकीनें मदत केली व वेळोवेळीं मार्मिक सूचना केल्या त्यांबद्दल त्यांचाहि मी फार आभारी आहे. याशिवाय माझे स्नेही रा. रा. माधवराव बापट, रा. रा. माधवराव सावरकर, रा. रा. बाबासाहेब काळे व माझे मावस बंधु रा. रा. सदाशिवराव बापट ( शिक्षक गोखले एजुकेशन सोसायटी ) यांनीं मला जी मदत केली तिचा साभार उल्लेख करणें जरूर आहे.

वि. गं. लेले

## आधार-ग्रंथ

१. नाना फडणिसाचें चरित्र, (खरेशास्त्री)
२. बायजाबाई शिंदे-चरित्र.
३. ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग १०.
४. मराठी दप्तर, रुमाल २.
५. लेखनालंकार.
६. बडोद्याचे राज्यकर्ते.
७. ज्ञानकोश, १३ व १५.
८. ग्रँट डफचा इतिहास.
९. मराठे व इंग्रज.
१०. त्रैमासिक भा. इ. मं. (स. १९२५ ते १९२६.)
११. पेशवे दप्तर, भाग ४१.
१२. रियासत (उत्तर-विभाग ३).
१३. फलटणकरांचे दप्तरांतील अखबारांचे सारांश, (शंकरराव जोशी) भा. इ. मं. सं. संग्रह.

(रियासत उत्तर वि. ३ चा मला विशेष उपयोग झाला त्याबद्दल रियासतकार रावसाहेब सरदेसाई यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.)

---



---

# प्रस्तावना



सर्जेराव घाडगा व त्रिंबकजी डेंगळे या दोन पुरुषांची गणना इतिहासकार खलपुरुषांत किंवा कलिपुरुषांत करतात व यांच्या खटाटोपानें मराठी राज्याची घडी सावरण्याऐवजीं एकसारखी बिघडतच गेली त्या अर्थीं मराठी राज्य बुडविण्याच्या जबाबदारींत बाजीरावाबरोबर या दोघांनाहि वाटेकरी समजलें पाहिजे असा त्यांनीं निर्णय दिला आहे. रा. लेले यांना देखील वरील निर्णय मान्य आहे. पण ही मान्यता देतांना त्यांनीं या दोघांचा उल्लेख " दुर्दैवी मोहरे " या शब्दांनीं केला असून या शब्दांतच त्यांच्या पुस्तकांतील वैशिष्ट्य सांठविलेलें आहे. हें वैशिष्ट्य सांगण्यापूर्वी दोघांच्या चरित्राची रूपरेषा नमूद केली पाहिजे. सर्जेराव हा मूळचा कागलचा राहणारा. तेथून एका घोड्यानिशीं घर सोडून तो निघाला आणि परशुरामभाऊच्या पदरीं शिलेदारी पत्करून त्यानें भाऊंचा चांगला विश्वास संपादन केला. पुढें इ. स. १७७६ मध्यें नाना फडणिसानें भाऊंकडून जी विश्वासूक मंडळी मागून घेतली त्यांत सर्जेराव होता. तेव्हांपासून नानाजवळ तो १८ वर्षें राहिला. इ. स. १७९६ मध्यें नाना पुण्याहून सातार्‍यास गेला तेव्हां सर्जेराव हा दौलतराव शिंद्याच्या नोकरींत गेला. येथून सर्जेरावाला स्वतंत्रपणें राजकारणांत डोकें घालावें लागलें. बाजीराव व दौलतराव या दोघांनाहि नाना फडणिसाचें महत्त्व कमी करण्याची इच्छा असल्यामुळें सर्जेरावानें नानाविरुद्ध गुप्त कारस्थानें केलीं. त्यांत यश मिळून त्यानें नानास कैद केलें व पुण्यांत अनन्वित जुलूम करून पैसे उकळले शेवटीं सर्जेरावाच्या वागणुकीचा बाजीरावालाहि वीट आला. पण सर्जेरावानें आपली मुलगी दौलतरावास दिलेली असल्यामुळें दौलतराव शिंद्याच्या जबरदस्त लष्कराचें पाठबळ त्याला होतें. तेव्हां त्याच्याविरुद्ध कारस्थान लढविण्याचा धीर कोणास होईना. पण सर्जेरावानें आपलें हत्यार महादजी शिंद्याच्या बायकांवर धरल्यामुळें लष्कर उलटलें. या सुमारास नानाची कैदेंतून सुटका होऊन पुढें तो लौकरच मरण पावला. तेव्हां दौलतरावाची पुणें दरबारांत राहण्याची आवश्यकता संपली; आणि तो उत्तरेस निघून गेला व पुढें सर्जेरावहि गेला. पण या सर्व गुंतागुंतीच्या राजकारणामुळें जी चाळवाचाळव झाली तिचें पर्यवसान होळकरानें पुण्यावर चाल करण्यांत होऊन शेवटीं बाजीराव पळून इंग्रजाच्या आश्रयास गेला; आणि नंतर वसईचा तह करून

त्याला पुण्यांत येणें भाग पडलें. सर्जेराव उत्तरेस गेल्यानंतर शिंदे होळकरांची जूट करून इंग्रजास शह देण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण त्यांतहि त्याला यश आलें नाहीं. एवढेंच नव्हे तर अधिकारभ्रष्ट व्हावें लागलें. शेवटीं दौलतराव व सर्जेराव यांच्यांत वितुष्ट येऊन सर्जेराव इ. स. १८०९ मध्यें मारला गेला.

या हकीकतीवरून सर्जेराव हा हस्तक या नात्यानें उपयोगी पडण्याजोगा माणूस होता; पण एका पक्षाचा पुढारी म्हणून त्याला राजकारणांत वावरावें लागलें तेव्हां त्याला सर्वत्र अपयश आलें. हीच गोष्ट उपमेनें सांगावयाची झाल्यास असें म्हणतां येईल कीं, सर्जेराव हें एक मोहरें होतें व या मोहऱ्याचा उपयोग करणारा योजक खेळाडू अस्तित्वात असता तर या मोहऱ्याच्या हातून नांव घेण्याजोगें काम झालें असतें. पण तसा योग नव्हता हें त्या मोहऱ्याचें दुर्दैव !

त्रिंबकजी डेंगळा हा निमगांव-जावळीचा पाटील म्हणजे खेड्यांतलाच राहणारा, तो बाजीरावाजवळ प्रथम हुजऱ्याचें काम करीत असे. पुढें होळकर पुण्यावर चालून आला तेव्हां बाजीरावास महाडास पळून जावें लागलें त्या प्रसंगीं त्रिंबकजीनें बाजीरावाचीं कांहीं महत्त्वाचीं कामें मोठ्या शिताफीनें पार पाडलीं. यानंतरच्या अनेक व्यवहारांत बाजीरावाच्या मनांतला हेतु ओळखून तो सिद्धीस नेण्यासाठीं मनोभावानें झटण्याचा गुण त्रिंबकजीच्या ठिकाणीं होता; पण बाजीरावाचे बेत सिद्धीस जाणें शक्य आहे कीं नाहीं आणि या प्रयत्नामुळें डाव उलट अंगलट येईल कीं काय हें ठरविण्याची ऐपत त्रिंबकजीच्या बुद्धींत नव्हती. यामुळें कारभारी या नात्यानें त्यानें टाकलेले सर्व डाव बाजीरावाभोंवतीं इंग्रजी सत्तेचे पाश आवळून बसण्यासच कारणीभूत झाले. अर्थात् मोहऱ्याची योग्यता असलेल्या माणसावर सर्व राज्याच्या कारभाराची जबाबदारी उचलण्याचा प्रसंग आला व त्यांत त्याला अपयश आलें. कित्येकांनीं या प्रकरणाच्या विवेचनांत 'दुर्दैव' हा शब्द न घालतां आपसांतली यादवी व हुजऱ्यानें कारभारी बनणें वगैरे प्रकारांमुळें राज्य गेलें असें म्हटलें आहे; पण या शब्दांनीं मनाचें समाधान होत नाहीं. कारण ज्या वेळीं मराठी राज्याची चढती कमान होती त्या वेळीं देखील प्रतिनिधि-पेशवे यांतील चुरस अस्तित्वांत होतीच; आणि राणोजी शिंद्यासारख्या हुजऱ्यास सरदारी देण्यांत आलीच होती. त्याच-

प्रमाणें ज्या इंग्रजांनीं दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं मराठी मुत्सद्द्यांवर मात केली त्या इंग्रजाच्या देशांत या वेळीं पक्षभेदाच्या पद्धतीवर राज्ययंत्र चालविण्याचा प्रघात रूढ होता व तेथें कोणाहि गोरगरिबाचा मुलगा गुणाच्या जोरावर मुख्य प्रधानाच्या हुद्द्यावर पोंचूं शकत होता. यावरून राजकारणांत पक्षभेद असणें व त्यादाचा फर्जी होण्यास अवसर मिळणें हें राजकीय दुर्दैवाचें लक्षण समजतां येणार नाहीं. पण पक्षभेदाच्या भावनेचा अतिरेक होऊन शत्रूला राज्य गिळंकृत करण्यास अवसर मिळणें ही अनिष्ट गोष्ट रावबाजीच्या वेळीं घडली. पहिल्या बाजीरावाच्या वेळीं तसा प्रकार झाला नाहीं; याचें कारण शाहू हा मराठी राज्याचा मालक, पेशवे व प्रतिनिधि या पक्षांना आवरून धरण्यास समर्थ होता; आणि राज्यांतील कर्तबगार लोकांचा उपयोग आपसांतल्या भांडणांत न करतां दूरवरच्या शत्रूवर चढाई करण्याच्या कामीं करण्यास बाजीराव समर्थ होता. यामुळें एकदोन अपवाद सोडल्यास पक्षभेद त्या वेळीं विकोपास गेला नाहीं; आणि मराठी साम्राज्य वाढत्या स्थितींत राहिलें. रावबाजीच्या वेळीं परिस्थिति निराळी होती. शाहूची आवरशक्ति रावबाजीच्या ठिकाणीं नव्हती यामुळें नाना व दौलतराव यांच्यामधील चुरशीला प्राणघातक स्वरूप देण्यास सर्जेरावास सवड मिळाली; पण इंग्रजांविरुद्ध एकी करण्याचे विचार सर्जेरावानें व डेंगळ्यानें केले तेव्हां इंग्रज इतके जबरदस्त बनले होते कीं, अशी एकी करूं पाहणाऱ्यालाच रावबाजीच्या हातून इंग्रजांनीं कैद करविलें. असा हा जबरदस्ताचा न्याय होता. तात्पर्य शाहू व बाजीराव हे दोघेहि आपापलीं कामें करण्यास समर्थ होत आणि निजाम किंवा दिल्लीकर हे शत्रु दूर अंतरावर असून त्यांच्यावर शह बसविणें शक्य झालें. रावबाजी व त्रिंबकजी यांना इंग्रजांशीं झगडतांना यांतलें कांहींच आनुकूल्य नव्हतें.

रावबाजीच्या नाकर्तेपणाचें साम्य इंग्लंडांतील चौथ्या जॉर्जशीं दाखवितां येईल. आणि इंग्लंडांतील राजकारण पक्षभेदाच्या पद्धतीवर या वेळीं चाललें होतें असेंहि म्हणतां येईल. पण या पक्षभेदाची चुरस पार्लमेंटमध्यें शाब्दिक खल करण्यांत दिसून येत असे; मतभेद होतांच एका पक्षानें दुसऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यास कैद करणें अगर जिवानिशीं मारणें हा प्रघात तेथें चालू नव्हता. राज्याची मालकी राजाची नसून राजकीय धोरणाचा निर्णय लोकमतानें करावयाचा ही प्रथा सुरू झाल्यामुळें व्यापक राजकारणाचीं तत्त्वें व

राजकीय स्वार्थ साधण्यास लागणारी मुत्सद्देगिरीची भाषा इंग्लंडांतील बहुजनसमाजाच्या परिचयाची झाली होती. यामुळें कॉर्नवॉलिस जाऊन वेल्स्ली आला आणि क्लोज जाऊन एल्फिन्स्टन आला तरी इंग्लंडचा स्वार्थ साधण्यासाठीं त्यांनीं योजलेल्या भाषेंत राजकारणाची एकसूत्रता राहूं शकत होती. पार्लमेंटांतील वादविवाद हे राजकीय शिक्षण देणारे आखाडे असल्यामुळें इंग्रजांना मुत्सद्देगिरीच्या व्यापक स्वार्थाची तालीम मिळत होती. तसा मुत्सद्देगिरीचा आखाडा मराठी राज्यांत नव्हता. लष्करी शिक्षणासाठीं प्रत्यक्ष युद्धाचे प्रसंग हे आखाड्यासारखे उपयोगी पडत. पण राजकीय तत्त्वांचें प्रतिपादन करणारा आखाडा मराठी राज्यांत नसल्यामुळें मुत्सद्देगिरीची परंपरा चालणें केवळ योगायोगाची गोष्ट होऊन बसली. तात्पर्य राज्याचीं सूत्रें भलत्या माणसाच्या हातीं जाऊं नयेत व शेंकडों लोकांच्या पारखीस उतरलेल्या मुत्सद्द्यांच्या हातींच तीं आलटूनपालटून यावीं अशी योजना इंग्लंडांत होती. यामुळें राजाचें नाकर्तेपण राजकीय परिस्थिति बिघडण्यास कारणीभूत झालें नाहीं. किंवा लोकांना न पटणारा कारभारी सूत्रचालक झाला नाहीं. पण मराठी राज्यांत राज्य हें राजाच्या मालकीचें ही समजूत बद्धमूल असल्यामुळें बाजीरावाचें नाकर्तेपण एकंदर राज्यास बाधक होऊं शकलें आणि त्यानेंच या राज्याच्या मालकीचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडलें तेव्हां देखील होत असलेला प्रकार उघड्या डोळयांनीं पाहत आपल्या वांट्यास असा राजा आल्याबद्दल दैवास दोष देण्यापलीकडे कोणत्याहि प्रकारचा प्रतिकार करण्याची कल्पना त्या वेळच्या मराठी राज्यांतल्या लोकांना सुचली नाहीं! राज्ययंत्र हें समाजाच्या मालकीचें असतें हें इंग्रजांना माहीत असल्यामुळें एलफिन्स्टचा स्वार्थीपणा व हेस्टिंग्जचा जुलूम क्षम्य ठरला, आणि हें तत्त्व मराठी समाजास माहीत नसल्यामुळें त्यानें त्रिंबकरावाच्या प्रयत्नांस अपयश येतांच त्याची गणना कलिपुरुषांत केली. असो रा. लेले यांनीं हा विषय लोकांपुढें चटकदार रीतीनें मांडला असल्यामुळें मराठी वाचकांना तो लक्षांत येण्यास चांगली मदत होईल असा भरंवसा वाटतो.

दत्तात्रय विष्णु आपटे

माझे ज्येष्ठ बंधु

ती. रा. रा. **नाना** यांस—

— विनायक

## माझें पुढील प्रकाशन

### जीवनपथ : : : :

सुप्रसिद्ध आर्टिस्ट एन. एम्. केळकर यांच्या प्रकाशित व अप्रकाशित कथांचा संग्रह—मार्च १९३५ मध्यें.

### आवडत्या गोष्टी : : : :

सुमारें ५० लघुकथा-लेखकांच्या गोष्टींचा एकत्र संग्रह. पृष्ठसंख्या सुमारें ५००, फेब्रुवारी १९३५ मध्यें

### पांढरे ढग : : : :

स्वतंत्र सामाजिक कादंबरी. (लेखक–वि. स. खांडेकर)

### हृदय आणि बटाटे : : : :

स्वतंत्र सामाजिक कादंबरी. (लेखक–यशवंत गोपाळ जोशी)

### शिवशाहीचा अस्त : : : :

(लेखक–विनायक गंगाधर लेले)
(शिवशाहीचा शेवट कसा झाला याची हृदयभेदक कहाणी)

---

प्रकाशक

यशवंत गोपाळ जोशी, ८५४ सदाशिव, पुणें नं. २.

# दुर्दैवी मोहरे!

## सर्जेराव घाडगा

### १ : : नानास कैद व पुण्याचा छळ

प्रेमानें दूध पाजणाऱ्या हातास झट्दिशीं वळून विषारी डंख मारणारा इरसाल खुनशीपणा, मानेवर समशेरीचा वार होत असतां तिच्या तडाक्यांतून निसटण्याची अपूर्व समयसूचकता, आपणास पाहिजे तें तडीस नेण्यासाठीं करावा लागणारा सर्व तऱ्हेचा युक्तायुक्त खटाटोप ज्या महापुरुषाजवळ सामावला होता; ज्यानें दुसऱ्यावर व दुसऱ्यांनीं ज्याच्यावर मारेकरी घातले; हाणा, मारा, तोडा, जाळा व पोळा याखेरीज ज्यानें उभ्या हयातींत दुसरा हुकूम फर्माविला नाहीं; 'खल-पुरुष, खल-पुरुष' म्हणून ज्याच्या नांवानें एकसारखा यथार्थ डांगोरा पिटला जात आहे—असा 'सर्जेराव घाडगा' वाचकांच्या पुढें उभा करण्याचा मानस आहे.

सर्जेराव घाडग्यास लोकांनीं कितीहि नांवें ठेविलीं तरी त्याचीं स्वतःचीं अशीं तीन नांवें होतीं; तुळोजी, सखाराम व सर्जेराव. हा कागलचा राहणारा. कागलसारखें भिकार गांव व त्याचें तें छोटेखानी घर हें त्याच्या कर्तबगारीस पुरेसें ठिकाण नव्हतें; म्हणूनच जणुं काय आप्तेष्टांशीं तंटामस्ती करून ही स्वारी एका घोड्यानिशीं बाहेर पडली व परशुरामभाऊजवळ शिलेदार म्हणून राहिली. लवकरच त्यानें भाऊंचा चांगलाच विश्वास संपादन केला. पुढें इ. स. १७७६ सालीं मोरोबादादांचें बंड मोडण्यासाठीं म्हणून नाना फडणिसानें भाऊंपासून चारपांचशें विश्वासू माणसें आपल्या पदरीं ठेविलीं, त्या वेळीं सर्जेराव नानांच्या पदरीं राहिला. यानंतर अठरा वर्षें सर्जेराव नानांजवळ होता. या अवधींत त्यानें नानांचीं लहानमोठीं पुष्कळच कामें केलीं, त्यामुळें पुणें-दरबारच्या सर्व खाचाखोंचा त्यास माहीत झाल्या व त्यांचा उपयोग त्यानें पुढें पूर्णपणें करून घेतला.

इ. स. १७९६ सालीं नानावर जेव्हां कठीण प्रसंग आला त्या वेळीं तो पुणें सोडून साताऱ्यास गेला; व त्याच वेळीं सर्जेराव शिंद्यांच्या नोकरींत दाखल झाला. अठरा वर्षें नानांच्या नोकरींत काढल्यानंतर त्या वेळच्या राजकारणाची आणि नाना फडणिसांच्या कमकुवत परिस्थितीची कल्पना सर्जेरावास सोळा आणे आली आणि त्यानें तावडतोब नानाची नोकरी सोडून शिंद्याची धरली. येथें मात्र त्याच्या कर्तबगारीस पूर्ण वाव मिळाला. या गरुडानें झेपी मारण्यासाठीं आपले पंख फडफडावले. मात्र दुर्दैव इतकेंच कीं, या गरुडाच्या पराक्रमास मराठी साम्राज्याची घडी नीट बसविण्यासारखें मंगल कल्पनेचें अधिष्ठान नसल्यामुळें देशाचें अतोनात नुकसान झालें!

सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर पेशवेपदाची माळ नाना फडणिसाच्या मुत्सद्देगिरीस दाद न देतां रावबाजीच्या गळ्यांत पडली; आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, जो नाना रावबाजीस पेशवेपद मिळूं नये म्हणून जिवापाड मेहनत करीत होता व राजकारणी खेळ खेळत होता त्याच नानाच्या प्रयत्नानें व मदतीनें बाजीरावास पेशवेपद प्राप्त झालें! दौलतराव शिंद्याचाहि या कामांत हात होता. किंबहुना नाना व दौलतराव या उभयतांचा या प्राप्तींत अर्धा वांटा होता व तो नानास चांगला खरपूस मिळालाहि. विषाचें अमृत व अमृताचें विष करण्याची अद्भुत जादु राजकारणांत आहे; म्हणूनच

असले लोकोत्तर चमत्कार नेहमीं पाहावयास मिळतात; पण हा बनाव फार काळ टिकला नाहीं, आणि या विषाचा दाह नानास लवकरच जाणवूं लागला. असलीं विषें पचविण्याची अचाट शक्ति आतां त्याच्याजवळ नसल्यामुळें बिचाऱ्याचा त्यांतच अंत झाला!

बाजीराव गादीवर आला व नानाच्या हातांत कारभार गेला; पण नानाचें मन उदास होतें. त्यास बाजीरावाचा विश्वास येईना; आणि याचा प्रत्यय त्यास लवकरच आला. आरंभीं शिंदे व नाना यांचें एकचित्त होतें; तेव्हां शिंद्यानें नानांच्यासमक्ष बाजीरावास कळविलें कीं, आम्हां दोघांच्या खटपटीनें तुम्हांस पेशवेपद मिळालें; तेव्हां आतां नानाच्या विचारें चालावें. आम्ही हिंदुस्थानांत जातों.' या शिंद्याच्या सांगीस बाजीरावानें नुसतें शाब्दिक अनुमोदन दिलें; पण ज्या वेळीं शिंदा आपली फौज काढून नेऊं लागला त्या वेळीं तो या गोष्टीस कबूल होईना. शिंद्यानें फौजेची जास्त निकड लावतांच "तुम्ही पलटणे उठवून न्याल तर आम्हीच वाडा सोडून तुमचे लष्करांत राहावयास येतों. कारण तुम्ही गेल्यावर नाना आमची काय वाट करील याचा भरंवसा आम्हांस मुळींच येत नाहीं." असें रावबाजीनें शिंद्यास स्पष्टच कळविलें. सर्जेराव घाडग्याच्यामार्फत बाजीरावानें शिंद्याशीं असा गुप्त करार केला कीं, "नाना जिवंत असेतोंपर्यंत शिंद्यानें बाजीरावाचे रक्षणाकरितां दक्षिणेंत राहावें आणि शिंद्याच्या फौजेचा खर्च बाजीरावानें चालवावा. आणखी बाजीरावानें याच कारणास्तव शिंद्यास दोन कोट रुपये देण्याचें कबूल केलें होतें." अशा तऱ्हेनें नानापासून आपला बचाव करण्यासाठीं बाजीरावानें तरतूद करून ठेविली. इकडे शिंद्यानें हिंदुस्थानांत निघून जावें म्हणून नानानेंहि कांहीं रक्कम त्यास देऊं केली होती. नाना, बाजीराव व शिंदे या तिघांवर आपला शह बसावा आणि मनाला मानेल तशी सुलतानी सत्ता आपल्या हातांत यावी म्हणून सर्जेराव तिसरेंच कारस्थान रचीत होता! तें असें कीं, आपली मुलगी दौलतरावास देऊन त्यास बगलेंत मारावयाचा व मग शिंद्याच्या समशेरीनें पेशवा रेशमासारखा नरम करून कोणाच्याहि मिशांस कांदे बांधण्याची आसुरी सत्ता आपल्या मनगटांत आणावयाची. पण सर्जेरावाचें हें कारस्थान तडीस जावयास नानाच काय तो भारी होता, म्हणून त्याचाच कांटा काढण्याच्या उद्योगास तो लागला.

या वेळीं नाना फडणिसाचें दुर्दैव ओढवलें होतें; कारण गादीचा मुख्य

धनी—बाजीराव नानास पाण्यांत पाहात होता. शिंदा बाजीरावाच्या गुप्त करारानें जवळजवळ बाजीरावास सामील झाला होता. याशिवाय सर्जेराव घाडगा दौलतरावाचें मन नानाविषयीं कलुपित करण्याचें काम एकसारखें करीत होताच; आणि कामिनीच्या जादूनें त्यानें त्यास पूर्णपणें भारून टाकण्याचा घाट घातला होता. या भरींत भर म्हणून नानास या वेळीं आणखी एक नवीनच विघ्न उत्पन्न झालें होतें ते असें कीं, बाजीरावाचा दत्तक भाऊ अमृतराव, पेशव्यांचा कारभार मी करणार असें म्हणूं लागला. ही त्याची मागणी बाजीरावाकडे पहिल्यापासून होती. हें त्याचे म्हणणें अगदीं न्याय्य व रास्त होतें; कारण पेशवे-घराण्यांत भावानें कारभार पाहण्याची वहिवाट पूर्वकालीन होती. अमृतरावाचें म्हणणें असें कीं, 'सवाई माधवरावाच्या वेळीं नानांनीं कारभार केला हें ठीकच झालें; पण आतां आम्ही सज्ञान झालों, तेव्हां नानांनीं कारभार आमचे स्वाधीन करून फक्त आपली फडणिशी संभाळून असावें; आणि सरकारचा पैसा दाबून ठेवला आहे तो शिंद्यास देऊन त्याची रवानगी हिंदुस्थानांत करावी. 'शिंद्याच्या राहण्यानें प्रांत ओस जाला, रयत नागवली, दरबारचा उपमर्द झाला, बंडखोर लोकांचे तंटे तोडण्याच्या नादानें लोकांकडून मन मानेल तसा पैसा उकळला गेला.' हें त्याचें म्हणणें अक्षरशः खरें होतें. अमृतराव तसा शहाणा होता. बाजीरावाचें व नानाचें पटणें शक्य नाहीं हें त्यानें जाणलें होतें व तदनुसार त्यानें आपला पक्ष बळकटहि करून ठेवला होता. अशा तऱ्हेनें नानास सर्व तऱ्हेनें प्रतिकूल व सर्जेरावास सर्वतोपरी अनुकूल अशी परिस्थिति निर्माण झाली. असें जरी होतें तरी नानास पकडणें मात्र तितकें सोपें नव्हतें. सीध्या व सरळ मार्गानें नाना हातीं लागणें अशक्यप्राय. तो नेहमीं बंदोबस्तानें राही. तेव्हां त्यास पकडण्यासाठीं सर्जेरावानें विश्वासघाताचा अवलंब केला. नानाच्या भोंवतीं कपटकारभाराचें जाळें पसरण्यास सुरुवात झाली.

वास्तविक सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर नानाच्या कारभाराची घडी जी बिघडली ती कायमचीच. बाजीराव ता. ५-१२-१७९६ रोजीं गादीवर आला, व नंतर अवघ्या सव्वीस दिवसांनींच नानांनीं आपल्या दत्तक पुत्राबद्दल बाजीरावाकडून लेखी करार करून घेतला; तो श्रीमंतांनीं मोठ्या मिनतवारीनें जवळजवळ जुलुमाचा रामराम म्हणूनच करून दिला. सन

१७९७ अखेरपर्यंतचा काल नानांनीं डोळ्यांत तेल घालून काढला. दिवसानुदिवस उभयतांमधील वैमनस्य वाढत चाललें. ३० सप्टेंबर १७९७चा नानांचा उल्लेख असा सांपडतो कीं—“ आपला कारभार आपण सांभाळा; मी वृद्ध झालों, स्नानसंध्या करीन.” त्यानंतर दसऱ्याचे मंगलदिनीं उभयतांतील बेगडी प्रेमानें सीमोल्लंघन करून त्या ठिकाणीं उघड शत्रुत्वानें कायमचें ठाण मांडलें.

विजयादशमीचे दिवशीं प्रातःकाळीं नानास श्रीमंतांकडून बोलावणें गेलें, पुन्हा सीमोल्लंघनास स्वारी निघतांना नानास पाचारण्यांत आलें; तरी नाना आले नाहींत. शमीपूजन उरकून स्वारी माघारीं फिरली, तेव्हां नानांची व श्रीमंतांची गांठ घाशीरामाचे बागेनजीक पडली. नानांबरोबर फडके, शेलूकर, शिरवळकर व दादा गद्रे आणि तीन हजार फौज होती. नाना अंबारींतच होते, म्हणून अंबारीजवळ अंबारी लावून सोनें, नजराणा वगैरे देण्याचा दरबारी प्रकार अंबारींतल्या अंबारींतच उभयतांनीं केला; आणि नंतर नाना दोन घटका रात्रीस माघारीं आले; स्वारीबरोबर वाड्यांत गेले नाहींत. शिंदा मात्र सरकारवाड्यांत गेला होता. अशा तऱ्हेनें श्रीमंत व नाना यांच्यांत तिरपी चाल दिसूं लागली. शिंद्यास शिकारीचा नाद भारी; तेव्हां तो शिकारीस नेहमीं जाई. नानांच्या राहत्या बाजूस शिंदा शिकारीस चालला म्हणजे नाना गोट तयार करून फार बंदोबस्तानें राहात असे.

दसऱ्यानंतर पंधरा दिवसांनीं शिंदे पांच-सात हजार फौजेनिशीं वाड्यांत आले. नंतर नानाहि वाड्यांत गेले, व मग चार तास खलबतें व पुष्कळ भवति न भवति झाली. शेवटीं नानांनीं सर्व कारभार पाहावा व शिंद्यानें हिंदुस्थानांत जावें असें ठरलें. पण हें नुसतें ठरलेंच; घडलें मात्र अगदीं निराळें. कारण बाजीरावास या चार घटकांच्या वाटाघाटींतून बाहेर पडलेला निर्णय चिलकुल पसंत नव्हता. त्यानें नानास कारभारावरून दूर करण्याचें निश्चित केलें. पुढें १८ नोव्हेंबर रोजीं पर्वतीवर आतषबाजी झाली त्या समयीं त्रिवर्ग श्रीमंत व बाईसाहेब वगैरे मंडळी गेली होती, नानाहि गेले होते. आतषबाजीचा तमाशा शिरा जाहला, अर्धरात्रीस स्वारी माघारीं आली, पण वाड्यांत पहारे व बंदोबस्त जास्त कडक झाला. चौकाचौकावरून पहारेकरी तोडे शिलगावून होते. नानांनीं पहारे उठवा म्हणून निकड लावली असतां श्रीमंतांनीं बंदोबस्त जास्तच कडक ठेवला. लक्षण ठीक दिसत

नाहीं. केव्हां काय होईल याचा नेम नाहीं. हें पाहून नानाहि जास्तच बंदोबस्तानें राहूं लागला. हे प्रकार पाहून लोक हवालदिल झाले. 'नानास शिंदा चार-आठ रोजांत कैद करणार' अशी कुजबूज सुरू झाली. अशा तऱ्हेनें नाना व बाजीराव यांचें प्रकरण हातघाईवर आलें.

शिंदे व नाना म्हणजेच पर्यायानें सर्जेराव व नाना. यांचे परस्पर संबंध आतां इतके चांगले नव्हते. त्यांच्यांत कुरबुर सुरू झाली होती. शिंद्यास नानांनीं ऐवज द्यावयाचा करार झाला होता त्यांपैकीं कांहीं त्यास पोंहोंचला होता, बाकी छप्पन्न लक्ष राहिले होते त्याबद्दल शिंद्यांनीं निकड लाविली. तेव्हां नानांनीं कळविलें कीं, 'कूच झाल्याशिवाय ऐवज मिळत नाहीं. जांबगांवास गेल्यानंतर निम्मे व गंगापार झाल्यानंतर निम्मे याप्रमाणें ऐवज चुकता करूं.' यास शिंद्यांनीं उत्तर केलें कीं, 'ओढघस्तीमुळें ऐवज हातीं आल्याशिवाय लोक कूच करीत नाहींत. आणखी असें कीं, श्रीमंतांस तुम्हांकडून कांहीं इजा पोंचूं नये म्हणून गद्रे, शेलूकर, पिंगळे व बजाबा शिरोळकर यांपैकीं दोघांस ओलीस द्यावें. एक संवत्सरपावेतों सर्व यथास्थित व सुरळीतपणें चाललें म्हणजे त्यांस सोडूं. ऐवज हातीं आल्याबरोबर आम्ही कूच करितों.' पण नानास दौलतरावाचा भरंवसा बिलकुल नव्हता, म्हणून कांहींच निकाल न लागतां प्रकरण चिघळावयास लागलें. तरीसुद्धां प्रकरण जास्त चिरडीस जाऊं नये म्हणून नाना आपल्याकडून खटपट करीत होता. फिलोज ( Michael Philose) नांवाचा इटालियन युरोपियन शिंद्याच्या कंपूचा अंमलदार होता; त्यास नानांनीं मध्यस्थी घालून शिंद्याची समजूत घालण्याचा पांचसात वेळां प्रयत्न केला, पण सर्व खटाटोप व्यर्थ गेला. शिंद्याच्या त्रासानें लोक इतके त्रस्त झाले होते कीं, 'शिंदे जातील तेव्हां देशाचा भोग संपेल' असें लोक बोलूं लागले.

अशा तऱ्हेनें नाना, बाजीराव व दौलतराव यांचीं मनें एकमेकांविषयीं कलुषित झालीं. कोणी कोणाकडे जाईना. ऐवज टाकावा म्हणून शिंद्यानें नानाशीं एकसारखी रोहिलेगिरी चालू केली; तेव्हां वैरभावाचा स्फुलिंग केव्हां पेट घेईल आणि आगीचा डोंब उसळेल याचा नेम लागेना. नानानें अत्यंत बंदोबस्तानें राहण्यास सुरुवात केली. पेशव्यांच्या वाड्याभोंवतीं शिंद्यांचा पहारा कडक झाला. लोकांत गडबड उडाली. क्षणाचा भरंवसा लागेना. मातबर सरदारमंडळी व खुद्द नाना फडणीस आपआपल्या

फौजा सज्ज ठेवून दिवस अत्यंत शिस्तीनें व काळजीनें लोटूं लागले. ' नाना फौजेनिशीं बाहेर पडणार, व त्यानें एकदां का पुणें सोडिलें म्हणजे मग त्यास पकडणें फार कठीण जाईल. ठिकठिकाणची सरदारमंडळी व दरबार त्यास साहाय्य करतील, व मग तो आपली चटणी उडविण्यास कमी करणार नाहीं.' अशी साधार भीति शिंदे व सर्जेराव या उभयतांस वाटूं लागली. तेव्हां नानास शह देण्यास धाकदपटशा व दरबारी राजकारणें यांचा कांहींएक उपयोग होत नाहींसें पाहून सर्जेरावानें नानाचा विश्वासघात केला. तो प्रकार असा—

' ऐवज द्या म्हणजे मग कूच करतों, ओढघस्तीमुळें लोक माझें ऐकत नाहींत ' वगैरे भाषा शिंद्यानें सोडून दिली व नरमाईचें धोरण स्वीकारलें. शिंद्यानें हा पालटलेला रंग नानाच्या लक्षांत आला नाहीं असें नाहीं, कारण नानासुद्धां कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता; पण एकदां का माणसास विपरीत काल आला म्हणजे मग त्याची बुद्धि चलित होते हेंच खरें. त्या वेळीं युरोपियनांची वागणूक साधारणपणें रीतसर व प्रामाणिक-पणाची असे. त्या वेळपर्यंत तरी त्यांनीं कोणाचा उघड उघड विश्वासघात केल्याचें उदाहरण नसल्यानें नानांचा युरोपियनांवर विश्वास असे; पण या भरंवशाच्या म्हशीसच पुढें टोणगा झाला. शिंद्यानेंसुद्धां हा घाट मोठ्या शहाणपणानें घातला. प्रथम त्यानें बाणाजी शेटे प्रभृति आपली सरदारमंडळी नानाकडे मध्यस्थीस धाडली. आतां आम्ही कूच करतों, तेव्हां एकवार तुम्हीं आमच्या येथें भोजनास यावें. या गोष्टीस नाना लवकर तयार होईना. कारण शिंदा व सर्जेराव आपला कांहीं घातपात करतील अशी नानास शंका होतीच. अशा स्थितींत नानाच्या भरंवशांतील कोणी मनुष्य हातीं लागल्या-शिवाय नाना आपल्या कबजांत येणार नाहीं हें सर्जेरावानें ताडलें, व नानाच्या साधारणपणें विश्वासांतील मनुष्य मोकिल फिरोज हा होता त्यास त्यानें या कार्यासाठीं तयार केलें व नानाकडे पाठविलें. मोकीलनें बायबलवर हात ठेवून शपथ घेतली कीं, शिंद्यांनीं आपला करार मोडल्यास मी आपल्या कंपूनिशीं तुम्हांस येऊन मिळेन. अशा तऱ्हेनें मोकीलनें जामिनकी घेतल्यानंतर शिंद्यानें कूच करण्याची तयारी केली, आणि त्यास निरोप देण्याकरितां शिंद्याकडे नानांनीं २१-१२-१७९७ ला रविवारीं जाण्याचें ठरलें. मोकिलनें हें काम इतकें रेटलें. सर्जेराव येथेंच थांबला नाहीं; तर त्यानें

नानाच्या भरंवशांतील दुसरा सरदार यशवंतराव घोरपडे यासहि कांहीं लांचलुचपतीनें आपल्याकडे वश करून घेतलें. त्यानेंहि शिंद्याच्या मनांत कांहीं कपट नाहीं अशी नानाची खातरजमा करून दिली; तेव्हां त्या दिवशीं आपला अरबांचा रिसाला व कांहीं साथीदार घेऊन नाना शिंद्याच्या भेटीस गेला. प्रथम कांहीं कुशल. प्रश्न झाले. नंतर नाना, मोकील व शिंदे कांहीं खलबतासाठीं निराळ्या जागेंत गेले. तेथें जातांच बायबलवर हात ठेवून शपथ घेणाऱ्या हातांनीं नानास चक्कडबंद केलें! मोकीलचें हें कृत्य पाहून नाना थंडच पडला! अशा तऱ्हेनें सर्जेरावानें आपला डाव साधला, व ज्या पायरीच्या आधारानें त्यानें शिंद्याकडे प्रवेश केला तीच सपशेल मोडून टाकली. हा सर्जेरावाचा पहिला पराक्रम होय!

ह्या बनावानें पुण्यांत मोटा हाहाःकार उडाला. लोकांचीं तोंडें काळींठिक्कर पडलीं. सर्व पुण्यावर प्रेतकळा पसरली. नानाच्या अरबांनीं खूप दंगा केला, बरेच लोक कामास आले, पण शिंद्याच्या फौजेनें त्यांस उधळून लावलें. याच वेळीं पेशवाई नष्ट झाल्याचा भास झाला. नानाच्या कैदेविपर्यीं त्या वेळचे उद्गार असे आहेत, 'नानास कैदेंत घालण्याचा विधि सभातीस गेला; याउपरी श्रीमंतांचे राज्याचा आळा गेला. आतां जो जबरदस्त त्याचेंच पागोटें बांचेल.'

सर्जेरावानें फेकलेल्या विश्वासघाताच्या सरकफांसांत नानासारखा मुरब्बी मुत्सद्दी अडकला. अशा तऱ्हेनें नानाचें विघ्न निर्वेध झाल्यावर सर्जेरावाच्या पाशवी वृत्तीस मोहोर आला; आणि त्याच्या डोक्यांतून प्रत्यक्ष यमराजालाहि लाजवतील अशा सूडाच्या व छळाच्या कल्पना निर्माण झाल्या. त्या सर्वांचे प्रयोग या महाभागानें पेशव्याच्या राजधानींत केले; व कांहीं काल ही पुण्यपुरी नसून यमपुरी आहे कीं काय असा देखावा त्यानें निर्माण केला!

कोणाच्या पाठीची चाबकानें चामडी लोळव, कोणास तोफेच्या तोंडीं दे, कोणाचे नाक-कान कापून त्याची धिंड काढ, कोणाच्या हातापायांस बाण बांध व ते पेटवून त्याची अंतरिक्षांत रवानगी कर, कोणाच्या गुह्य ठिकाणास चाप लाव व ताडण कर असे अनंत प्रकार सर्जेरावानें सुरू केले!

नाना फडणिसांच्याबरोबर दादा गद्रे, आबा शेलूकर, बजाबा शिरोळकर व राबोपंत गोडबोले वगैरे मंडळींस अटक करण्यांत आली. महिना-पंधरा दिवस त्यांस कैदेंत डांबून नाना तऱ्हेचा धाकदपटशा करण्यांत आला, व

ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणें दहावीस लक्ष रुपये दंड उकळण्यांत येऊन सोडून देण्यांत आलें. नानांचे दुसरे साथीदार त्रिंबकराव परचुरे, नारोपंत चक्रदेव, नारायण बाबूराव वैद्य, गोविंदराव पिंगळे, बाबा फडके, अप्पा बळवंत, राघोपंत निजसुरे वगैरे मंडळीसमुद्धां ठाणबंद करण्यांत आलें. त्यांच्याजवळ जो कांहीं द्रव्यसंचय असेल नसेल तो सर्व लुबाडण्याचा उद्योग अत्यंत क्रूरपणानें सुरू झाला. या कामांत बाजीरावास अमृतराव व बाळाजी कुंजीर यांचें साह्य होतें; पण या सर्वांचा सूत्रचालक सर्जेराव घाडगा होता. त्र्यंबकराव परचुरे यानें आरणाजवळील सर्व ऐवज सरकारांत देऊन तीन लक्ष रुपये शिवाय दिले व काशीयात्रेस कायम जाण्यासाठीं निरोप घेतला. त्यानें हें सर्व बाळाजी कुंजिरामार्फत केलें; पण कांहीं अंतरावर त्रिंबकराव परचुरे जातो न जातो तोंच त्यास पकडून बाजीरावानें माघारीं आणिलें. लगेच सर्जेरावबापूची स्वारी वाड्यांत आली. परचुरे याजवर अनेक तऱ्हेचा निकर्ष करण्यांत आला. नाराणराव वैद्य यास चाबकाच्या फटकाऱ्यांनीं मरेमरेतों मारण्यांत आलें. तीच अवस्था अनेकांची झाली. अशा तऱ्हेनें सर्वांवर प्रसंग कठीणच. प्रत्येकाच्या प्राणावर बेतलेली. कोणास नागडेंउघडें करून तोफेवर बसविलें, कोणास छड्यांनीं नखशिखान्त फोडून काढलें, कोणास पाण्यावांचून ठार केलें. असल्या राक्षसी उपायांनीं लोक हैराण करून ह्या प्रत्येकापासून जास्तींत जास्त पैसा उकळण्यांत आला. बाबूराव केशवाचा पुत्र चिंतोपंत देशमुख यास मारिलें.

याप्रमाणें पुणें शहरांत हा कहर सतत सहा महिने चालू होता. नानाचा चुलत-पुतण्या गंगाधर गोविंद भानू याजपाशीं जबरदस्त पैका सर्जेराव मागूं लागला. तो गंगाधरपंत देईना, तेव्हां अंगाला चाप लाविले; तारीख १०-४-१७९८रोजीं त्यास तापलेल्या तोफेवर बसाविलें; पायांस धोंडे बांधिले; विस्तव करून दोनप्रहरीं उष्ण तोफेवर बसविलें; नाजुक जाग्यास झळ लावून ताडणहि झालें. असल्या सैतानी हालअपेष्टा पाहून सर्जेरावास गंगाधरपंताची दया आली नाहीं, पण काळास आली व त्यांतच त्याचा अंत झाला! त्याचा छळ येथेंच संपला नाहीं. त्याच्या दोघी स्त्रिया सती जाऊं लागल्या, तेव्हां घाडगा इतका क्रूर कीं त्या नराधमानें ५ लक्ष रुपये मागितले. शेवटीं पुण्याहून परवानगी आणून त्यांनीं वाई येथें सहगमन केलें. गंगाधर भानूचा वध होण्यापूर्वी अवघे दोनच दिवस त्याचा बाप वारला,

म्हणूनच त्याचा पुत्रशोकाचा प्रसंग टळला! अशा तऱ्हेनें नानाचें चुलत-घराणें सर्जेरावाच्या क्रोधानलांत खाक झालें. आतां खुद्द नानाची जिंदगी लोहगडावर होती व तो किल्ला धोंडोपंत निजसुरे याच्या ताब्यांत होता. ही सर्जेरावाची धोंड आतां आपणावर येणार हें जाणून त्यानें ता. ९-४-१७९८ रोजीं सरकारांत लिहून कळविलें कीं, येथें काय जिंदगी असेल ती सर्व पाहून घ्या व माझे अब्रूस धक्का न लागेल असा बंदोबस्त करा. पण धोंडोपंताच्या लिखाणास विचारतो कोण व दाद लागते कशी! सर्जेरावाचे लोक तेथें गेले असतां धोंडोपंतानें किल्ला तर हवालीं केला नाहींच, उलट निजसुरे यांनीं मोठ्या हिकमतीनें वागून हल्ला करणाऱ्या लोकांस दाद दिली नाहीं.

चिमाजीअप्पास गादीवर आणला म्हणून परशुरामभाऊवर बाजीरावाची अत्यंत वक्रदृष्टि. त्यानें सर्जेरावास सांगून भाऊची मालमत्ता जप्त केली. हें प्रकरण एकट्या भाऊवरच थांबलें नाहीं, तर बाजीरावानें इतर पटवर्धनांचाहि छळ केला. पांचपन्नास लाख रुपये उपटण्याचें तें एक साधन झालें. त्यानंतर हरि विष्णु सहस्त्रबुद्धे यानें चिमाजीअप्पास जबरदस्तीनें पालखींत बसविलें म्हणून त्यास सरकारवाड्यांत नेऊन पन्नास कोरडा मारला. पाठींतून रक्त फार गेलें. हाताचे बोटांस व कानांस चाप लाविले. एक कान तुटला. मार दिल्यानंतर बाजारांतून गल्लोगल्लीं फिरविलें. चिमाजीच्या आग्रहावरून हा प्रकार झाला असें म्हणतात. चिमाजीअप्पानें असा आग्रह धरावाच, कारण तसें न करील तर एखादे वेळेस त्याच्याहि जिवास धोकाच.

अशा तऱ्हेनें सर्जेराव, बाजीराव व दौलतराव या त्रयीनें आपल्या सैतानी लीला पुण्यांत अव्याहत चालू ठेवलेल्या पाहून लोक गांगरले व घाबरले.

त्या वेळच्या सर्जेरावाच्या राक्षसी लीलांबद्दल कांहीं उद्गार आतां नमूद करूं.

"एक द्रव्याचें कूळ नाना, त्यांचे हातींच आहे. त्यास खाणार. नानाकडील सर्व माहीतगार मंडळी लष्करांत नेऊन धाकदपटशा दाखवून ऐवज काढिला. गांवांतील सावकारांचे घरीं सरकारी माणसें बसलीं."

"खुद्द सर्जेराव बायजाबाईच्या लग्नानंतर दहावे दिवशीं नानाच्या वाड्यांत राहिला. नानाच्या देवघरांत नित्य अजापुत्राचा वध चालला आहे. पुण्यांतील गृहस्थांस दक्षिण दिशेच्या स्वामीप्रमाणें घाडग्याचें भय झालें आहे. श्रीमंतांसमक्ष सर्जेराव शिवीगाळ करतात. बाळाजी कुंजीर त्यांचे मसलतींत. श्रीमंतांचे चित्तांत कांहीं गैर येत नाहीं. नाना शिंद्यांचे

गोटांत होते त्यांस ता. ६-४-१७९८ रोजीं रात्रीं चंद्रोदयानंतर दोन घटकांनीं अहमदनगरास कैदेस नेलें. ईश्वराचे चित्तीं याउपरी ब्राह्मणांचा हुकूम चालूं नयेसें झालें. श्रीमंतांपाशीं मुखत्यार नारोपंत चक्रदेव, पिंगळे व कुंजीर हे आहेत. काळ फार कठीण आला आहे. राज्य बिघडतेंसें दिसतें."

ता. १५-४-१७९८ रोजीं चाळीस वर्षे मराठी राज्याच्या सर्व घडामोडी पाहिलेला पुरुष अप्पा बळवंत मेहेंदळे हा एकाएकीं आत्महत्या करून मरण पावला. "अप्पासारखा पुरुष होणें नाहीं. त्याजपाशीं पैका मागूं लागले; तेव्हां अब्रूसाठीं अमृत प्राशन केलें आणि देवाधीन झाले!"

अशा तऱ्हेनें सर्जेरावानें पेटविलेल्या या यज्ञकुंडाची झळ बाजीरावास पोंचूं लागली. त्यामुळें शिंदे व बाजीराव यांत तेढ उत्पन्न झाली व ती विकोपास गेली. बाजीरावाचे हातीं काडीइतकाहि अधिकार राहिला नाहीं. तेव्हां बाजीरावानें सर्जेरावापासून आपल्या लोकांचें संरक्षण करण्यासाठीं मोरोबादादा व फडके वगैरे आप्तमंडळीस पुणें सोडून जाण्याबद्दल सल्ला दिली. त्याबरोबर बाजीरावाजवळ आपला पहारा जास्त कडक तऱ्हेनें बसविण्याची खटपट शिंदा करूं लागला, त्यासरशीं बाजीरावानें स्वतः पुणें सोडून जाण्याचा बेत केला. मे महिन्याच्या आरंभीं एक दिवस दौलतराव बाजीरावाचे भेटीसाठीं वाड्यांत आला असतां बाजीरावानें त्याची खूप कानउघाडणी केली. सर्जेरावाचा बंदोबस्त करा म्हणून निक्षून सांगितलें. दोन घटका खूप खलबतें झालीं. शिंद्यांनीं घातलेल्या अटी बाजीरावानें साफ नाकारिल्या. चिमाजीअप्पानें तर शिंद्यास ताड्कन् सांगितलें कीं, "आम्ही धनी नाहीं, तुम्हीच सर्व मालक, कराल ती पूर्वदिशा!" लोकांस धीर उरला नाहीं. शहरांत सगळीकडे हाहाःकार उडाला. क्षणाचा भरंवसा येईना, कोणाचा जीव केव्हां जाईल, कोणाची बेअब्रू कशी होईल याचा कांहींच नेम धरवेना. सर्व लोक हवालदिल झाले. जो तो आपआपला प्राण घेऊन पळूं लागला. लोकवस्ती कोंकणाकडे हलली. उभयतां श्रीमंतांच्या स्वाऱ्या पळाल्या अशीहि आवई उठली. ही पळापळ पाहतांच सर्जेरावानें शहराची नाकेबंदी केली; त्यामुळें लोकांची कुचंबणा व हलाल झाले. सुटण्यास मार्ग उरला नाहीं. बाजीरावाच्या हातांत काडीइतकीहि सत्ता राहिली नाहीं. खुद्द त्याचें तरी पागोटें ठिकाणीं राहतें कीं नाहीं याची त्याची त्यासहि शंका वाटूं लागली. त्यामुळें बाजीरावाची चोहोंकडे छीःथूः झाली. पूर्वी कधीं न

घडलेले व ऐकलेले निंद्य प्रकार आपल्यासमक्ष व आपल्या संमतीनें होतात, ही गोष्ट बाजीरावाच्या मनास फार झोंबूं लागली. निदान दोन कोट रुपये तरी सर्जेरावानें पुण्यांतून उकळले. हा सर्व प्रचंड पैसा त्यानें नानाकडील लोकांकडे खणत्या लावून उभा केला. बाजीरावाच्या लोभांतील लोकांसहि त्याची आंच पोंहोचली, त्यामुळें बाजीराव फारच चिडला; पण ही पेटलेली आग विझविणें आतां त्याच्या हातांत नव्हतें. सर्जेराव पलिते पेटवून एकसारख्या घरांना आगी लावीत होता. त्यामुळें शिंदे व बाजीराव यांच्या मनांतील तेढ वाढली. शिंदा बाजीरावाच्या मनांतून उतरला.

पुढें शिंदा बाजीरावास भेटण्यासाठीं आला असतां बाजीरावानें फार कडक वृत्ति धारण केली. शिंद्याची फौज बाहेर ठेवून त्यास एकट्यासच आंत घेतलें व त्याची अप्रतिष्ठा करून चांगली खरडपट्टीहि काढिली, तेव्हां शिंद्यानें सर्जेरावाचा थोडा निग्रह केला. बाजीराव इतकें करूनच थांबला नाहीं, तर त्यानें मालोजी घोरपडे व मानाजी फाकडे वगैरे सरदारांस सर्जेरावास पकडण्यासाठीं धाडलें. त्यांनीं तावडतोब जाऊन नानाच्या वाड्यास गराडा घातला व तोफा रोंखल्या; तेव्हां फकीरजी गाढवे व सर्जेराव घाडगे भयभीत झाले आणि बाजीरावाच्या भेटीस वाड्यांत आले. त्यांची पालखी व फौज बाहेर ठेवून त्यांस पायउतार बाजीरावानें रुबरु बोलाविलें आणि त्यांस अनेक प्रकारें फजीत केलें.

गोष्टी इतक्या थरास आल्या तेव्हां सर्जेरावानें लोकांच्या घरीं बसविलेल्या चौक्या उठविल्या. सर्जेरावास नरम व सर्द करण्यासाठीं म्हणून नारायणराव बक्षी व देवजी गौळी या उभयतांस याच संधीस दौलतरावानें मोकळें केलें व त्यांचा बहुमान केला. नारायणराव बक्षीनें दौलतरावाची खूपच हजेरी घेतली व चांगलीच कानउघाडणी केली. तेव्हां दौलतरावास सर्जेरावाबद्दल फारच चीड आली. प्रकरण असें हातघाईवर आलेलें पाहून सर्जेरावानें जांवयाची समजूत घालण्यासाठीं नेहमींच्या ठेवणीच्या हत्याराचा उपयोग केला. "त्यानें आपली स्त्री, कन्या व कलावन्तीण अशा तिघींस एका खोलींत घालून तेथें दौलतरावास नेलें. चार प्रहर त्रिवर्ग स्त्रिया व शिंदे एकत्र होते." याचा अर्थ काय असेल तो असो; पण या उपायाचा फारसा उपयोग झाला नाहीं. कारण यानंतर सर्जेरावास पुढें लवकरच कैद झाली.

## २ :: बायांवर हत्यार व शेणवी सरदारांची समाप्ति

पाठीवर मारलेल्या आसुडांच्या तडाख्यांनीं उडणाऱ्या रक्ताच्या चिळकांड्या, अन्नपाण्यावांचून प्राण सोडणाऱ्या जात्या जिवांच्या करुण किंकाळ्या, समशेरीनें व तोफेच्या धडाक्यानें गगनांत गिरक्या घेत गेलेलीं शिरकमलें, व भूमीवर नाचणारीं कबंधें ह्या साहित्यांनीं पुण्यास मसणवटींतील अमावास्येची मध्यान्हीची अवकळा आणिली होती. पण ह्या खाईस सुरुवात झाली ती बायजाबाईच्या लग्नांतील मंगलाष्टकांनीं! कारण ह्या लग्नानें सर्जेरावाच्या हातीं सर्व सत्ता गेली आणि त्या सत्तेचा दुरुपयोग करून सर्जेरावानें अवघ्या पुण्याची होळी केली.

बायजाबाई ही सर्जेरावाची मुलगी. हिचा जन्म सन १७८४ त झाला. हिच्या आईचें नांव सुंदराबाई ऊर्फ नानीसाहेब. ही सातारजवळच्या बाजीराव पाटणकराची मुलगी. बायजाबाई त्या वेळच्या स्त्रियांत अत्यंत रूपवान होती. तिच्या सौंदर्याविषयींची कीर्ति सर्व महाराष्ट्रांत पसरली होती. त्या वेळच्या इतिहासकारांनीं व लेखकांनीं ‘ दक्षिणेची सौंदर्यलतिका ’ असा तिचा गौरवपर उल्लेख केलेला आहे. ती गोरीपान, सशक्त व नाकीडोळीं नीटस होती. तिचे सर्व अवयव बांधेसूद, घोसदार आणि रेखीव होते. ती घोड्यावर बसण्यांत पटाईत व धाडसी होती. ह्या गुणांबद्दल तिची ख्याति सरदारांत पसरली होती. तेव्हां दौलतरावासारखा ऐश्वर्यसंपन्न व रंगेल तरुण तिला वरण्यास एका पायावर तयार होता.

किंबहुना त्याकडून तसे प्रयत्नहि चालले होते. पण शिंद्याची जातकुळी हीन असल्यामुळें आपण दौलतरावास आपली मुलगी देणार नाहीं असें सर्जेराव गर्जत होता. पण हें त्याचें गर्जणें म्हणजे 'गर्जेल तें पडेल काय' यापैकींच. हें सर्व ओढून ताणून आणलेलें चंद्रबळ होतें. पोटांत हेतु अगदीं निराळा. दौलतरावाकडून पुष्कळशी दौलत व अधिकार मिळाल्यास तो ही पोटची दौलत बहाल करावयास तयार होता.

आतां हें लग्न सर्जेरावाच्या मुलीचें, व तें दौलतरावाशीं व्हावयाचें; तेव्हां मध्यस्थ बाजीरावच असावयाचा व तसा तो होताहि. कारण या लग्नाच्या निमित्तानेंच या तिघांमध्ये असा एक गुप्त करार झाला कीं, शिंद्याची दिवाणगिरी सर्जेरावास द्यावयाची; आणि बाजीरावानें सर्जे-रावाचे हस्तें दोन कोट रुपये शिंद्यास द्यावयाचे; व या देणगीबद्दल शिंद्यांनीं बाजीरावास गादीवर आणण्यासाठीं नानास मदत करावयाची; इतकेंच नव्हे तर पुढें श्रीमंत नानाच्या तडाख्यांत न सांपडतील व नानापासून त्यांचें संरक्षण होईल असा बंदोबस्त ठेवावयाचा. या कराराप्रमाणे सर्व गोष्टी झाल्या.

असा हा करार ठरल्यानंतर लग्नाच्या वाटाघाटीस जरा मूर्त स्वरूप येऊं लागलें. सन १७९७ च्या पावसाळयापासून ह्या लग्नाची वाटाघाट जोरांत सुरू झाली. घाडग्याचीं मुलेंमाणसें कागलास राहात असत त्यांस आणण्या-साठीं दोनशें स्वार व इतर लवाजमा शिंद्यांनीं धाडला. घाडग्याची पोर पेशव्यांचा सरदार शिंदा यांस देऊं केली, तिला नेण्यासाठीं हें लष्कर आलें आहे, ही वार्ता लोकांत पसरली. कोल्हापूरचे महाराजांसहि कळली, तेव्हां महाराजांचे कारभारी रत्नाकरपंत यांनीं महाराजांस सल्ला दिला कीं, घाडग्याची मुलगी देऊं नये. तेव्हां तिला सामानगडाकडे पळविली. हें पाहून दौलतरावानें धाकदपटशा दाखविला आणि निकडीचीं माणसें धाडिलीं. त्याबरोबर महाराज नरम पडले व पोर पुण्यास आणिली.

नानाला पकडण्याचें कारस्थान सिद्धीस गेल्यानंतर दोनतीन महिन्यांनीं हें लग्न ता. १६-३-१७९८ रोजीं मोठ्या थाटानें पार पडलें. या लग्नाचें बोहलें रुप्याचें, त्यास सोन्याचा चांदवा व मोत्यांच्या झालरी लाविल्या होत्या. याप्रमाणें हें काम फार भारी झालें. जणुं इंद्राचें वैभव दोन घटका वस्तीस पुण्यपुरीस आलें. हा संबंध घडून येतांच सर्जेरावाच्या स्थितींत

एकदम जमीन-अस्मानाचें अंतर पडलें. साध्या शिलेदाराचें एका मोठ्या व बलाढ्य सरदाराच्या दिवाणांत रूपान्तर झालें. सखाराम घाडग्याचा सर्जेराव घाडगा झाला! मानकरी मुजरे करूं लागले व भालदार ललकारूं लागले!! अशा तऱ्हेनें सर्जेराव दौलतरावांचे मामासाहेब झाले. अशी इतमामाची प्रभावळ मिळतांच सर्जेरावाच्या कर्तबगारीस तेज चढून ती चमकूं लागली. मात्र हें लग्न करवीरकर महाराजांस निखालस मान्य नव्हतें; कारण कुंकोत्री देऊन एका कारकुनास सर्जेरावानें धाडलें होतें, त्या कारकुनास महाराज उणेंअधिक बोलले. त्यावरून छत्रपतींचे वकील पुण्यांत होते त्यांस २३-३-१७९८ रोजीं शिंद्याकडून कैद झाली व त्यास लष्करांत नेलें. असो. येणेंप्रमाणें फारशीं विघ्नें न येतां हें लग्न एकदांचें पार पडलें.

सर्जेराव दौलतरावाचा सासरा झाला, त्याच्या हातांत सत्ता आली; आणि या वेळेपासून सहासात वर्षें त्याने धरपकड, खून, कत्तली, जाळपोळ, लूट व मारामाऱ्या यांचा कहर उडवून दिला. या रणधुमाळींत प्रान्तच्या प्रान्त बेचिराख झाले. या त्याच्या कृत्यांवरून तो एक आगलाव्या, पाषाणहृदयी, आडमुठा शिलेदार होता असें मात्र समजूं नये; त्याच्या हातीं सत्ता होती, मोठें लष्करी सामर्थ्य होतें, म्हणूनच तो या गोष्टी करूं शकला असें मात्र नाहीं. त्याचें बुद्धिसामर्थ्य अलोट होतें. त्याच्या धूर्तपणापुढें मोटमोठ्या मुत्सद्द्यांनीं हात टेकले. त्याच्या चाणाक्षपणापुढें मोठमोठालीं कारस्थानें लटपटलीं. त्याच्या साहसी वृत्तीपुढें मी मी म्हणणारे पराक्रमी वीर हतप्रभ झाले. कोणाहि मोठ्या माणसावर वार करतांना त्याचा हात चांचरला नाहीं कीं वृत्ति बावरली नाहीं. त्याचें मन वज्रासारखें कणखर होतें. त्यानें शेंकडों कारस्थानें रचलीं व हिकमतीनें तीं तडीस नेलीं. त्यानें टाकलेला एकहि डाव त्याचे अंगावर आला नाहीं. असा असामान्य पुरुष मराठी राज्याच्या अंतकाळीं दौलतरावाच्या हातीं लागला असतां, त्याचा उपयोग राज्ययंत्र सुव्यवस्थित करण्याकडे न होता केवळ आत्मनाशाकडेच झाला! याचीं कारणें फक्त दोनच; एक म्हणजे आमचें व्यक्तिप्रधान राजकारण, आणि दुसरें, आपसांतील हेवेदावे उगवून घेण्याची खुनशी वृत्ति!

सर्जेरावानें महादजी शिंद्याच्या बायकांच्यावर हात टाकला तो प्रकार आतां सांगावयाचा. महादजीच्या पश्चात् त्याच्या तीन बायका लक्ष्मीबाई,

भागीरथीबाई व यमुनाबाई आणि रक्षा केशरी अशा होत्या. त्यांचें व दौलतरावाचें कधींच फारसें सख्य नव्हतें. त्याचे दत्तविधानाचे वेळीं लक्ष्मीबाईनें हरकत घेतली; पण या वेळीं बाकीच्यांनीं या दत्तविधानास संमति दिल्यानें आणि दौलतरावाने त्या सर्वांचा बंदोबस्त व व्यवस्था नीट तऱ्हेनें ठेवण्याचें अभिवचन दिल्यानें त्याचें दत्तविधान झालें. पुढें शिंद्यास पैशाची अडचण भासूं लागली, तेव्हां त्याचें बायांच्याकडे दुर्लक्ष झालें व त्यांची उज्जनीस आबाळ होऊं लागली. यामुळें उभयतांत कटकट सुरू झाली; तेव्हां आपली व्यवस्था नीट लावून घेण्याकरितां त्या सन १७९७ त पुण्यांत आल्या. येथपर्यंत सर्व ठीक होतें; पण पुढें एक मोठी चमत्कारिक गोष्ट घडून आली, ती अशी कीं, बाया पुण्यास आल्यानंतर भागीरथीबाई व दौलतराव यांची सलगी जमली ती इतरांस खपेना. तेव्हां त्या अद्वातद्वा बोलूं लागल्या. लक्ष्मीबाई पहिल्यापासूनच दौलतरावाच्या विरुद्ध होती. तिनें विशेष पुढाकार घेतला. तीस नानाचा पाठिंबा होता. सर्जेरावानें त्यांस समक्ष भेटून त्यांची समजूत घालून त्यांस जांबगांवास नेण्याचा प्रयत्न केला; पण बाया सर्जेरावावर जास्तच उसळल्या. सर्जेरावाचें तोंडसुद्धां पाहावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें व त्याप्रमाणें वर्तन करण्यास सुरुवात केली.

आडवें आलें कीं कापून काढावयाचें, हाच ज्याचा दंडक अशा सर्जेरावाशीं आपली गांठ पडली आहे हें त्या बायांस काय माहीत! तेथें कोणाची भीड नाहीं, कोणाची मुर्वत नाहीं. सर्जेरावानें प्रथम गोडीगुलाबीनें समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत यश येत नाहीं असें पाहतांच, एक दिवस त्यानें बायांस तंबूबाहेर जबरदस्तीनें ओढून चाबकानें बेदम फोडून काढलें. दिल्लीची बादशाही खिशांत घालणाऱ्या महादजी शिंद्याचें वैभव ज्या जुन्या सरदारांनीं पाहिलें होतें त्यांस ह्या बायांची ही दैन्यावस्था पाहून फारच वाईट वाटलें! त्यांतून सर्जेरावासारख्या सामान्य माणसानें त्यांच्या अंगावर हात टाकलेला पाहून तर त्यांच्या तळव्याची आग मस्तकास गेली. विशेषतः पाटीलबावाच्या लोभांतील शेणवी सरदारांस तर हा प्रकार बिलकुल आवडला नाहीं व त्यांनीं बायांच्या वतीनें दौलतरावाशीं बोलणें चालविलें. दौलतरावानें जरा नरमाईचें धोरण ठेवून, त्यांची समजूत काढण्याचे इराद्यानें, बायांनीं तूर्त बऱ्हाणपुरास

मुक्काम करावा असें बोलणें चालविलें. पण ह्या सर्व गोष्टी तडीस जाण्यास शेणवी सरदारांचा मोठा अडथळा होईल व प्रकरण चिघळून तडीस जाणार नाहीं अशी सर्जेरावाची खात्री झाली; म्हणून सर्जेराव शेणवी सरदारांच्या मागें लागला. त्यानें बायजाबाईचें लग्न होतांच मार्च महिन्याच्या पहिल्याच आंठवड्यांत नारायण जिवाजी बक्षी व देवजी गौळी यांस नगरच्या तुरुंगांत पाठविलें. बायांस नानाचें पाठबळ होतें म्हणून त्यांस लग्नाच्या आधींच अटक करण्यांत आली होती. अशा तऱ्हेनें लग्नाच्या आधीं एक व नंतर एक, मिळून नाना व बक्षी यांचे कांटे सर्जेरावानें काढून टाकले व आपला मार्ग मोकळा केला. यानंतर लवकरच रायाजी व रामजी पाटील हे दोन मातबर सरदार आपोआपच दौलतरावापासून दूर झाले; व अशा तऱ्हेनें सर्जेरावाच्या हातांत मराठ्यांची सर्व शक्ति एकवटली आणि दौलतरावास सर्जेरावानें पूर्णपणें ग्रासलें.

सर्जेराव व दौलतराव या उभयतांचें बायांविषयींचें धोरण सरळ नसून कपटी होतें. बायांना बऱ्हाणपुरास नेण्याची हूल दाखवून त्यांस नगरांत कैदेंत ठेवण्याचा त्यांचा बेत होता. बायांची चीजवस्तु व जडजवाहीर दौलतरावाजवळ होतें, तें परत देण्याबद्दल त्यांनीं दौलतरावाकडे तगादा लावला व तें हातीं आल्याशिवाय त्या कूच करण्यास तयार होत ना. दादा-बाबा करून पाहिलें, पण समज पडेना. तेव्हां वैशाख वद्य ३० चे दिवशीं सर्जेरावानें बायांस पुन्हां बेजरब मारहाण करून जबरदस्तीनें पालख्यांत बसविलें. बिचाऱ्यांनीं पुन्हां रडून आकान्त केला. हा सर्व अत्यंत खेदजनक व करुण प्रकार पाहून सर्वांचीं अंतःकरणें विदीर्ण झालीं; व त्यांच्याबद्दल साहजिकच सहानुभूति उत्पन्न झाली. बऱ्हाणपुरास नेण्याचें नुसतें ढोंग असून, आपणांस नगरांत कैद करणार आहेत हा दौलतरावाचा गुप्त बेत बायांस कळला. बायांना मारहाण केल्याची बातमी सर्वत्र पसरली; त्यामुळें दौलतरावाची जिकडे तिकडे नाचक्की झाली; आणि बायांस अनुकूल असें वातावरण सर्वत्र निर्माण झालें. हें प्रकरण दौलतरावास चांगलेंच जाणवलें. बायांना मारपीट केल्यामुळें दौलतरावाच्या अब्रूचे धिंडवडे निघाले; लोक तोंड बाहेर काढूं देईनात. तेव्हां लोकांचीं मनें शान्त करण्याकरितां दौलत-रावानें नगराहून नारायणराव बक्षी व देवजी गौळी या उभयतां जुन्या

वजनदार कारभाऱ्यांस माघारीं आणून पुन्हां कारभार पाहण्याविषयीं सांगितलें; तेव्हां नारायणराव म्हणाला, "मला तुमचा कारभार नको. मर्जीस असेल तर पोटास द्या." हें उत्तर ऐकून वास्तविक दौलतराव चिडून जावयाचा, पण तसें न होतां त्यानें कारभार पुन्हां हातांत घेण्याविषयीं आर्जवें केलीं, तेव्हां बक्षी पुन्हां कारभार करूं लागला. नारायणरावानें कारभार हातीं घेतांच त्याचें सर्व सैन्य त्याच्याभोंवतीं जमा झालें. उत्तर-हिंदुस्थानांत लखबा दादा व जगोबा बापू ह्यांची इंग्रजांशीं लढाई जुंपली. नारायणराव बक्षीचा नीट जम बसलेला पाहून व त्याची सेना एकत्र जमा झालेली पाहून आगलाव्या सर्जेरावास स्वस्थ बसवेना. त्यानें दौलतरावास बक्षीचें डोकें मारावयास सांगितलें. ही बातमी बक्षीस कळतांच तो उघडपणें फौजेसह बायांकडे निघून गेला. त्याबरोबर त्याचे स्नेही देवजी गौळी व मुजफरखान पठाण हेहि जाऊन बायांस मिळाले. या वेळीं बायांचा मुक्काम कोरेगांवाजवळ होता (ता. ७-६-१७९७).

सर्जेराव व दौलतराव या द्वयीनें बायांस छेडल्यामुळें त्या या दोघांवर एकसारख्या जळत होत्या. त्यांस बक्षी, गौळी व मुजफरखान या तीन मातबर सरदारांची जोड मिळतांच त्यांची वीरवृत्ति जागी झाली. उत्तरेचा दिक्पाल म्हणून ज्याचें यथार्थ वर्णन करावें अशा महाप्रतापी महादजीच्या त्या बायका होत्या. प्राणावर बेतल्यावर मांजरसुद्धां शत्रूवर झांप टाकतें; मग पाटीलबावांच्या बायकांची गोष्ट तर असामान्यच. इतकी तयारी झाल्यावर बायांनीं दौलतरावावर चालून घ्यावयाचें ठरविलें. त्यांनीं थेउरावर चाल केली, आणि घाडग्याचें पारिपत्य करण्याचा कृतनिश्चय केला. याच वेळीं बायांस साह्य करणारी अशी एक मोठी व्यक्ति त्यांस मिळाली, ती म्हणजे अमृतराव. बाजीरावास सर्जेराव व शिंदे यांचा बंदोबस्त करतां येत नाहीं असें पाहून हताश झालेला अमृतराव बाजीरावास सोडून बाहेर पडला व त्यानें स्वतःच्या सामर्थ्यावर जें काय होईल तें करावें असें ठरविलें; आणि तो बायांस साह्य करूं लागला. 'दौलतराव कमा तुम्हांस पकडतो, आपण त्यास आतां नरम पाडूं' अशी घोषणा अमृतरावानें चालविली व बायांस सर्वतोपरी साह्य केलें. या वेळीं खुद्द लक्ष्मीबाई हत्तीवर बसून लढाईंत पुढाकार घेत होती, व वीरांना प्रोत्साहन देत रणधुमाळींत बेधडकपणें वावरत होती.

आपण बायांचा निग्रह करावयाचा तें सर्व बाजूलाच राहून त्यांनींच

आपल्यावर चाल केली या गोष्टीनें दौलतरावास नामुष्की आली. बायांनीं आपणांवर हल्ला केला तेव्हां आतां आपणहि उलट लगट करून त्यांचा पाडाव करावा असें दौलतरावानें ठरविलें; पण कंपूचे अधिकारी या गोष्टीस तयार होईनात. कारण हें युद्ध शत्रूशीं नव्हतें, प्रत्यक्ष मालकिणीशीं होतें. 'कोणाशीं युद्ध करतां! मातुःश्रींची समजूत काढा' असें ते म्हणूं लागले. इकडे याच वेळीं पुण्यांत चिमाजी अप्पाचें लग्न होतें. वरातीदिवशीं रात्रीं शहरांत वरातीची गडबड, पण तिकडे वानवडीस बायांच्या फौजेची व शिंद्याच्या फौजेची जुंपली. मध्यरात्रीपासून एकसारखा तोफांचा धूमधडाका चालू होता. उजाडतें तों बायांच्या पलटणांनीं शिंद्याच्या फौजेस वेढा घातला. तेव्हां वेढा उठवून लावण्यासाठीं म्हणून शिंद्यानें डु-प्रॅट साहेबास पलटणें व तोफा देऊन पाठविलें; पण बायांच्या पलटणांनीं अशी जोराची लगट केली कीं प्रॅटसाहेबास छावणी गांठतां गांठतां पुरे झालें. तेव्हां मात्र दौलतरावाची गाळण उडाली. काय करावें हें त्यास सुचेना. दौलतरावास काढून आम्ही दुसरा इसम दौलतीवर आणणार, अशी त्यांनीं घोषणा केली; आणि दौलतरावाच्या सैन्यांत फितुर केला. यामुळें त्याची जास्तच धांदल उडाली. तो सर्व बाजूंनीं जेर झाला तेव्हां त्यानें लगेच आपली चाल बदलली व रायाजी, रामजी पाटील आणि आबा चिटणीस यांस बायांकडे शिष्टाईसाठीं पाठविलें. 'तुम्ही सांगाल तसें मी करीन, मी आपल्या-बाहेर नाहीं.' असें नरमाईचें बोलणें सुरू केलें. असें अत्यंत नम्रपणाचें धोरण चालविलें. हे सर्व प्रकार बायांना भूल पाडून कबजांत आणण्यासाठीं सर्जेरावाच्या सांगण्यावरून दौलतराव करीत होता. 'मातुश्रींचा आग्रह कीं हल्लीं सर्जेराव वगैरे पांच असामी कारभारांत आहेत, त्यांस आमचे हवालीं करा, महादजीच्या वेळच्या लोकांस पुन्हां कामावर घ्या, नाहीं तर काय घडेल तें घडो.' सर्जेरावास बायांचे हातीं देण्याचें दौलतरावानें नाकारलें, त्याबरोबर हा समेट फिसकटला. आणि उभय पक्षांत पुन्हां चकमक सुरू झाली. अमृतराव व बाया आतां कूच करून खडकीच्या बाजूला राहिल्या. तेथें त्या बेसावध आहेत असें पाहून दौलतरावाच्या पलटणीनें त्यांवर अचानक छापा घातला. ताबूत थंडे करण्याच्या निमित्तानें पलटणें खडकीच्या पुलानजीक गेलीं व त्यांनीं एकदम अमृतरावाच्या गोटावर तोफांचा मारा सुरू केला. या चकमकींत अमृतरावाची वाताहत

झाली. त्याचे डेरे, जामदारखाना, भांडीं वगैरे किरकोळ सामानसुद्धां शिल्लक राहिलें नाहीं. अमृतरावाची स्त्री व मुलगा विनायकराव पळून पाषाणास आलीं. खुद्द अमृतराव मागें हटून विठ्ठलवाडीस आला. हे सर्व खेळ बाजीराव मुग्धतेनें पाहात होता. हा सर्व प्रकार ता. २५-६-१७९८ ला झाला. विठ्ठलवाडीस बायांची फौज, शेणवी सरदार आणि इतर मराठे-सैन्य अमृतरावास मिळालें. दुसऱ्या दिवशीं लढाईचें अनुसंधान साधलें नाहीं. ता. २७ रोजीं रात्रीं बायांच्या सैन्याची व पलटणांची अंधारांत एकसारखी कापाकापी सुरू झाली; पण यानंतर लढाईचा सर्व नूर पालटला. शिंद्याची बरीच फौज बायांस सामील झाली; शिक्केकट्यार, जरीपटकादेखील बायांकडे गेला, तेव्हां मात्र दौलतरावाचे डोळे खाडकन् उघडले. हें प्रकरण आतां चेतत कोठवर जाणार याचा नेम लागेना. लोकांत तोंड दाखविण्यास जागा राहिली नाहीं. जो तो 'छीःथूः' करूं लागला. कारण हें युद्ध म्हणजे जगाविरहितच. मुलानें आईशीं व चाकरानें धन्याशीं—असलें विलक्षण, हिडीस आणि निमकहरामी स्वरूप या युद्धास आलें होतें. बाया म्हणजे त्याच्या सापत्न माताच व अमृतराव म्हणजे पर्यायानें धनीच. तेव्हां हें प्रकरण आतां आटोपतें घ्यावें असेंच त्यानें ठरविलें.

आतां बायांकडे बाजीरावांमार्फत शिष्टाई करण्याचें दौलतरावानें योजिलें. प्रथम रायाजी व रामजी पाटलांस बायांकडे धाडून त्यांची त्यानें झाल्या गुन्ह्याबद्दल माफी मागितली; आणि अमृतरावाची व बायांची समजूत घालण्याबद्दल बाजीरावाची काकुळतीनें अर्जी केली. आतांपर्यंत अडकवून ठेवलेलें सर्व जडजवाहिर व बायांस देण्यासाठीं पोषाख दौलतरावानें बाजीरावाकडे धाडिला. इतकें झाल्यावर बाजीराव बायांकडे गेला, आणि त्यानें त्यांची भेट घेतली. बायांनीं पोषाख व जडजवाहिर तर घेतलें नाहींच, पण बाजीरावच जातीनें गेला होता म्हणून जरा भीड पडून उत्तर केलें कीं, 'आपण धनी आहां, सांगतां तें प्रमाण; पण प्रथम सर्जेराव घाडगा व सहा असामी आमच्या स्वाधीन करा व मग बोला.' पण हें मागणें दौलतरावानें अमान्य केलें. तेव्हां बाया जास्तच चिडल्या व मारूं किंवा मरूं या निश्चयानें त्यांनीं युद्धास पुन्हा कंबर बांधिली.

बाजीरावाकडून आपली तडजोड होत नाहीं असें पाहून बाया व अमृत-

मुक्काम केला. अमृतरावाच्या फौजेनें आसपासचा प्रदेश उध्वस्त करण्याचा एकसारखा सपाटा चालविला, हें पाहून बाजीराव व दौलतराव यांस मोठी काळजी लागली. याला तोड काय करावी तें कांहीं त्यांस सुचेना. या सर्व अनर्थाचें आदिकारण सर्जेराव अशी उभयतांची बालंबाल खात्री झाली. पण आतां याला उपाय काय, हा दोघांस मोठा प्रश्न पडला.

'संशयात्मा विनश्यति' हें वचन बाजीराव व दौलतराव या दोन व्यक्तींकडे पाहिलें कीं सत्य वाटतें. आतां दौलतरावाच्या डोक्यांतील विचारचक्रास जोराची गति मिळाली व संशयाचें पिशाच्च त्याच्यापुढें नाचूं लागलें. बायांस व अमृतरावास आंतून साहाय्य बाजीरावाचें असावें असा त्यास शक आला. तेव्हां लहान मुलांस चूप करण्यासाठीं जसा बागुलबोवा, त्याप्रमाणें बाजीरावाचा बागुलबोवा नाना, आणि दौलतरावाचा शेणवी सरदार असे हे परस्परांनीं परस्परांवर उपयोगांत आणण्याचे तोडगे होते. तेव्हां त्याचा उपयोग दौलतरावानें केला, आणि नानास नगराहून आणण्याचें ठरविलें. नानास सोडवून बाजीरावास नरम करावें, नानाजवळून पैसा उपटावा व त्याच्याकडून बायांची समजूत काढावी; इतक्या गोष्टी नानास बंधमुक्त करून तो साधणार होता. तेव्हां फकीरजी गाढव्यास नगरास नानाकडे धाडलें.

'दोन कोट रुपये द्या म्हणजे तुम्हांस सोडितों' असें बोलणें फकीरजीनें नानाशीं चालविले. या बोलण्यास नाना रुकार देईना. तो म्हणाला कीं, आतां आम्ही कोठेंहि असलों तरी सारखेच. तरी तो दहा लाख देण्यास तयार झाला. त्यावरच संतुष्ट राहणें शिंद्यास भाग पडलें. नानास पुण्यास नेऊन त्याचे हातीं कारभार आला म्हणजे आणखी पंधरा लाख देण्याचें ठरलें. नानाची मुक्तता झाली. त्या वेळीं लोक असें म्हणत होते कीं, "पुण्यांतील प्रकार म्हणावा तर कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं. कोणांत कोणी मिळत नाहीं. दौलतरावाचा पाय कंपूंतून बाहेर पडत नाहीं. इंग्रज बळावले. इंग्रजमय होतें यांत संशय नाहीं." नाना मोकळा झाला त्याचा उपयोग दौलतरावास कांहींच होईना. 'बाजीराव द्विमुख आहे. कोणीकडे कल देतील न कळे.' नानावर शह म्हणून मोरोबादादास सोडून शिवनेरीस आणलें. असे दौलतरावानें शहाला शह दिले, पण त्यांचाहि उपयोग होईना. दुर्जन ( Drugen ) वगैरे कंपूंचे

अधिकारी फितले होते. तेव्हां कोणाचाच कांहीं भरंवसा देतां येईना. तेव्हां या सर्व कलहाचें आदिकारण जो सर्जेराव त्यास दूर करण्याचें दौलतरावानें ठरविलें. सर्जेरावाचें दुर्दैव ओढवलें व लगेच एक कारणहि झालें. फकीरजी गाढव्याच्या पलटणांतील पाहरेकऱ्यास सर्जेरावानें जखमी केलें; त्यावरून ता. २५ जुलै १७९८ रोजीं " घाडगे, गाढवे, यादो भास्कर व त्यांचा बंधु असे चौघे कैद केले. मूकेल फिरंग्याच्या मुलानें धरिलें. सर्जेरावाच्या मुसक्या बांधून बाजारांतून बंदुकीच्या कुपणानें मारीत पलटणांत घेऊन गेले. तेथें एक दिवस शेतखान्यांत कोंडून ठेविलें होतें. दुसऱ्या दिवशीं बाहेर काढून पहाऱ्यांत ठेविलें. त्याचा गोट लुटला. घाडग्यास जखम झाली."

सर्जेरावानें लाविलेली ही आग फार भडकली. सर्जेरावास कैद करूनसुद्धां आतां भागेना. लक्ष्मीबाई व यमुनाबाई या महादजी शिंद्याच्या दोन्ही स्त्रिया मोठ्या धीट आणि घोड्यावर बसण्यांत पटाईत होत्या. त्या आतां पुण्याहून जांबगांवास गेल्या. त्या दोघी केव्हां एकत्र तर केव्हां वेगळ्या राहून मुलूखगिरी करीत. त्यांचा दौलतरावावर काडीइतकाहि विश्वास नव्हता. त्यांनीं त्याचें मुखावलोकनहि केलें नाहीं. असो.

आतां आपणांस बायांच्या बंडाशीं फारसें कर्तव्य नाहीं; कारण तो आपला प्रस्तुतचा विषय नाहीं. बायांच्या बंडाचें आदिकारण सर्जेराव असल्यामुळें तेवढ्यापुरता विस्तार केला. आतां सर्जेरावास अटक झाली, व पुढें दौलतरावानें बाळोबा तात्या पागनिसास बंधमुक्त केलें. त्यानें आपलें वजन व बुद्धिसर्वस्व खर्च करून बाया आणि दौलतराव यांचा समेट केला, पण तोसुद्धां क्षणभंगुरच ठरला; आणि त्याला कारणहि सर्जेरावच! त्यानें बायांच्यावर मारेकरी घातले. तो कथाभाग असाः—

मोठ्या कष्टानें व मिनतवारीनें बायांशीं समेट होऊन त्या भीमेच्या कांठीं तुळापुरास येऊन राहिल्या. सुमारें दोन महिने दौलतराव व बाया यांच्यामध्यें कांहींएक कुरबुर न होतां कसेबसे पार पडले; पण नंतर पुन्हां या भांडणानें चेत घेतली. दौलतराव व बाजीराव हीं दोन नादान माणसें मराठी राज्याच्या मुख्य ठिकाणीं सर्वसत्ताधीश असल्यामुळें मराठी राज्याचें वाटोळें झालें ! स्वतःस उरक नाहीं व दुसरा करतो तें साहत नाहीं, असली मत्सरी व आत्मघातकी वृत्ति दोघांची असल्यामुळेंच यापुढील बनाव झाला. शहाण्या माणसांमध्यें आलेलीं वितष्टें नाहींशीं होण्यास व त्यांची

चित्तशुद्धि होण्यास फारसा वेळ लागत नाहीं. नाना फडणीस, परशुरामभाऊ, बाळोबा तात्या पागनीस हे तीन पराक्रमी व कर्तबगार पुरुष एकत्र होऊन त्यांनीं मराठी राज्यास आळा घालण्याचें ठरविलें व एकेक प्रकरणाचा फडशा पाडण्यास सुरुवात केली. बाळोबानें बायांचें प्रकरण निकालांत काढलें तों करवीरकरांशीं चाललेल्या पट्टणकुडीच्या लढाईत भाऊ पडल्याची वार्ता आली. ती बाळोबास कळतांच त्यानें बाजीरावाकडे जाऊन चौघडा बंद करविला आणि करवीरकरांचें पारिपत्य करण्यासाठीं फौज रवाना केली. पैसा नव्हता, तर तोहि स्वतःचे पदरचा देवविला.

अशा तऱ्हेनें बाळोबा व नाना यांनीं एकेक गोष्ट निकालांत काढण्याचा तडाखा चालविला. बायांची समजूत काढून शिंद्याच्या घरचा तंटा मिटविला व करवीरची मोहीम स्वतःच्या हिंमतीवर सुरू केली. या गोष्टी पाहून बाजीराव व दौलतराव या दोघांस समाधान वाटेना; उलट त्यांची त्यांस भीति वाटूं लागली. कारण हे मुत्सद्दी जर अकलेच्या बळावर एक एक काम असें उरकूं लागले तर मग आपण धनी निर्माल्यवत् होणार! भाऊ मेल्यानें नाना आतां कमजोर झाला होता व तो राज्यकारभाराविषयीं उदास होता; पण शिंद्याचे पदरची शेणवीमंडळी फार जोरदार व एकजुटीनें कामें करण्यांत पटाईत; तेव्हां त्यांस नरम करावयाचें म्हणजे त्यावर तोड फक्त सर्जेराव घाडगाच काय तो होता, कीं जो शेणवी सरदारांचेमागें शनीसारखा लागेल. तेव्हां त्यास सोडण्याची सल्ला बाजीरावानें शिंद्यास दिली व शिंद्यासहि तें हवेंच होतें. बाळोबाशीं तंटा वगैरे न होतां हें काम दौलतरावानें मोठ्या युक्तीनें पार पाडलें. सर्जेरावास सोडण्याबद्दल बायजाबाईनें दौलतरावाजवळ हट्ट धरिला व उपासतापास करून त्रागा चालविला. तिच्याबरोबर दौलतरावानेंहि उपोषणें सुरू केलीं. कारभारी घाडग्यास सोडीत नाहींत म्हणून यजमान-यजमानीण उपोषणें करतात, अशी लोकांत चर्चा सुरू झाली. तेव्हां कारभारी भ्याले व आपणांवर अपवाद नको म्हणून सर्जेरावानें कारभारांत कोणताहि भाग घेऊं नये, स्वस्थ असावें, या अटीवर त्याची मुक्तता करण्यास बाळोबानें परवानगी दिली. त्याबरोबर दौलतरावानें ता. ४-१-१८०० रोजीं सर्जेरावास नगरास बंधमुक्त करून आपल्या डेऱ्यास आणिलें आणि वस्त्रें व खर्चास रोख रक्कम देऊन त्याचा बहुमान केला.

अशा तऱ्हेनें सर्जेराव एकदांचे बंधमुक्त झाले. घाडग्यासारखा महापरा-

क्रमी पुरुष, कोणतेंहि आणि कितीहि वाईट कृत्य करण्यास केव्हांहि न डरणारा असा हा आग्यावेताळ बाहेर पडतांच पुन्हां जिकडे तिकडे अग्नीचे डोंब उसळूं लागले. घाडग्याच्या सुटकेची वार्ता करवीरकर छत्रपतींस कळतांच त्यांस फार आनंद झाला; व आतां आपणावरील मोहीम थंड पडणार, नच पडली तर आपण ती माघारीं परतवूं अशी त्यांस उमेद उत्पन्न झाली. सर्जेरावानें कैदेंतून बाहेर येतांच दहाच दिवसांनीं पहिला पराक्रम केला; तो म्हणजे त्यानें बायावर मारेकरी घातले हा होय. ता. १४-१-१८०० रोजीं प्रहर रात्रीस धाकटी यमुनाबाई ही निजली असतां तिजवर कोणीं हत्यार चालविलें. पाठीवर तरवारीचा एक वार भारी लागला. गडबड उडाली. तेव्हां एक मारेकरी ठार झाला व एक जखमी झाला, व एक अजात सांपडला; त्यास मारपीट व धाकदपटशा दाखवून चौकशी करतां त्यानें सर्जेरावाचें नांव लिहून दिलें; आणि बायांस जिवे मारावें असा बेत सांगितला. त्यावरून जामीन राहिलेले बाळोबा, आबा चिटणीस व पलटणवाले सर्वच फजीत व लाचार झाले. यावरून बाया बिथरून पुन्हां त्यांनीं पूर्वीप्रमाणें धुमाकूळ सुरू केला.

सर्जेरावाच्या या साहसानें पुन्हां सर्व घडी विस्कटली. त्याबरोबर बाळोबा यानें साफच सांगितलें कीं, 'मला हा कारभार नको; खुशाल बिडया घालून कैदेंत टाका, किंवा काशीयात्रेस जावयास कायमचा निरोप द्या.' सर्जेरावाच्या सुटकेची दहशत त्यास चांगलीच बसली. बाळोबानें वाडयांत जाण्याचें सोडलें. तो दरबारास हजर राहीना. सर्व कारभार ठिकच्या ठिकाणीं थंड झाला. यशवंतराव शिवाजीनें धरणेंच धरिलें आहे असें निमित्त करून बाळोबानें त्यास आपल्याजवळ कायमचें ठेवून घेतलें. असा हा घोळ आठ दिवस पडून होता. हा एकंदर गोंधळ पाहून दौलतरावासहि पंचाईत पडली, तेव्हां त्यानें बाळोबाकडे पुन्हां मध्यस्थी घालून त्यास बोलावून आणिलें; आणि तात्या, धोंडीबा, आबा चिटणीस, यशवंतराव शिवाजी, बाजीबा मोदी, यादो भास्कर, नारायणराव बक्षी, बाणाजी शेटे व तिघे कंपूवाले या सर्वांच्या समक्ष प्रहरपर्यंत दौलतरावाशीं सर्व गोष्टींची चर्चा झाली व असें ठरलें कीं, सखाराम घाडगे यास पोटापुरतें देऊन कायमचें बाहेर काढावें, निदान चांगल्या नजरबंदींत ठेवावें; आणि सर्वांनीं तात्यांच्या तंत्रानें चालावें. त्यांस वाटतील तीं माणसें त्यांनीं कारभारांत घ्यावीं व नको असतील त्यांस दूर

करावें. असा ठराव सर्वांच्या समक्ष झाला, पण तो ठराव कागदावरच राहिला. त्याचा कांहींएक उपयोग न होतां बाळोबा तात्या पागनिसांचें बस्तान सर्जेरावाच्या सुटकेपासून जें बिघडलें तें कायमचेंच. एवढा मोठा कर्तबगार पुरुष, पण त्याचा शेवट शेवटीं तुरुंगांतच झाला. अशा तऱ्हेनें शिंद्यांच्या गादीची केलेली सेवा उलट्या अर्थानें फळास आली. बिचाऱ्याच्या आत्म्यानें तळतळाट दिले असतील!!

बाजीरावानें नानाच्या पायधरणीचें नाटक एकदां केलें होतें; बरोबर त्याचीच पुनरावृत्ति दौलतरावानें केली. ता. २२-५-१८०० रोजीं बाळोबाच्या घरास दौलतरावाची सडी स्वारी जातीनें गेली व त्याच्या पायांवर अक्षरशः डोकें ठेवून कारभार सांवरण्याविषयीं अर्जी केली. या वेळीं बाळोबा, दौलतरावाचे थेर पाहून व सर्जेरावानें बायांवर घातलेले मारेकरी पाहून चिडून गेला होता. त्यानें उत्तर केलें, "तुझें तूं आटोपून घेऊन बंदोबस्त करावा. मला अगत्य नाहीं. माझा वृद्धापकाळ झाला. महायात्रेस मार्गस्थ करावें; किंवा तुम्हांजवळच आहें." या नाटकानंतर अवघ्या पांचव्याच दिवशीं दौलतरावानें बाळोबा, त्याची स्त्री व धोंडीबा यांस चकडबंद करून त्यांची नगरास रवानगी केली आणि सर्जेराव पुन्हां सत्ताधीश झाला.

सर्जेरावाच्या सत्तेचें आगमन मानवी रक्ताच्या लाल तुषारांनीं व चिळकांडयांनींच व्हावयाचें. तिच्यावर पुष्पवृष्टि व्हावयाची ती शिरकमलांची! भालदार ललकारावयाचे ते मारपीट असह्य झाल्यामुळें फोडलेल्या टाहोंचे! अशी ही अमंगल सत्ता शिंद्यांच्या दरबारीं पुन्हां सुप्रतिष्ठित झाली.

नाना फडणिसास पकडल्याबरोबर सर्जेरावानें पेशव्यांचा दरबार जसा होता नव्हतासा करून टाकला—एके दिवशीं (ता. २५-८-१७९८) नानाच्या पक्षाचे चार प्रमुख सरदार तोफेच्या तोंडीं दिले—तीच गत त्यानें शिंदेदरबारची केली. ता. ३१-५-१८०० रोजीं तुळाजी शिंदे, मानाजी वाबळे, व सुभानजी मोरे याचा लेक धुळोजी या तीन असामीस अस्तमान झाल्यावर डेऱ्यास बोलावून कैद केलें व लगेच त्यांस तोफेच्या तोंडीं दिलें! त्यांजवर आरोप ते बायांस सामील होते, असा होता. तो कितपत खरा-खोटा हें कोण पाहतो व वेळ कोणास? याच वेळीं नारायण जिवाजी बक्षी वगैरे वीस सरदार कैद केले व बक्षीशिवाय बाकीच्यांस तोफेच्या तोंडीं दिलें. पुढें ता. ८-७-१८०० रोजीं यशवंतराव, जिवाजी वागळे व काळु बहिरू लेका-

वळा यांस पांच पाट काढून, डोक्यांत शेंदूर घालून, नाक-कान छेदून लष्करांतून फिरवून त्यांस रात्रीस मेखसूंखालीं मारून टाकलें. धोंडीबा दादा पूर्वींच तेथें होता, त्यांनीं फितुर केला. त्याचा दस्तऐवजहि सांपडला. त्यास तेथेंच तोफेच्या तोंडीं दिलें. ईश्वर कृपा करून अब्रू राखीत तो निभावला. तूर्त सर्जेरावाची फत्ते झाली आहे. बाण अंगास बांधून बक्षीस उडवून मारिलें. बाण अंगास बांधून माणसें उडविण्याची ही शक्कल अगदीं सर्जेरावाच्या खास डोक्यांतील. बाणांनीं उडवून नारायणराव बक्षीचा प्राण गेला नाहीं, सबब त्याचें डोचकें मारिलें.

सर्जेरावाच्या प्रस्तुत कारभाराविषयीं एक चार ओळींचा उतारा देऊं व आतां हा लेख संपवूं—"या गोष्टी अतिरिक्त होतात असें जग बोलतें. परिणाम काय होतो पहावें. पुण्यांत घाडगे हत्या पाडावयास ईश्वरें निर्माण केला. ब्राह्मण मारावयास ईश्वरें प्रारंभ केला. बाळोबा तात्या व सदाशिव मल्हार जिवंत आहेत असें कळतें. आयुष्यमर्यादा असल्यास ईश्वर बुद्धि देईल तरी देऊं. बाळोबा तात्या नगरास होते ते १४ जमादिलावर मंदवारीं अकस्मात् मरण पावले. अगोदर ५-६ दिवस त्यांचे स्त्रीस जांबगांवास बलात्कारें करून आणिली. नंतर बाळोबाचा काळ जाहला. जवळ कोणी नाहीं, या तऱ्हेचा समय ईश्वरें दाखविला. त्या आधीं सदाशिव मल्हार याप्रमाणें पंधरा दिवसांचे अंतरानें कैलासवास केला. शेणव्यांचा ग्रंथ समाप्तींत गेला."



## ३ :: जिवावरचा प्रसंग व इतर हालचाली

सूर्यनारायणाच्या तेजाची दाहकता माध्यान्हींइतकी सदासर्वदा भासत नाहीं; त्याचें तेज मंदावत जातें. त्याप्रमाणेंच आतां सर्जेरावाच्या सत्तेचा सूर्य कलला. त्यांतील तेज कमजोर झालें; पण टवकारून पाहणाराचे डोळे दिपून जावयाचे व त्यांस कायमचा आयब व्हावयाचा, आणि स्पर्श करतांच हातास टरारून फोड यावयाचे, इतपत तेज त्यांत होतेंच. दौलतराव सर्जेरावाला पेशव्यांचे दरबारीं ठेवून उत्तरेंत कसा निघून गेला येथपासून चरित्रसूत्रास आतां आरंभ करावयाचा. तत्पूर्वी आतांपर्यंत घडलेल्या गोष्टींचें एकदां स्मरण करूं. सर्जेरावानें नाना तऱ्हेच्या हिकमती करून विश्वासघातानें नाना फडणिसास कैद केलें, त्याच्या पक्षाच्या लोकांचा अमानुष छळ केला व पुण्याची होळी केली. यानंतर महादजी शिंद्याच्या बायकांच्या अंगावर हात टाकून त्यांना नखाशिखान्त फोडून काढिलें. त्या-बद्दल कैद भोगिली. बंधमुक्त होतांच बायांवर मारेकरी घातले. शेणवी-सरदारांचा छळ केला. शिंदे-दरबारांतील मातबर सरदारांस आपला इंगा दाखवून यमसदनास धाडलें व आतां सर्जेरावाची ब्याद खुद्द बाजीरावाच्याच मागें लागली.

नाना फडणीस जिवंत असेतोंपर्यंत दौलतरावास उत्तरेस जातां आलें नाहीं. कारण बाजीराव त्यास जाऊं देईना; पण आतां नाना दिवंगत

झाल्यानें बाजीरावाचें भय नाहींसें झालें व त्यानें दौलतरावास उत्तरेस जाण्याची परवानगी दिली. बाजीराव आणि दौलतराव हे तर एकमेकांचे जिगरदोस्त ना! पण त्यांचीं तरी एकमेकांबद्दल मनें कोठें साफ होतीं ? आपल्या तडाक्यांतून बाजीराव सुटल्यास तो आपणास दगा देईल असा धाक दौलतरावास होताच; म्हणून त्यानें हिंदुस्थानांत जातांना सर्जेरावाच्या हाताखालीं एक पलटण देऊन त्यास बाजीरावाच्या संरक्षणार्थ ठेविलें. दौलतरावानें सर्जेरावास ठेवूं नये म्हणून बाजीरावानें पुष्कळ खटपट केली पण ती व्यर्थ गेली; कारण बाजीरावानें कबूल केलेली सत्तेचाळीस लाख रुपयांची रक्कम अद्याप शिंद्यास मिळाली नव्हती. तेव्हां ती वसूल करण्यासाठीं म्हणून त्यानें सर्जेरावास ठेविलें, हें पाहून बाजीरावानें खूप त्रागा केला; मी आपला एकटाच वाटेल तिकडे निघून जाईन असा धाक घातला; प्रस्थानें ठेविलीं आणि शनिवारवाड्यांतून कोथरूडचा वाडा, तेथून फडके-वाडा, नंतर पेठे, नंतर रास्ते अशा तऱ्हेनें या वाड्यांतून त्या वाडयांत व त्या वाडयांतून या वाडयांत त्रिरात्र राहण्याचा फार्स केला. हा त्याचा त्रागा पाहून ता. २३-११-१८०० रोजीं शिंद्यानें त्याची पुन्हां भेट घेतली. त्या वेळीं बाजीरावानें घाडग्यास काढण्याबद्दल अत्यंत गळ घातली. तेव्हां 'असें काय करतां ? मी त्यास हळूहळू बोलावून घेऊन जाईन, आपण निर्धास्त असा' असें सांगितलें व वेळ मारून नेली, आणि दौलतराव उत्तरेंत निघून गेला.

होळकरांच्या गादीचा वारस काशीराव हा जरा भोळा होता; त्यास बगलेंत मारून व पेशवेदरबारीं आपल्या हातांत असलेल्या सत्तेचा उपयोग करून होळकरांची दौलत खिशांत टाकण्याचा डाव दौलतरावानें टाकला होता. पण महापराक्रमी यशवन्तराव होळकरापुढें त्याचा हा सर्व खटाटोप वायां जाऊन त्यास त्या डावाचीं कटु फळें चांगलींच भोगावीं लागलीं. दौलतरावाचें घर आतां चोहों बाजूंनीं पेटलें होतें. बायांच्या बंडाचा उपशम झाला नव्हता. हंडयाच्या घाटाची लढाई, उज्जेनची लढाई व महेश्वर अगर इंदूरची लढाई या तीन लढायांत यशवन्तराव होळकरानें शिंद्यास चांगलाच मारून काढला. त्यामुळें दौलतराव अगदीं जेर आला व त्यानें सर्जेरावास आपल्याकडे ताबडतोब बोलाविलें. सर्जेरावास आपल्या जांवया-च्या बातम्या कळतच होत्या, व त्याच्या मदतीस जाण्याची इच्छा त्यास

अनेकवार होत होती; पण बाजीरावापासून सत्तेचाळीस लक्ष रुपये वसूल करण्याचें काम अजून संपलें नव्हतें. आपण प्रत्यक्ष उरावर असतांना पैसा निघत नाहीं, मग दूर गेल्यावर काय होणार, हें त्याचें त्यास चांगलें समजत होतें. तेव्हां बाजीरावास धाक दाखवून, कांहीं पेंचांत टाकून पैसे उकळण्याची सर्जेरावानें शिकस्त केली; पण म्हणावा तसा उपयोग होईना. उलट दौलतरावाच्या पराजयाच्या बातम्या ऐकून व सर्जेरावास तिकडे जाण्याची निकड पाहून बाजीराव जास्त निगरगट्ट बनला. बरें, पैशाशिवाय दौलतरावाकडे जावें तर त्याचा कांहींएक उपयोग नव्हता. पैशाच्या योगें त्याच्या पुष्कळशा अडचणी दूर होणार होत्या; तेव्हां सर्जेरावास आतां मोटा पेंच पडला होता. असें जरी होतें तरी बाजीरावास सर्जेरावाचा जाच आतां असह्य झाला. त्यास मारेकरी घालून ठार मारण्याचा बेत बाजीरावानें बाळाजी कुंजिराच्या मार्फत रचला, व तो बनाव इतक्या शिताफीनें तडीस नेला कीं, सर्जेराव एवढा जहांबाज व चाणाक्ष पण तोसुद्धां फशीं पडला. आयुष्याची दोरी बळकट म्हणूनच त्या फांसांतून तो निसटला!

दौलतरावाचीं निकडीचीं बोलावणीं येत होतीं म्हणून घाडग्यानें परत जाण्यासाठीं आपली फौज जमा केली. चतुरसिंग भोसले व आप्पा देसाई निपाणकर यांस जवळ बोलावून घेतलें, आणि ता. २१-६-१८०१ रोजीं दोनशें लोकांनिशीं पुण्यांत येऊन पाटणकरांच्या वाड्यांत तळ दिला व बाजीरावाशीं पैशाच्या बाबत बोलणें सुरू केलें. या वेळीं बाजीरावाचें धोरण अत्यंत मवाळीचें व आर्जवाचें होतें. बाजीराव व कुंजीर यांनीं घाडग्याचें प्रत्येक मागणें कबूल करावें व केंविलवाणीं तोंडें करून दरबार साजरा करावा, अशा तऱ्हेनें एकेक प्रश्न निकालांत निघालासें दाखवावें. बोलण्यांत मधुरता इतकी, कीं साखरेची गोडी फिकी वाटावी, असा कुंजीर व बाजीराव यांनीं आपल्या वागणुकीचा थाट ठेवला. कुंजिरानें सर्जेरावास आपल्या घरीं मोठ्या प्रेमानें भोजनास बोलाविलें. ता. २६ जूनला घाडगा कुंजिराचे घरीं भोजनास गेला; पण तेथें जातो तों त्यास हुजरातीच्या लोकांनीं धरणें धरलेलें दिसलें; भोजनाचा विधि मोठ्या प्रेमानें तडीस गेला. भोजनोत्तर घाडग्यानें पैशाचें बोलणें काढतांच कुंजीर त्यास म्हणाला, आपण या गोष्टीचा खल या सर्व लोकांसमक्ष करणें बरें नाहीं, तेव्हां जरा बाजूस जाऊन बोलूं. त्यानंतर चार निवडक माणसें बरोबर घेऊन दोघेहि आंतल्या दिवाणखान्यांत गेले.

थोडें बोलणें झाल्यावर कुंजिरानें कांहीं कामानिमित्त बाहेर जाण्याचा बहाणा केला, त्याबरोबर चाणाक्ष सर्जेरावापुढें खाड्कन् सर्व प्रकाश पडला, व त्यानें कुंजिराचें कपट ओळखिलें. तात्काळ घाडग्यानें एका हातानें कुंजिराचा गळा दाबून दुसरा समशेरीस घातला. कुंजीर त्या वेळीं थोडी जरी गडबड करता तरी त्यास सर्जेरावानें ताबडतोब कंठस्नान घातलें असतें. कुंजीर बाहेर येतांच मारेकऱ्यांनीं आंत जाऊन घाडग्याचें काम काढण्याचा विचार ठरला होता; पण घाडग्याच्या प्रसंगावधानामुळें तो बचावला. घाडग्यानें कुंजिरास रस्त्यावर आणिलें आणि आपण घोड्यावर स्वार होऊन चालता झाला. अशा तऱ्हेनें बाजीरावानें सर्जेरावावर मात केली, पण घाडगा त्यांतून मोठ्या शिताफीनें निसटला.

सर्जेराव म्हणजे आधींच बेफाम वृत्तीचा; त्यांतून त्याच्या या आसुरी वृत्तींत बाजीरावाच्या कपटकारस्थानानें जास्तच भर पडली व त्या मोकाट सुटल्या. शनिवारवाडा व पुणें शहर जाळून खाक करतों अशा नाना तऱ्हेच्या वल्गना करून त्यानें दोन दिवस लढाईच्या तयारीनें फौजा ठेवल्या; त्याबरोबर सर्व पुण्यांत हाहाःकार उडाला. बाजीरावाची हबेलंडी उडाली. त्यानें घाडग्याचीं आर्जवें चालविलीं. त्या कामीं रेसिडेन्ट पामरची शिफारस त्यानें आणली; पण घाडग्याची समजूत पडण्याचा रंग दिसेना. पुन्हां एकदां पुण्याची होळी होणार आणि असंख्य लोकांचे घाडगा बळी घेणार असा रंग दिसूं लागला; पण त्या दयाघन परमेश्वरास दया आली, व त्यानें हा प्रसंग टाळला. कारण शिंद्याची उत्तरेंत फारच हलाखी झाल्याचें वृत्त आलें, त्यामुळें सर्जेरावास पुण्यास राहणें अशक्य झालें. तेव्हां आपला मुलगा हिंदुराव व आपा देसाई निपाणकरास बाजीरावाजवळ ऐवज उकळण्यासाठीं ठेवून ता. १२-७-१८०१ रोजीं त्यानें पुण्याहून कूच केलें. पण जातांना त्यानें मुलूखचे मुलूख व प्रान्तचे प्रान्त बेचिराख केले, आणि नाना तऱ्हेचे अत्याचार करीत तो चालला. त्याचीं वर्णनें वाचलीं म्हणजे डोळ्याचें पाणी खळणार नाहीं—" दोन प्रहरीं सर्जेरावाची स्वारी प्रवरा-संगमीं प्राप्त झाली. अगोदर कंपू पुढें आली. त्याची ग्वाही संगमांत गेली. त्यांनीं लांकूडफाट्याकरितां पांचचार घरें झोंबडलीं, दो-चौ घरचीं पांघरुणें वस्तभाव हातीं लागेल तें नेलें. त्यावर खासा आल्यावर बाळंभट आपाचे भेटीस गेले. भेट घेऊन हात जोडून उभा राहिला, कीं तुमची आज्ञा होईल

तर बसेन. मग आप्पा बसा म्हणाले तेव्हां बसला. गांवांत उपद्रव न करण्याचें कबूल केलें."

अत्याचार करतांनासुद्धां सर्जेराव तरतमभाव जाणीत होता. अशा तऱ्हेनें घाडगा ऑगस्टअखेर बऱ्हाणपूरला पोंचला. तेथून लगोलग निघून सप्टेंबरांत नर्मदापार होऊन दौलतरावास मिळाला.

सर्जेराव घाडगा येऊन मिळतांच दौलतरावास पुष्कळच धीर आला. या वेळीं यशवंतराव उज्जनीअलीकडे चार मैलांवर होता. लखबादादाची कांहीं फौज होळकराच्या साह्यासाटीं आली होती. शिंदा नर्मदेच्या उत्तर-तोंडीं हंडिया येथें होता. होळकरानें उज्जनीचा विध्वंस केला, त्याचा सव्याज वचपा आपण इंदूरवर काढावा असा सर्जेरावाचा मानस होता. दोन्ही फौजांच्या लहानसहान चकमकी एकसारख्या होऊं लागल्या. ता. ९-१०-१८०१ रोजीं दोन्ही सैन्यांच्या आघाडीची गोळागोळी झाली. ता. ११ रोजीं लढाई मातबर होऊन होळकराचे तीन हजार मनुष्य जाया होऊन त्यांच्या शंभर तोफा आणि इंदूर व उज्जनी दोन्ही ठाणीं शिंद्यांनीं हस्तगत केलीं. " विजयादशमीस ( १७ ऑक्टोबर ) खासा शिंदे रेवापार झाले. शिंद्याची छत्री तात्पुरती होळकरावर पडली. इंदूर शहरांत लूट, जाळपोळ व कत्तल करून सर्जेरावानें उज्जनीचा सूड पुरेपूर उगविला. इंदूरच्या लोकांनीं १५ लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें, तरी तें न जुमानतां इंदूरची लूट करून वाडे जाळून खोदून काढिले; परंतु यशवंतराव बिलकुल डगमगला नाहीं. त्याचा सरदार शामराव महाडीक कंपू घेऊन बाहेर होता, त्यास यजमानांचीं पत्रें गेलीं कीं, 'प्रसंग अडचणीचा, तुम्हीं रात्रीचा दिवस करून यावें. परंतु तो येण्यापूर्वींच लढाई शिकस्त झाली. "

असल्या पराभवांनीं आणि कत्तलींनीं घाबरून जाण्याइतका ढिल्या तब्येतीचा यशवंतराव नव्हता. त्यानें आतां कपटनीतीचा अवलंब केला आणि शिंद्याच्या फौजेंत फितुर केला. उलट पक्षीं शिंद्यांनींहि दुद्रनेक या होळकराच्या अधिकाऱ्याला फितविलें; पण होळकराची सेना यशवंतरावावर प्रेम करणारी व प्रामाणिक होती. त्यांनीं दुद्रनेक होळकरास सोडून शिंद्या-कडे येत असतां पोबारा केला व पुन्हां होळकराच्या झेंड्याखालीं ते जमा झाले. ता. ३०-१०-१८०१ रोजीं पुन्हां मोठी मातबर लढाई होऊन त्यांत सर्जेरावाचा पराभव होऊन तो मागें हटला. या चकमकींत शिंद्याचें एक

पलटण व दीड हजार स्वार ठार झाला. यानंतर त्यांनीं आपला तळ उज्जनीकडे हालविला; पण येथेंसुद्धां सर्जेरावाचा होळकरानें पिच्छा पुरविला व त्यास त्राहि भगवन् करून सोडलें.

यशवंतरावानें भोंवतालीं घिरट्या घालून एकसारखे छापे घातले व शिंद्याच्या फौजेचा उच्छेद मांडिला. यानंतर कांहीं चकमकी झाल्या त्यांत दौलतरावाचा मोड झाला; आणि अगदीं टेकीस येऊन त्यानें समेटाचें बोलणें सुरू केलें. 'पूर्वी तुकोजीरावाशीं केलेले करारमदार मान्य करण्यास तुम्ही तयार असाल तर समेट होईल' असें उत्तर यशवंतरावानें दिलें. तें दौलतरावास मान्य न होऊन पुन्हां चकमकीस सुरुवात झाली. या वेळीं बाजीरावास धनीपणाची आठवण होऊन तो गाजविण्याची लहर आली आणि त्यानें आपल्या दोन्ही सरदारांस फर्मानें धाडिलीं कीं, 'शिंदे-होळकरांनीं एकदम असतील तेथें युद्धें थांबवावीं. आपसांत विरुद्ध वागून महालनिहाय उपद्रव करितात तो करूं नये. उभयतांचा समजुतीचा तह सरकारांतून ठरून आज्ञा होय तोंपर्यंत शिंद्यांनीं आपले सरदारांसह आशेरी बऱ्हाणपूरचे मैदानांत रहावें आणि होळकरांनीं आपले सरदारसुद्धां तापी-उत्तरतीरीं थाळनेरास रहावें. दरम्यान लढाई करूं नये.' हे हुकूम मान्य करण्याइतकी पुण्याई बाजीरावाजवळ आतां उरली नव्हती. अशाच अर्थाचें आणखी एक पत्र शिंद्यास गेलें होतें; 'यशवंतराव होळकर व सर्जेराव यांची लढाई होऊन इंदूर शहर तुम्हीं व उज्जन होळकरांनीं लुटिलें हें नीट नाहीं. सर्जेरावांनीं सौ. आनंदीबाई होळकर यांचा खाजगी तालुका लुटला; तरी सर्जेरावास निक्षून ताकीद करून घेतलेला वसूल माघारीं देणें.' ह्या बाजीरावाच्या फर्मानांस उभय पक्षांनीं धाब्यावर बसविलें हें सांगणें नलगे.

अशा तऱ्हेनें शिंदे-होळकरांच्या झटापटी चालल्या होत्या. एकमेक एकमेकांचे लचके तोडीत होते. शिंद्यास स्वार्थानें पछाडल्यामुळें तहाची भाषा होईना. इकडे पुण्यास पेशव्यानें या पेटलेल्या खाईंत कुंजिराच्या बदसल्ल्यानें विठोजीच्या वधाचें तेल ओतल्याबरोबर ही आग जास्तच भडकली. विठोजीच्या वधाचा सूड घेण्यासाठीं म्हणून यशवंतराव पुण्यावर चाल करून गेला व त्यानें पुण्याचा कबजा घेतला. बाजीराव पळून कुंजिराच्याच सांगण्यानें इंग्रजांच्या आश्रयास गेला. त्या वेळीं अमृतराव व यशवंतराव यांनीं मिळून पुण्यांत मराठमंडळाची जूट करण्याचा घाट घातला

होता; पण त्यांत शिंद्यास न मिळूं देण्याची पुण्याई सर्जेरावानें जोडली. त्या वेळीं शिंदा होळकरास मिळता तर मराठ्यांचा इतिहास निराळ्या तऱ्हेनें लिहिण्याचें भाग्य लाभलें असतें; पण वसईच्या नादान तहावर सह्या झाल्या आणि इंग्रजांचें भाग्य बळावलें.

बाजीराव इंग्रजांच्या स्वाधीन झाला व यशवंतरावानें बेजरब तडाके दिले, त्याबरोबर दौलतरावाची दृष्टि खाडकन् उघडली; आणि त्याची खात्री झाली कीं, बाजीराव नादान तर खराच, पण त्याच्या नादीं लागणारे आपण महामूर्ख; व त्यामुळें आपलें वाटोळें झालें. त्यांतून आपणाजवळ असणारा सर्जेराव म्हणजे पदरांत बांधिलेला निखाराच. त्याच्यामुळें अवघ्या दौलतीचा खराबा होऊन नारळाची आई हातीं घेण्याचा वखत आला; तेव्हां या घर-बुडव्यास प्रथम दूर करावें असें त्याच्या मनांत आलें व तसें त्यानें केलें. इ. सन १८०३ ला सर्जेराव दौलतरावास सोडून कोल्हापुरास आला. यानंतर त्यानें बाजीरावाकडे पैगाम लावून पुण्याच्या कारभारांत येण्याचें ठरविलें. घाडग्याबरोबर बाळाजी जनार्दन जांबगांवकरांचे बंधु बापू जनार्दन आहेत. घाडग्याकडून बंडवाल्यांचीं वगैरे पारिपत्यें करून राज्याचा बंदोबस्त करावा असा श्रीमंतांचा मानस आहे. कांहीं दिवस त्या बाबतींत वाटाघाट होऊन ता. २४-९-१८०३ रोजीं घाडग्यानें ४०० लोकांनिशीं पुण्यास येऊन श्रीमंतांचें दर्शन घेतलें. श्रीमंत घाडग्यावर फार खूष. त्याची तारीफ करितात, घाडग्यासारखा मनुष्य नाहीं असें म्हणतात. नंतर घाडग्यानें थोडीबहुत फौज जमा करून बाजीरावाच्या विरुद्ध असणाऱ्या लोकांची खोडकी मोडिली. पण घाडगा पुण्यास फार काळ राहूं शकला नाहीं. पुढें इंग्रजांचें युद्ध संपून शिंद्याची वाताहात झाली तेव्हां सर्जेराव पुन्हां दौलतरावाकडे गेला.

याच सुमारास दौलतराव बऱ्हाणपूर सोडून निघाला तो हलके हलके मजला मारीत नर्मदेवर आला. बऱ्हाणपुराहून निघतांना उज्जनीकडे जाण्याचा शिंद्याचा मानस असावा असें रेसिडेन्टास वाटत होतें; पण नर्मदेवर येतांच शिंद्यानें आपली दिशा बदलली. उत्तरेकडे न जातां नर्मदेच्या कांठानें पूर्वेकडे कूच चालविलें व हुशंगाबादेजवळ नदीपार होऊन बुंदेलखंडांत जाण्याचा विचार चालविला. शिंद्यानें आपली चाल अशा विलक्षण तऱ्हेनें बदललेली पाहून रेसिडेन्टास अचंबा वाटला. हुशंगाबाद व त्याजवळचे

कांहीं परगणे भोपाळच्या नबाबाशीं युद्ध करून नागपूरच्या रघूजी भोसल्यानें इ.स. १७९५ च्या सुमाराला घेतले होते, ते इ. स. १८०३ मध्यें जेव्हां शिंदे-भोसल्यांचें इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें त्या वेळीं संधि साधून भोपाळच्या नबाबानें आपले गेलेले परगणे पुन्हां घेतले. तेव्हां हे परगणे आपले आपणांस परत मिळवून द्यावेत म्हणून भोसले आणि शिंदे यांजमध्यें गुप्त करार झाला असावा असा सुगावा रेसिडेन्टास लागला. उज्जनीचा मार्ग सोडून शिंदा हुशंगाबादेकडे कां वळला याचा निकाल रेसिडेन्टाच्या मनास आतां लागला. शिंद्याची ही बदललेली चाल पाहून आधींच गांगरलेला रेसिडेन्ट, सर्जेराव घाडगा याच सुमारास तेथें प्रकट झालेला पाहून जास्तच गांगरला; त्याच्या मनांत आतां शिंद्याच्या धोरणाविषयीं शंकाच राहिली नाहीं. दौलतराव-सर्जेराव या दोन ग्रहांची युति कुंपणीसरकारास भोंवणार असें त्यास वाटूं लागलें.

दक्षिणेंत मराठे-सरदारांची जूट करून इंग्रजांचा पाडाव करण्याच्या हेतूनें सर्जेराव दक्षिणेंत गेला होता; व या आपल्या मानसाबद्दल त्यानें बाजीरावादि मराठेमंडळींचा विचार घेऊन ही स्वारी आतां पुन्हां दौलतरावाकडे दाखल झाली होती. जातांना दौलतरावानें जरी त्यास काढून लाविला होता, तरी आतां तो इंग्रजांचा पाडाव करावयाचा या भव्य व उदात्त हेतूनें प्रेरित होऊन आला होता, म्हणून पुन्हां घाडगा शिंद्याजवळ येतांच त्याची चलती सुरू झाली खुद्द दौलतराव त्याच्याशीं नमून वागत असल्यामुळें इतरांस तो सहज वाकवी. सर्जेरावाचीं कारस्थानें सुरू झालेलीं पाहून भोपाळच्या नबाबाचे वकील इंग्रज रेसिडेन्टकडे पत्रें घेऊन आले व म्हणूं लागले कीं, "शिंदे हुशंगाबादेवर चालून येतात; व ते हुशंगाबाद व त्याजवळील आमचे परगणे आमचेजवळून जिंकून नागपूरकर भोसल्यास देणार, व या कार्यानिमित्त त्यांनीं भोसल्याजवळून भली मोठी रक्कम घेतली आहे. हें कारस्थान तडीस नेण्यासाठीं इंग्रजांची फौजहि त्यास मदत करणार असा आमचा तर्क आहे. तरी इंग्रजांनीं कृपाळु होऊन आमचा सांभाळ करावा, आणि आमचे परगणे आमचे हातून जाणार नाहींत असा बंदोबस्त करावा." वकिलाचीं हीं पत्रें वाचून रेसिडेन्टाची खात्रीच झाली कीं, मराठ्यांचें कांहीं तरी फार मोठें कारस्थान शिजत आहे. शिंदे व भोसले यांचें संगनमत होऊन कांहीं तरी करारमदार झाले असावेत; मग ते सर्व मराठ्यांनीं

मिळून इंग्रजांस मारून काढण्याचे असोत वा नुसते मुलुखगिरी करण्याचे असोत. या शंकाकुशंकांचें निरसन करून घेण्यासाठीं म्हणून रेसिडेन्टानें शिंद्याची गांठ ता. ११-८-१८०४ ला घेतली व त्यास स्पष्टच विचारलें कीं, "अलीकडे होळकरांची वकीलमंडळी आपणाकडे येतात. सर्जेरावाचीं व त्यांचीं खलबतें आपल्यासमक्ष चालतात. तेव्हां आपला काय विचार आहे? सर्जेराव घाडग्याचा दुष्ट स्वभाव आपणास चांगला माहीत आहे. तो स्वार्था-पलीकडे कांहीं जाणत नाहीं. मानापमान, युक्तायुक्त, न्याय्यान्याय्य, सुकर्म-कुकर्म याची त्यास बिलकुल पर्वा नाहीं. साधी माणुसकीहि त्याच्याजवळ नाहीं. वाटेल तीं अनन्वित कृत्यें करून स्वतःची तुंबडी भरण्यापलीकडे तो कांहींएक जाणत नाहीं. त्याच्या दुष्ट कृत्यांमुळें व सैतानी लीलांमुळें आपणांस कायमचा काळिमा आला म्हणून त्यास आपण गेल्याच वर्षी दूर केलें. असें असतां पुन्हां सर्जेराव आपल्या कारभारांत ढवळाढवळ करतो याचा अर्थ काय? त्यास दूर करणें ही आपल्या हिताची गोष्ट आहे."

या प्रश्नास दौलतरावानें उत्तर केलें कीं, "तुमचे आमचे जे करार ठरले आहेत त्यांत थोडासुद्धां फरक होणार नाहीं. आमचें व होळकरांचें जमणें कालत्रयींहि शक्य नाहीं. तुम्हीं उगीच मनांत कुतर्क आणूं नयेत; त्यापासून फायदा उभय पक्षीं नाहीं. आमचा दिल साफ आहे, आपलाहि असावा. आतां सर्जेराव आमचे आप्तसंबंधी आहेत; तेव्हां त्यांना कायमचें दूर करणें केवळ अशक्य. त्यांना आपल्याप्रमाणें आम्हीहि पूर्ण ओळखतों. आम्ही त्यांची कांहीं तोड काढावी म्हणून ते आले आहेत. तेव्हां त्यांच्या सांगीनें आम्ही आमचे विचार बदलूं असें होणें नाहीं. त्यासंबंधीं आपण निःशंक असावें. आम्ही त्यास कारभारावर नेमीत नाहीं. कारभाराची अखत्यारी बापू विठ्ठलकडे आहे. त्यांच्यावर आमचा पूर्ण भरंवसा आहे; व ते कारभार नीट करीत आहेत."

या भेटीनंतर पुढें एक महिन्यानेंच बापू विठ्ठल मरण पावला. लगेच शिंद्याच्या दरबारीं चलबिचल झाली व सर्जेरावाचा जोर झाला. सर्जेरावानें एकसारखें आपलें संधान होळकराशीं चालू ठेविलें. हें पाहून रेसिडेन्टास पुन्हां दौलतरावाविषयीं शंका आली; आणि त्यानें पुन्हां 'होळकरांशीं तुमचें वर्तन कसें ठेवणार?' असा प्रश्न विचारला. या प्रश्नास समाधानकारक उत्तर न देतां शिंदा बऱ्हाणपूर सोडून उत्तरेकडे निघाला.

या वेळीं आपण कोठें व कोणत्या मार्गानें जाणार याचीहि दाद दौलतरावानें रेसिडेन्टास दिली नाहीं. तेव्हां रेसिडेन्ट जास्तच घाबरला, व आतां शिंद्यास जाबजबाब न विचारतां यापुढें आपण काय धोरण ठेवावें याचा खुलासा गव्हर्नर जनरलकडून मागविला. या वेळीं इंग्रज आणीबाणीच्या प्रसंगांत होते; त्यामुळें दौलतरावाशीं चढाईचें धोरण न ठेवतां नरमाईनेंच घ्यावें असें ग.ज.नें रेसिडेन्टास कळविलें. पण हें धोरण संभाळणें दिवसानु-दिवस रेसिडेन्टास जड जाऊं लागलें. कूच चालू असतां रेसिडेन्टास कांहींच वर्दी न देतां दौलतरावाने हुशंगाबादेचा मार्ग धरिला. या वेळीं रेसिडेन्टाची प्रकृति नादुरुस्त होती म्हणून तो चार दिवस मागें राहिला व चार दिवसां-नीं त्यानें शिवनी येथें शिंद्यास गांठलें, तों शिंद्याची फौज हुशंगाबादेवर चाल करून जाण्याच्या तयारींत होती. या फौजेवर सर्जेरावाची देखरेख होती. तेव्हां रेसिडेन्ट वेब यानें जेंकिन्स यास तांतडीनें दौलतरावाकडे पाठविलें व विचारलें कीं, "इंग्रजांचा व तुमचा दोस्तीचा करार असतां त्यांना कळविल्यावांचून तुम्ही त्यांच्या दोस्तांशीं युद्ध करतां हें रास्त नाहीं. त्यावर दौलतरावानें जबाब दिला कीं, "भोपाळचा नबाब आमचा मांड-लिक आहे, आणि त्याच्याशीं कसें वर्तन ठेवावें हें आम्ही चांगलें जाणतों, त्यांत इंग्रजांनीं उगाच मध्यस्थी करूं नये. आम्हांस पैशाची तंगी असल्या-मुळें हुशंगाबादेच्या मार्गानें जावें लागत आहे, आणि शक्य तितक्या लौकर फौज जमवून आम्ही इंग्रजांस सामील होऊन होळकरावर चालून जाणार आहोंत." यापुढें रेसिडेन्ट वेबची प्रकृति जास्तच बिघडून तो हुशंगाबादे-नजीक ता. ९-११-१८०४ रोजीं ख्रिस्तवासी झाला. तेव्हां रेसिडेन्टाच्या हाताखालीं काम करणारा जेंकिन्स याचीच रेसिडेन्टाच्या जागीं नेमणूक झाली.

सन १८०४ हें सबंध वर्ष शिंदे-होळकरांनीं मिळून इंग्रजांस नरम करावें, यासाठीं सर्जेरावानें शिंद्याजवळ राहून एकसारखी खटपट केली. त्यामुळें रेसिडेन्ट जेंकिन्सचें व सर्जेरावाचें वांकडें आलें. या वेळीं जेंकिन्स यास आणखी असें कळलें कीं, सर्जेराव घाडग्याचा होळकर व त्याचे साथीदार मीरखान वगैरेंशीं एकसारखा पत्रव्यवहार चालू आहे; तो इंग्रजांविरुद्ध मोठा उठाव करीत आहे. या वेळीं यशवंतरावानेंहि असा पुकारा केला कीं, इंग्रजांविरुद्ध सर्व हिंदी दौलतदार उठले असून सर्वांनीं एकदिल होऊन

इंग्रजांचा पाडाव केला तरच त्यांचा निभाव आहे; नाहीं तर इंग्रज सर्व बळकावतील व मग हिंदी दौलतदारांवर मोठा कठीण प्रसंग येईल. या यशवंतरावाच्या म्हणण्यास नागपूरकर भोसल्याकडून पाठिंबा मिळाला. अशा तऱ्हेनें जो तो आपआपले गेलेले प्रदेश परत मिळविण्याच्या उद्योगास लागला. या बातमीचा पुकारा फार जोरांत झाला. गव्हर्नर जनरलनें पुण्याचा रेसिडेन्ट कर्नल क्लोज यास सर्जेरावाविषयीं सावध राहण्याची सूचना केली; जेंकिन्स यास दौलतरावास ताबडतोब भेटण्याविषयीं लिहिलें व पुढील दोन गोष्टींचा खुलासा करण्यास सांगितलें. पहिली, दौलतरावानें एकदम उज्जनीकडे निघून जावें; व दुसरी, सर्जेरावास कारभारांतून दूर करावें. असें दरडावणीचें पत्र जेंकिन्सला येतांच तो लगोलग दौलतरावाला भेटला व त्यानें आपले सर्व संशय खुलासेवार विचारले; तेव्हां दौलतरावानें उत्तर केलें कीं, "तुम्ही उगाच भलते तर्ककुतर्क करतां. माझी निष्ठा इंग्रजांचे ठायीं अढळ आहे, ती केव्हांहि ढळणार नाहीं. मी मुद्दामच पूर्वेच्या मार्गानें जात आहें; कारण माळवा प्रान्त होळकरानें उध्वस्त केला असल्यामुळें त्या प्रान्तीं फौजा उभ्या करणें शक्य नाहीं. बुंदेलखंडांत फौज ताबडतोब उभी करतां येईल. रघूजीविरुद्ध इंग्रजांनीं उठविलेल्या गप्पा केवळ गप्पाच आहेत, त्यांत तथ्य कांहींएक नाहीं. सर्जेराव भानगड्या आहे खरा, पण त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून एवढें मोठें साहस करण्याची छाती कोणाचीच नाहीं."

या वेळीं गव्हर्नर जनरल वेल्स्ली व रेसिडेन्ट जेन्किन्स यांच्या मनांत आलेलीं हीं संशयाचीं अभ्रें निष्कारण होतीं. याच्यांत तथ्य कांहींच नव्हतें. या वेळीं इंग्रजांची मनःस्थिति अशी संशयग्रस्त असणें अगदीं स्वाभाविक होतें. कारण बळदांतून लक्ष्मीनें 'येऊं का ? येऊं ?' म्हणून विचारावें व 'ये' म्हणतांच एकदम मोहोरांनीं भरलेले हंडेच्या हंडे बळदांतून बाहेर यावे त्याप्रमाणें इंग्रजांची स्थिति झाली होती. कंपनीसरकारनें हिंदुस्थानांत अलोट पैसा तर मिळविलाच, पण आतां टोपीकराची शिंपरवजा टोपी नाहींशी होऊन त्या ठिकाणीं राजमुकुट शोभायमान होणार होता, व हातांतील तागडी जाऊन तिची जागा राजदंड घेणार होता. असा हा अपूर्व योगायोग जुळून येणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत होतीं. तेव्हां हें परमभाग्याचें लेणें लाभतें का नाहीं या विचारानें टोपीकरांचें मन अधीर

झालें होतें, व त्याचा परिणाम वर नमूद केलेल्या संशयांत झाला होता, इतकेंच.

आतां हें खरें कीं, सूर्याचें तेज जसें चराचर वस्तूंना जीवन देतें व त्या तरारूं लागतात, त्याप्रमाणें यशवन्तरावाच्या तेजस्वी धोरणानें व त्यास मिळत चाललेल्या यशानें शिंद्याच्या मनावर परिणाम झाला होता, व त्या योगानें थोडीशी हालचाल त्यानेंहि केली असती. पण दौलतराव शिंदा जात्या नेभळट व नाना तऱ्हेचे सुखविलास उपभोगण्यास चटावलेला; त्याचे हातून शूराची करणी होणें कठीण. याशिवाय इंग्रज महाधोरणी, त्यांनीं दौलतराव पैशाच्या तंगींत आहे असें पाहून त्यास सावकारी डावानें पार जखडून टाकिलें, तें असें—" धोलापूर वगैरे तुमचे कित्येक परगणे तारण घेऊन आम्ही तुम्हांस सहा लाखपावेतों रक्कम कर्जाऊ देऊं." हें बोलणें शिंद्याची स्वारी दक्षिणकांठानें चालली असतां झालें. तारीख ६-१२-१८०४ रोजीं डीगच्या लढाईंत यशवन्तरावाचा पाडाव होऊन इंग्रजांस जय मिळाला ही बातमी जेन्किन्स यास कळली, तेव्हां त्यास आनंद झाला. म्हणून त्यानें कूच चालू असतांच दौलतरावाची गांठ घेतली, व त्यास डीग येथें मिळालेल्या इंग्रजांच्या जयाची व कर्जाऊ रक्कम मंजूर झाल्याची बातमी सांगितली; आणि आतां तुम्ही सर्जेरावास दूर करा, म्हणजे तुमचाआमचा कायमचा सलोखा राहील असेंहि तो सांगूं लागला. तेव्हां थोडा विचार करून उत्तर देतों असें शिंद्यांनीं उत्तर दिलें. यानंतर एकाच महिन्यानें ता. ६-१-१८०५ ला शिंद्याचा तळ सागराजवळ पडला. या ठिकाणीं कर्जाऊ रकमेची मागणी करण्यासाठीं दौलतरावानें रामचंद्र भास्करास धाडिलें व रेसिडेन्टास असें कळविलें कीं, तुमच्या इच्छेप्रमाणें सर्जेरावास दूर करण्याचें आम्हीं ठरविलें आहे व यापुढें तुम्ही सांगाल तसें आम्ही वागूं. मात्र कर्जाऊ रक्कम लगोलग द्यावी. दौलतरावअप्पा मुठींत नाक धरून येतांच रेसिडेन्टानें त्यास कळविलें कीं, " सर्जेराव निघून गेल्याशिवाय रक्कम मिळणार नाहीं."

इंग्रजांनीं आपल्याविरुद्ध इतकी हाकाटी चालविलेली पाहून सर्जेराव चिडून गेला व त्यानें रेसिडेन्टाची खोडकी जिरविण्याचें मनांत आणिलें. हा सर्जेराव पूर्वीचा असता तर त्यानें रेसिडेन्टाचें डोकें मारिलें असतें, वा त्याच्या अंगास बाण बांधून ते पेटवून त्याची रवानगी अंतरिक्षांत केली

असती; पण आतांचा सर्जेराव जरा नरम पडलेला व उतारवयाच्या उत-रणीस लागलेला; त्यांतून स्वतःचें आसन डळमळीत झालेलें. तेव्हां त्यानें शिंद्याचा मुक्काम सागरास होण्यापूर्वी वाटेंत ता. २७-१२-१८०४ रोजीं रात्रीं चोरांच्या टोळीकडून रेसिडेन्टाच्या तंबूवर छापा घालविला व पहारे-कऱ्यास ठार मारून सुमारें बारा हजार रुपयांचा ऐवज लांबविला. ही गोष्ट वास्तविक सर्जेरावानेंच केली, पण त्याचा पत्ता रेसिडेन्टास लागेना तेव्हां त्यानें दौलतरावाकडे तक्रार केली. दौलतरावानें तपास करून कळविलें कीं, चोरी पेंढाऱ्यांनीं केली असून त्यांचा निग्रह करण्याचें साधन आमचेजवळ नाहीं. हें उत्तर ऐकून रेसिडेन्ट चिडला व त्यानें दौलतरावास एकदम सांगितलें कीं, "यासाठींच तुम्ही आतांच्या आतां उज्जनीकडे चला, न जाल तर आम्ही तुमची छावणी सोडून जातों." रेसिडेन्टाचा हा त्रागा पाहून दौलतरावानें उत्तर केलें कीं, "अबूजी इंगळे येथें लवकरच येणार आहेत, त्यांचा विचार घेऊन मग काय तें कळवितों."

या उत्तरानें रेसिडेन्टाचें समाधान न होतां त्यानें छावणी सोडून जाण्याची तयारी चालविली. तेव्हां दौलतरावानें रामचंद्र भास्करास रेसि-डेन्टाकडे धाडून शपथपूर्वक कळविलें कीं, "आम्ही ता. १३-१-१८०५ पावेतों उज्जनीकडे कूच करितों." दौलतरावानें हा निरोप धाडिला खरा पण रेसिडेन्टाच्या या चढेल धोरणाची त्यास चीड आली. इतक्यांत रेसिडेन्टानें अशी मागणी केली कीं, अबूजी इंगळयानें आमची आगळीक केली आहे; तेव्हां त्याचा बंदोबस्त तुम्हीं करावा. यामुळें दौलतराव जास्तच चिडला व त्यानें रेसिडेन्टाशीं भाषणच सोडिलें. यावरून ता. २३-१-१८०५ रोजीं रेसिडेन्ट छावणी सोडून कांहीं अंतरावर निघून गेला. तेव्हां त्यास आणण्यासाठीं दौलतरावानें माणसांवर माणसें धाडिलीं, आणि पुन्हां छावणींत येण्याबद्दल नाकदुऱ्या काढिल्या व विनवण्या केल्या. त्यावरून रेसिडेन्ट माघारीं आला व दुसरे दिवशीं दौलतरावास भेटला. पण त्याच्या-मागें त्याच्या तंबूवर पुन्हां पेंढाऱ्यांनीं छापा घातला व त्याचें सर्व सामान-सुमान लुटलें. या धांदलींत दोन इंग्रज अंमलदार व नोकर आणि कांहीं फौजेच्या लोकांस किरकोळ जखमा झाल्या. ही बातमी दौलतरावास कळ-तांच त्यानें खेद व्यक्त केला व नुकसान भरून देण्याचें कबूल केलें. पेंढाऱ्यांचे हे हल्ले बहुतकरून सर्जेरावानें मुद्दाम केले असावेत असा संशय

गव्हर्नर जनरल यास आला व त्यानें रेसिडेन्टास समज दिली कीं, शिंद्याशीं अतिप्रसंग करूं नये.

शिंद्याशीं धोरणाधोरणानें वागून आपला कार्यभाग साधण्याची धूर्तता जेंकिन्समध्यें नाहीं असा समज गव्हर्नर जनरलचा झाला व त्यानें कर्नल क्लोजची बदली शिंद्याचे दरबारीं केली; आणि गुन्हेगारांचा तपास करून त्यांस शिक्षा करा व नुकसानभरपाई तावडतोब करा, अशी जोराची मागणी शिंद्याकडे केली. अशा प्रकारें एक महिना बोलाचालींत निघून गेला. ता. २४-२-१८०५ रोजीं दौलतरावानें सागराहून उज्जनीच्या रोखें कूच केलें रस्त्यांत ता. २ मार्च रोजीं सर्जेरावास घेऊन दौलतरावानें रेसिडेन्टची गांठ घेतली आणि नरमाईनें विनंति केली कीं, "झालेले प्रकार सर्व आपण विसरून जावे आणि स्नेहभाव पूर्ववत् ठेवावा."



## ४ : : सबळगडचा बनाव

रेसिडेन्टानें सर्जेरावास कारभारांतून 'दूर करा' म्हणून एकसारखें म्हणावें, दौलतरावानें त्याच्या ह्या म्हणण्याकडे लक्ष देऊं नये; 'होतों मी संन्यासी' म्हणून धाक दाखवणाऱ्या नवऱ्याप्रमाणें रेसिडेन्टनें 'जातों मी छावणी सोडून' म्हणून त्रागा करावा, छावणी सोडूनहि जावें, पण या त्राग्याचाहि परिणाम कांहींएक होऊं नये; व सर्जेराव कारभारांत वावरतांना दिसावा. इतकेंच काय, पण त्यानें सर्व कारभार कुलमुखत्यारीनें करावा, असा हा प्रकार चालला होता तो आपण पहिला. सर्जेरावास बरोबर घेऊन रेसिडेन्टाची गांठ दौलतरावानें घेतली व 'झालेले सर्व प्रकार आपण विसरून जा व स्नेहभाव पूर्ववत् ठेवा' अशी विनंति केली; आणि अशा तऱ्हेनें तूर्तातूर्त हें प्रकरण मिटतें घेतलें.

इंग्रज जात्याच शंकेखोर, व दौलतरावाच्या या चढाईच्या वागणुकीनें रेसिडेन्टाचें मन जास्तच कांक्षेखोर झालें, आणि त्यानें दौलतरावावर जास्त करडी नजर ठेवली. त्यामुळें उभय पक्षांत जास्तच घासाघाशीस सुरुवात झाली. दौलतरावास आपलें स्वातंत्र्य आपण गमावलें असें वाटलें व ही स्थिति त्यास दुःसह होऊन त्याच्या मनाचें स्वास्थ्य गेलें. तेव्हां त्यानें आपल्या सर्व तक्रारी व आपणावर रेसिडेन्टाकडून होत असणाऱ्या अन्यायांची खुलासेवार चर्चा करून एक लखोटा गव्हर्नर जनरलकडे धाडिला. या पत्रांतील सर्व आरोप कसे फोल आहेत तें नीटपणें दाखविणारें उत्तर दौलत-

रावास गव्हर्नर जनरलकडून आलें. लखोटा जाणें व त्याचें उत्तर गव्हर्नर जनरल-कडून येणें या गोष्टींस चारसहा महिने लागले. मात्र यानंतर गव्हर्नर जनरलनें दौलतरावाशीं सामोपचाराचें धोरण ठेविलें. 'दौलतरावाच्या तक्रारी आतां जास्त वाढूं न देतां त्या समंजसपणें मिटत्या घ्या; थोडेंबहुत देवाण घेवाण करा. त्याच्याशीं अतिप्रसंग करूं नका.' असा हुकूम ग. ज. नें रेसिडेन्टास धाडला. त्यामुळें सर्जेरावास कारभारांतून काढण्याचा हट्ट रेसिडेन्टानें सोडला आणि 'सर्जेरावास कारभारांतून काढणें हें तुमच्याच हिताचें आहे. न काढलात तरी त्यांत आमचें कांहींएक जात नाहीं.' अशा अर्थाचें बोलणें त्यानें आतां सुरू केलें.

यानंतर सर्जेरावानें भरतपूरचे जाठांशीं चाललेल्या होळकरांच्या युद्धांत शिष्टाई केली. प्रथम दोनतीन महिने हें युद्ध जोरांत होतें; पण निकाल लागेना, तेव्हां दौलतरावानें मनांत आणलें कीं, आतां आपण जाऊन होळकराचा समेट करून द्यावा व लगेच तसें त्यानें रेसिडेन्टास ता. २२-३-१८०५ रोजीं कळविलें कीं, 'आम्ही येथून होळकराचा समेट करून देण्यासाठीं भरतपुरास जाणार.' हा निरोप एकून रेसिडेन्टचें धाबेंच दणाणलें. कारण त्याची अशी कल्पना झाली कीं, शिंदा भरतपुरास गेल्यावर होळकर, शिंदे व जाठ यांचें संगनमत होऊन ते तिघे इंग्रजांवर चढाई करणार व हा डाव टाकण्यास सर्जेराव कमी करणार नाहीं! या कल्पनेचें पिशाच रेसिडेंटाच्या डोक्यांत नाचूं लागतांच त्यास चैन पडेना. बरें दौलतराव-सर्जेराव या दुकलीस अडवून धरण्याचेंहि धाडस त्यास करवेना. तेव्हां काय करावें हेंच त्यास सुचेना. भरतपूरचा रोख धरून शिंदे ता. २९-३-१८०५ ला निघाला व चंबळा नदीवर सबळगड येथें दाखल झाला. मुख्य फौज मागेंच होती. याच ठिकाणीं अंबूजी इंगळे त्यांस येऊन मिळाला; आणि ही सर्व मंडळी आतां एकत्र होऊन चंबळापार होणार असें दिसतांच रेसिडेन्टास दम निघेना. त्यानें सर्जेराव व दौलतराव या उभयतांच्या गांठी घेऊन त्यास कळविलें कीं, "तुम्ही चंबळा सोडून जाण्यांत धोका आहे; तेव्हां जाणें राहित करावें." दौलतरावानें उत्तर केलें कीं, "आम्ही भरत-पुरास गेल्यानें युद्धास जास्त जोर चढेल अशी आपली कल्पना आहे ती साफ चूक आहे. आम्ही प्रत्यक्ष जातीनें जाऊन यशवन्तरावाची समजूत घाल्तों व युद्ध थांबवितों." पण ही गोष्ट रेसिडेन्टास पटली नाहीं. तेव्हां

त्याच्या मर्जीविरुद्ध भरतपुरास जाण्याचें धाडस दौलतरावानेंहि केलें नाहीं. अशा तऱ्हेनें या प्रसंगांतून रेसिडेन्ट निभावला.

शिंदे, होळकर व जाठ या तिघांचें संगनमत झाल्यास आपणांवर फार कठीण प्रसंग येईल, ही कल्पना रेसिडेन्टास एकसारखी भेडसावीत होती त्यांत तथ्य होतें. कारण भरतपुरास चाललेल्या युद्धांत जाठानें चांगलाच पराक्रम गाजविल्यामुळें इंग्रजांविरुद्ध मोठा बनाव होतो कीं काय अशी साधार भीति गव्हर्नर जनरलला वाटत होती. तेव्हां या भरतपूरच्या युद्धामुळें निर्माण झालेल्या वातचक्रांतून हिंदी दौलतदारांच्या मोठ्या बनावाचें भूत निर्माण होऊं नये म्हणून ग. ज. नें मद्रासचा गव्हर्नर व पुण्याचा रेसिडेन्ट यांस तावडतोबीचे उपाय योजण्याची पूर्ण अखत्यारी दिली. असा हा इंग्रजांच्या पोटांत भीतीचा वायुगोळा निर्माण झाला होता.

दौलतरावानें भरतपुराकडे जाण्याचें रहित केलें व रेसिडेन्टाच्या सांगण्याचा मान राखिला; पण पुढे लवकरच भरतपुरास जाण्याचें मुळीं कारणच उरलें नाहीं. कारण ता. ११-४-१८०५ ला जाठानें इंग्रजांशीं तह करून युद्धांतून आपलें अंगच काढून घेतलें. ही वार्ता दौलतरावास कळतांच त्यानें स्वतः भरतपुराकडे जाण्याचें रहित केलें, पण सर्जेरावाबरोबर कांहीं फौज देऊन यशवन्तराव होळकराची समजूत पाडण्यासाठीं त्यानें त्याची रवानगी केली. सर्जेरावहि लगोलग भरतपुराकडे निघाला.

अक्कल बृहस्पतीची व समशेर शिकंदरची अशी एकी असतांना टोपीकराच्या साम्राज्यसिंहासनासमोर मांडलिक म्हणून कुर्निसात् करण्याचा प्रसंग आलेला पाहून यशवंतराव होळकराचा जीव अहोरात्र तिळतिळ तुटत होता. अशा असामान्य पराक्रमी पुरुषाचा इंग्रजांशीं समेट करून देण्याची जोखीम सर्जेरावानें पत्करली होती. तेव्हां तो ठरल्याप्रमाणें भरतपुराकडे निघाला व भरतपुरापासून पंधरा मैलांवर असणाऱ्या वेरगांवीं मुक्काम करून राहिला. तेथून सर्जेरावानें सेनापति लेक यास खलिता पाठविला कीं, "आम्ही तुमचा व होळकराचा समेट घडून आणावा म्हणून शिंद्याच्या सांगण्यावरून येथें आलों आहोंत. खासा शिंदेच या कार्यासाठीं येणार होता पण रेसिडेन्टाच्या सांगण्यावरून त्यानें तो बेत रहित केला. आतां मालकमसाहेब शिंद्याच्या भेटीला जात आहेत व शिंदेहि त्यांच्या भेटीची वाट पाहात आहेत. आम्ही आतां भरतपुरास होळकराची भेट घेऊन त्याचा तहाच्यासंबंधीं काय मानस

आहे तो आपणास कळवूं." सर्जेरावाच्या या खलित्यानें सेनापति लेकचा गैर-समज झाला व त्याच्या मनानें धांव भलतीकडेच घेतली. त्यास असें वाटलें कीं, जाठानें इंग्रजांशीं तहाची वाटाघाट चालविली आहे तेव्हां त्यास त्यापासून परावृत्त करून पुन्हां शिंदे, होळकर व जाठ या तिघांनीं रणसन्मुख होऊन इंग्रजांस चांगलेंच मारून काढावें असा व्यूह रचण्याचें सर्जेरावाच्या मनांत असावें. या कल्पनेनें सेनापति लेक जास्तच घाबरला व त्यानें सर्जेरावास जाब पाठविला कीं, "तुम्ही भरतपुरांत जाऊं नये. तेथूनच माघारीं जावें." सर्जेरावानें लेकचें हें सांगणें धाब्यावर बसविलें व तो तडक भरतपुरास गेला; पण इंग्रजांच्या कारवाईमुळें जाठाची व त्याची भेट झाली नाहीं. तेव्हां तो टाकोटाक वेर येथें परत आला. या ठिकाणीं यशवंतराव, त्याचे साथीदार मीरखान वगैरे मंडळींची व त्याची गांठभेट झाली.

ता. १२-४-१८०५ ला म्हणजे जाठांच्या व इंग्रजांच्या तहाचे दुसऱ्याच दिवशीं बापूजी शिंदे हा दौलतरावाचा सरदार होळकराकडे होता तो सबळ-गडास दौलतरावाच्या छावणींत दाखल झाला. ही गोष्टसुद्धां इंग्रजांच्या दृष्टीनें अनिष्टच झाली; कारण इंग्रज त्यास पाण्यांत पहात होते. पुढें सर्जेरावाकडून दौलतरावास पत्रें आलीं. त्या पत्रांच्या अनुसंधानानें शिंद्यानें ता. १५-४-१८०५ रोजीं रेसिडेन्टास खालील आशयाचा खलिता धाडिला.

"जाठांशीं तह झाल्यावर होळकर इंग्रजांचे मुलखावर गंगापार जात होता. त्याची सर्जेरावानें गांठ घेऊन समजूत घातली कीं, आतां इंग्रजांशीं युद्ध करणें इष्ट नाहीं, तह करावा हेंच चांगलें. असें बोलणें आम्हीं होळकराशीं चालू ठेविलें असून, हा समेट घडवून आणण्याचें काम आम्हीं आमच्या (दौलतरावाच्या) शिरावर घेतलें आहे. आणि या कार्यासाठीं सर्जेराव घाडगे होळकरास घेऊन आमच्या भेटीस येत आहेत. तसेंच नागपूरचे रघूजी भोसलेहि या कामासाठीं येथें येत आहेत."

हा खलिता रेसिडेन्टास पोंचतो न पोंचतो तोंच यशवंतराव होळकर दौलतरावाच्या भेटीसाठीं फौजेसह सबळगडास डेरेदाखल झाला. या वेळीं दौलतरावानें छावणींतून त्यास सामोरे जाऊन मोठया मानानें मुक्कामास आणिलें. हा मोठा भाग्याचा योग होता; कारण या वेळीं चतुरसिंग भोसले व अनेक मराठे मातबर सरदार पुढें काय करावें याचा विचारविनिमय करण्यासाठीं एक ठिकाणीं जमा झाले होते. सर्वांचा मानस इंग्रजांशीं सख्य

करूं नये, त्यास बाहेर काढावा. तर या सर्वांच्या उलट दौलतरावाचा विचार इंग्रजांशीं समेट करावा असा होता. ही वाटाघाट होणार होती त्या प्रसंगीं शिंद्यानें रेसिडेन्टास बोलविलें. ता. १७-४-१८०५ रोजीं शिंद्याच्या छावणींत दरबार होऊन रेसिडेन्ट व होळकर यांचीं बोलणीं झालीं. होळकराचे बाबतींत दौलतरावाची मध्यस्थी ऐकूं नये ही गव्हर्नर जनरलची आज्ञा रेसिडेन्टास पाळतां आली नाहीं.

सबळगडास झालेल्या शिंदे-होळकरांच्या या भेटीचें वर्णन होळकर-कैफियतींत खालीलप्रमाणें केलें आहे.

"चर्मण्वती उतरून चैत्र वद्य पक्षीं भेटीचा बेत ठरला. शिंदे यांनीं जागा मैदान पाहून बिछायत करून पांच हजार खासा उंची पोषाखांत येऊन बसले. नंतर होळकरांची स्वारी आली. बरोबर साठ हजार स्वार अंगांत दहाशेर रुईचा डगला, सफेत दुपट्टा, ढालतरवार, खांद्यावर बासडा, गांठची गांठ आली. त्यांस यशवंतराव कोणते हें ओळखूं येईना. येतांच गराडा फिरवून देऊन दोन हजार खासा उतरला. इकडल्या तिकडल्या तोफा चालल्या. चार घटकांपर्यंत कोणाचा शब्द कोणाचे कानीं पडेना. दौलतरावाचें तोंड सुकून गेलें. एकदोन रोज बोलणीं होऊन सफाईची बोलणीं झालीं. उभयतांचा विचार एक होऊन होळकर कूच करून कोट्या-कडे गेले. चर्मण्वती उतरून पाटणजवळ मुक्काम केला."

तोफांच्या गडगडाटांत शिंदे-होळकरांची भेट झाली. पण या सबळगडच्या जमावानें सेनापति लेक व गव्हर्नर जनरल शिंद्याच्या धोरणाविषयीं साशंक झाले; आणि होळकर शिंद्याच्या छावणींत आल्याचें कळतांच सेनापति लेक त्याच्यावर नजर ठेवण्याकरितां चंबळा उतरला व ठासून उभा राहिला. आणि ही मंडळी कांहीं तेढा डाव टाकतील तर त्याचा प्रतिकार करण्याची जय्यत तयारी करून त्यानें रेसिडेन्टास कळविलें कीं, "होळकरांचा व आमचा समेट करून देण्याचे भानगडींत तुम्ही पडूं नका; तें आमचें आम्ही पाहून घेऊं. होळकरास सोडून तुम्ही दूर निघून जावें. न जाल तर तुम्हीं तह मोडला असें आम्ही समजूं व त्यापासून होणारे सर्व परिणाम तुम्हांस भोगावे लागतील." सेनापति लेकनें धाडलेला हा निरोप रेसिडेंटानें शिंद्यांस कळविला; पण शिंद्यानें रेसिडेंटाच्या या मागणीकडे कानाडोळा केला व सबळगडची छावणी सोडली नाहीं. हें प्रकरण नुसत्या निरोपावर भागत नाहीं असें पाहून सेनापति

लेकनें आपली फौज ता. २९-४-१८०५ ला चंबळच्या पश्चिमकांठीं शिंद्याच्या समोर आणिली. तें पाहतांच मराठी फौजांत एकदम धांदल उडून गेली. होळकरांच्या साथीदारास दम निघेना. त्यांत इंग्रजांनीं फितुर चालविला होताच. होळकरांचे दोन सरदार अनुक्रमें लाला भवानीशंकर आणि मूर्तजा-खान यांनीं इंग्रजांकडून आपली व्यवस्था लावून घेतली व होळकरास सोडलें. त्यामुळें शिंदे-होळकरांचा थोडा धीर खचला व त्यांनीं थोडें मागें सरून शिवपूर येथें मुक्काम केला. वेळींच सबळगड सोडल्यानें युद्धाच प्रसंग टळला. बाकी उभय पक्षांत युद्ध करण्याचें अवसान नव्हतेंच. असो या सबळगडच्या बनावांत सर्जेराव प्रमुख सूत्रधार असल्यामुळें त्याच एवढा विस्तार केला.

सबळगडच्या या भेटीचा पहिला तडाका अंबूजी इंगळ्यास बसला कारण तो आदले दिवशीं इंग्रजांस फितुर झाला होता म्हणून शिंद्याच त्याच्यावर रोष फार; पण बलाढ्य सरदार असल्यामुळें यास कृत अपराधा बद्दल नतिजा पोंचविण्याची धमक दौलतरावांत नव्हती. शिंदे-होळकर एक होतांच व दौलतरावाचें इंगळ्यास नरम करण्याविषयीं अनुमोदन मिळतांच यशवंतरावानें त्यास ता. १८-४-१८०५ ला पकडलें आणि त्याचे थोडे हाल करून त्यापासून ५० लाख रुपये दंडादाखल घेण्याचा ठराव झाला ही रक्कम अंबूजी इंगळ्यानें कबूल करून स्वतःची सुटका करून घेतली.

सर्जेरावानें अंबूजी इंगळ्यास फार त्रास दिला. अंबूजीजवळ द्रव्यसंचय मोठा असावा अशी कल्पना सर्वांची होती. तो उपटण्यासाठीं सर्जेरावानें त्यास फार छळलें. सर्जेरावाचें छळणें म्हणजे असें तसें नसावयाचेंच त्याच्या बोटांवर तेलाचे बोळे टेवून ते पेटवून दिले होते. अशा तऱ्हेनें सर्जेरावानें आपला इंगा त्यासहि दाखविला होता.

अंबूजी इंगळ्यानें कबूल केलेली रक्कम कोट्यास पदरांत टाकण्याचें ठरलें होतें. तेव्हां ती वसूल करण्याकरितां सर्जेराव घाडगा तीन हजार स्वारां निशीं कोट्यास गेला. दंडाची रक्कम हातीं येतांच पंचवीस लाख शिंद्यांनी व एकतीस लाख होळकरांनीं वांटून घेतले. कमी पैका मिळाल्याबद्दल शिंद्यास थोडा विषाद वाटला. अलीकडे शिंद्याचा कारभार यशवंतराव व सर्जेराव हे दोन्ही कर्ते पुरुष पाहात असल्यामुळें कोणतेहि काम ते नेटानें करीत. दौलतराव त्या गोष्टी करण्यास करतो त्या गोष्टी हे दोघे

हातोहात सिद्धीस नेत. अंबूजी इंगळ्याप्रमाणें हा अनुभव कित्येकांच्या प्रत्ययास आला.

सर्जेरावास कारभारांतून काढा ही रेसिडेन्टाची मागणी कायमचीच होती. आतां तिच्या जोडीला 'यशवंतरावास छावणींतून दूर काढा' ही दुसरी मागणी सुरू झाली. एकटा असतांना दौलतराव रेसिडेंटाच्या मागणीची वासलात कशी लावी तें आपण या वेळपर्यंत पाहिलेंच. आतां तर होळकरांचा पाठिंबा मिळतांच त्यास जास्त जोर चढला. यशवंतराव शिंद्याची छावणी सोडून जाईना; तेव्हां 'मी तुमची छावणी सोडून जातों, असा नेहमींचा धाक रेसिडेन्टानें घालतांच दौलतरावानें त्यास अटक केली. दोन महिने रेसिडेन्ट अटकेंत होता. इंग्रजांचा हा मोठा अपमान झाला व त्याचा गवगवाहि मोठा करण्यांत आला; पण त्याकरितां विझत चाललेले युद्धाचे निखारे पुन: पेटविण्याचें धाडस लॉर्ड वेलस्लीनें केलें नाहीं. लवकरच वेलस्लीची बदली होऊन कॉर्नवॉलिसचें समेटाचें धोरण सुरू झाल्यानें सर्वत्र वातावरण पालटलें. सर्जेराव, यशवंतराव यांनीं कारभार हातीं घेतल्यामुळें दौलतरावाच्या धोरणास थोडें तेज चढलें खरें, पण हा बनावहि फार काळ टिकला नाहीं.

कॉर्नवॉलिसच्या समेटाच्या धोरणानें शान्ततेचे वारे जिकडे तिकडे वाहूं लागले. हिंदी दौलतदारांस स्वतंत्र होण्याची आशा फारशी न दिसल्यामुळें जो तो आपापली व्यवस्था लावून घेऊं लागला. शिंद्यानें आपली व्यवस्था लावून घेतली. अंबूजी इंगळ्याकडून ऐवज हातीं येतांच त्याच्यावरील राग दौलतरावानें सोडून त्यास सन्मानानें भेटीस आणिला आणि त्याचा गौरव केला; व सर्जेरावाकडील कारभार काढून तो अंबूजीचे हवालीं केला. अशा तऱ्हेनें सर्जेराव एकदांचा कारभारांतून निघाला व इंग्रजांची तक्रार नाहींशी झाली. (२२-११-१८०५)

सर्जेरावास कारभारांतून काढल्यामुळें तो रागावला व होळकराकडे गेला. होळकराच्या भानगडींत पडण्यांत कांहीं तथ्य नाहीं असें शिंद्यास वाटूं लागलें होतें; त्याप्रमाणेंच शिंद्यापासून आपला कोणताच फायदा होत नाहीं असें पाहून होळकरानेंहि शिंद्याचा नाद सोडिला. तसेंच सर्जेरावाच्या नादीं लागल्यापासून फायदा तर काडीचा नाहीं, नुकसान व त्रास मात्र फार होतो

असें होळकराच्या लक्षांत येतांच त्यानें सर्जेरावास आपल्याजवळ थारा दिला नाहीं. त्यामुळें सर्जेरावाची दारुण निराशा झाली.

इंग्रजांच्या लकड्यामुळें सर्जेरावास कारभारांतून शिंद्यानें काढिलें. या वेळेपासून सर्जेरावाचें कर्तबगार आयुष्य संपून त्याच्या उत्तरार्धास सुरुवात झाली !



## ५ : : अखेर

सर्जेरावास कारभारांतून दूर करण्याचें कलम इंग्रजांनीं तहांत मुद्दाम घातल्यामुळें दौलतरावाचा नाइलाज झाला व त्यास सर्जेरावास कारभारांतून दूर करण्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं. पण या एका गोष्टी-मुळें सर्जेराव एकदम निस्तेज झाला. जवळजवळ उभें आयुष्य ज्यानें सत्तेच्या दिमाखांत काढिलें, सर्जेराव म्हणतांच ज्याच्या त्याच्या अंगावर कांटा उभा राहावा अशी बेजरब सत्ता ज्यानें गाजविली अशा पुरुषास सत्तेवांचून जिणें म्हणजे लाजिरवाणें! तरीसुद्धां दौलतराव त्यास दूरदूरच्या खंडणी वसूल करण्याच्या कामावर धाडी, पण त्यांत त्याला समाधान वाटेना. अशा केंविलवाण्या स्थितींत त्यास चार वर्षें रखडावें लागलें; पण हे दिवस संप-ण्याचा काल लवकरच आला. दौलतरावानें बायजाबाईच्या आग्रहावरून इंग्रजांजवळ सर्जेरावाबद्दलचें कलम दूर करण्याचा अत्यंत आग्रह धरिला, तेव्हां इंग्रजांनीं तहांतील तें कलम काढून घेतलें.

सन १८०९ च्या सुमारास दौलतरावाच्या डोक्यांत असा विचार चमकून गेला कीं, आपल्या राज्यकारभारास लागलेली घसरगुंडी कशी तरी थांब-वावी. या त्याच्या विचारांत बायजाबाईच्या सांगण्याची भर पडली व त्यानें सर्जेरावास जवळ बोलावून कारभार करण्यास सांगितलें. उभयतांची प्रथम भेट दौलतराव अजमीरच्या आसपास असतां झाली. ही भेट मोठ्या

थाटानें आणि समारंभानें झाली. पण हा गोडवा फार दिवस टिकला नाहीं; कारण पुढें चारदोन महिन्यांतच कागाळ्या येण्यास सुरुवात झाली. सर्जेरावाच्या जुलूम-जबरदस्तीस लोक कंटाळून गेले. तक्रारी इतक्या बेसुमार येऊं लागल्या कीं, त्या ऐकतां ऐकतां दौलतराव त्रासून गेला. भीक नको पण कुत्रा आवर अशी याची स्थिति झाली. दौलतराव-सर्जेरावाचे खटके घटकोघटकीं उडूं लागले. तो सर्जेरावाचा वाटेल तसा पाणउतारा सर्वांसमक्ष करूं लागला. यजमानाजवळ सर्जेरावाचें वजन नाहीं, ही गोष्ट लोकांत होतांच सर्जेराव सर्वांच्या थट्टेचा विषय झाला. सरदार, सावकार व दरबारची सामान्य मंडळीसुद्धां त्याची टर उडवूं लागली. आश्चर्याची गोष्ट अशी कीं त्यांत दौलतरावसुद्धां भाग घेऊं लागला. अशा तऱ्हेनें सर्जेरावाचें भांडें हलकें झालें; आणि त्यानें आयुष्यभर केलेल्या पापांचा निचरा होऊं लागला!

"तुम्ही उगीच अवाच्या सवा खर्च करतां, त्यामुळें खजिन्यास ताण घसतो." असें दौलतराव बोलूं लागला, व सर्जेरावास नाना परींनीं नांवें ठेवूं लागला. त्याबरोबर तो संतापला, व त्यानें एक दिवस रागाच्या भरांत आपल्या डोक्याची ती मळकी टोपी काढून जमिनीवर दाणूकन् आपटली व म्हणाला, "माझा खर्च तुमच्या डोळ्यांत सलतो, पण मी किती काट-कसरीनें राहतों याची साक्ष माझी टोपीच देईल." पण त्या टोपीनें दौलत-रावाच्या उभ्या दौलतीस टोपी घातली होती हें आतां जगजाहीर झालें होतें! टोपी आपटण्याचें नाटक करून सर्जेराव तरातरा आपल्या तंबूंत निघून गेला. यजमानाची पुन्हां मर्जी बसावी म्हणून त्यानें एक कांबळी, उंट व तीन तोळे चांदी एका फकीरास दान केली. पण आतां असल्या तोडग्यानें दौलतरावाचें मन प्रसन्न होणें शक्य नव्हतें. सर्जेरावानें उभ्या हयातींत मित्रांपेक्षां शत्रूच जास्त निर्माण केले होते. प्रत्येकाचा एक एक दिवस असतोच. या न्यायानें आतां त्याच्या शत्रूचे दिवस आले होते. गोकुळ पारख नांवाचा एक सावकार होता; त्यानें या संधीचा फायदा घेतला व दौलतरावास जाऊन बोलला कीं, "सर्जेराव पांढऱ्या पायाचा आहे. तो आल्यापासून तुमच्या दौलतीचें वाटोळें होत आहे; तेव्हां त्यास तुम्हीं दूर करा म्हणजे तुमचें गाडें नीट मार्गाला लागेल." सर्जेरावानें हा टोपी आपटण्याचा तमाशा केला त्या वेळीं दौलतराव इतका संतापला होता

कीं, सबंध हयातींत तो इतका रागावलेला कोणींहि पाहिला नव्हता. असे हे रुसवेफुगवे नेहमींचेच होते. देवबा काळया नांवाचा एक हुजऱ्या दौलतरावाच्या बहाल मर्जींतला होता. त्यानें आपला व दौलतरावाचा सलूख करून द्यावा म्हणून सर्जेरावानें त्याची अक्षरशः पायधरणी केली; पण त्याचा कांहींएक उपयोग न होतां प्रकरण जें चिघळत चाललें त्याचा शेवट शेवटीं सर्जेरावाच्या शेवटांत झाला.

दौलतरावाची मुख्य अडचण म्हणजे पैक्याची. फौज कमी करावी तर तिचा मुशाहिरा चुकता केला पाहिजे. पण पैशाशिवाय पगार कसा चुकता करणार? बरें, फौज कमी न करावी तर खर्च फुगत जाणार; असें हें त्रांगडें होतें. दौलतरावाची अशी तंगी असतांना त्याचा मेहुणा—बायकोचा भाऊ सरदार पाटणकर यानें दौलतरावाच्या खाजगींतून कांहीं रकम उसनी घेतली व ती ठरलेल्या मुदतींत माघारीं दिली नाहीं, म्हणून दौलतरावानें पाटणकराचे घरीं धरणें धरलें; त्यामुळें घाडगा अगदींच बिथरून गेला. काय करावें, आपलें हें घसरलेलें गाडें कसें ताळयावर आणावें हेंच त्यास उमजेना. दुसऱ्या दिवशीं त्यानें मोठा दानधर्म केला. पांच हजार रुपये ब्राह्मणांस वांटले; दोन हजार गोरगरिबांस अन्नदान केलें. सर्जेरावानें असलें 'अन्नदान वस्तरदान' केलें खरें, पण या दानानें त्याच्या भाग्य-भानूस लागलेलें ग्रहण कांहीं सुटलें नाहीं; तें दिवसानुदिवस त्यास जास्तच ग्रासूं लागलें व शेवटीं खग्रास झालें! दौलतरावाचें व सर्जेरावाचें उत्तरोत्तर जास्तजास्तच फाटत चाललें; तेव्हां नाइलाज होऊन घाडगे आपलें चंबूगवाळें आवरून स्वारींतून चालता झाला. त्याबरोबर त्याची समजूत घालून त्यास माघारीं आणावें म्हणून बायजाबाईनें नवऱ्याजवळ हट धरिला, पण दौलतराव आतां इतका बिथरला होता कीं तो तिचेंहि ऐकेना. पण दौलतरावानें सर्जेरावाची नस आपल्या ताब्यांत ठेविली होती. ती म्हणजे त्याची रक्षा जवाहीर ही होय. दौलतरावानें जवाहीरला अडकवून ठेविलें होतें. दौलतरावाची खात्री होती कीं, सर्जेरावाची रक्षा आपण अडकवून ठेविली आहे, तेव्हां तो झकत माघारीं येईल. हा त्याचा होरा खरा ठरला. सर्जेरावास जवाहीरला अडकवून ठेवल्याची बातमी लागतांच तो अत्यंत दुःखीकष्टी झाला व त्यानें दौलतरावमहाराजांस निरोप पाठविला कीं, "जवाहीर परत न आल्यास मी प्राण देईन. तिनें आपला कोणताच गुन्हा केला नाहीं,

सबब तिला मजकडे धाडावें." असल्या निरोपांची जा-ये होतां होतां प्रकरण समेटास आलें. अंबूजी इंगळ्यानें मध्यस्थी करून सर्जेरावाची समजूत घालून त्यास माघारीं आणिलें. पण ही गोडीसुद्धां फार दिवस टिकली नाहीं.

या समेटासाठीं म्हणून म्हणा किंवा आपल्या जांवयाचा दिल आपणाविषयीं साफ व्हावा म्हणून म्हणा, सर्जेरावानें दौलतरावास ता. १५ जुलै १८०९ ला एक मेजवानी दिली. त्या दिवशीं दोघांनीं यथेच्छ हात मारला, व आकंठ सुरापान करून सबंध रात्र नाच-तमाशांत घालविली. रात्र संपली व दिवस उजाडला; त्याबरोबर दोघांच्याहि भांडणास नवा जोम येऊन तें पूर्ववत् चालू झालें. दरबारचीं कामें चाललीं असतां दौलतरावानें सर्जेरावाचा असा कांहीं पाणउतारा केला कीं, तो त्यास जहरीं झोंबला व ताड्कन् दरबार सोडून तो चालता झाला. आतां शिंद्याच्या दरबारीं एक क्षणभरहि थांबण्यांत अर्थ नाहीं, असें ठरवून त्यानें आपली रवेली जवाहीर हिची पुढें रवानगी केली, व अशा तऱ्हेनें मागें झालेली चूक सुधारली. आतां त्यानें आपली आवराआवरहि मोठ्या जारीनें सुरू केली. ही त्याची बांधाबांध शेवटचीच होती; पण हें त्या बिचाऱ्यास माहीत नव्हतें. अशा गडबडींत चारदोन दिवस निघून गेले. ता. २६ जुलै १८०९ ला सर्जेराव पुन्हां दौलतरावास जाऊन भेटला व त्यानें आपल्या मागण्या मोठ्या जोरांत त्याच्यापुढें मांडल्या, आणि त्यांचा फडशा पाडण्याविषयीं हट्ट धरला. पण त्या दैनपातक्यास माहीत नव्हतें कीं, आज आपल्या मागण्यांचा फडशा उडावयाचा नसून आपला स्वतःचा फडशा उडावयाचा आहे! इतके दिवस दुसऱ्यावर रोखलेल्या समशेरी आज त्याच्या अंगावर उलटणार होत्या. त्याची निजधामास जाण्याची वेळ नजीक आली होती. सर्जेरावानें मागण्या पुढें करतांच त्या कस्पटासमान लेखून एखाद्या मस्त हत्तीसारखा दौलतराव तावातावानें हत्तींच्या टकरी पाहण्यासाठीं निघून गेला. हें त्याचें वर्तन पाहून सर्जेराव जास्तच भडकला, आणि त्यानें संतापाच्या भरांत दौलतरावाचा अंगरखा धरिला व 'माझा निकाल काय तो लावा आणि कोठें जातां ते जा' असें म्हणून त्यास त्यानें थांबविलें. त्याबरोबर दौलतरावाचे कांहीं नोकर सर्जेरावास दूर करूं लागले. सर्जेरावानें कमरेची समशेर काढून नोकरलोकांच्यावर उगारली. त्याबरोबर गडबड उडाली.

सर्जेरावानें तलवार चालविली. कांहीं लोक मारले गेले. घाडगा जीव बचावून आपल्या तंबूंत निघून गेला. पण आज घाडग्याची घडी भरली होती !

मानाजी फाकड्याचा मुलगा आनंदराव फाकडे दौलतरावाच्या देवडी-वरील पाहरेकऱ्यांचा अंमलदार होता. तो कांहीं नोकरलोकांनिशीं नागव्या समशेरी घेऊन घाडग्याच्या तंबूवर चाल करून गेला. त्यांनीं तंबूच्या दोऱ्या तोडल्या. जणुं याच वेळीं सर्जेरावाच्या आयुष्याचीहि दोरी तुटली ! दोऱ्या तुटल्याबरोबर तंबू खालीं पडला. त्यांत घाडगा सांपडला. त्यास आनंदरावानें रस्त्यावर आणून त्याची तलवारीनें खांडोळी उडविली. झालें, सर्जेरावाचा ग्रंथ आटोपला ! त्याचा नश्वर देह मातीस मिळाला !! हा सर्व प्रकार हमरस्त्यांत झाला, पण त्याबद्दल कोणासहि वाईट वाटलें नाहीं. सर्जेरावासारख्या असामान्य व्यक्तीची भर रस्त्यांत खांडोळी उडालेली पाहून फारच मोटी दंगल उडेल असा समज होता, म्हणून पलटणें लढण्याचे तयारीनें सज्ज होतीं; पण कांहींएक झालें नाहीं. घाडग्याच्या वतीनें कोणीहि उभा राहिला नाहीं. कसा राहणार? घाडग्याशीं स्नेह म्हणजे प्रत्यक्ष अग्नीशीं संबंध. उष्णता सहन करण्याची ताकद असेतोंपर्यंत तग धरावा नाहीं तर जळून जावें, अशांतलाच प्रकार. घाडग्याचा एकहि स्नेही उभा राहिला नाहीं. सगळीकडे शान्त होतें. असो, अशा तऱ्हेनें मराठी राज्यांतला एक अव्वल दर्जाचा खलपुरुष नाहींसा झाला ! मराठी राज्यांत त्याच्याइतका दुष्ट पुरुष झाला नाहीं. त्याच्यावर हा जो शेवटचा वार झाला त्या वेळीं मात्र त्याच्याकडून कोणताहि फार मोठा अपराध झाला नव्हता. गेले सहासात महिने तो कारभार पाहात होता, याचा अर्थ इतकाच कीं, दौलतरावास दडण्यास कोणी तरी मनुष्य हवा होता म्हणूनच त्यानें सर्जेरावास बोलावून कारभार सांगितला. आपला कारभार नीट चालावा, राज्याची घडी नीट बसावी व प्रजेनें आपणास दुवा द्यावा, असें मनापासून दौलतरावास वाटत असतें तर त्यानें स्वतः कारभार सरळ मार्गावर यावा म्हणून खटपट केली असती व त्यांत सर्जेरावाचें साह्य घेतलें असतें. पण असें कांहींहि झालें नाहीं. एवढें मात्र खरें कीं, शेवटची धांदल चालू झाली तेव्हां ' सर्जेरावास दगा करूं नका ' असा हुकूम दौलतरावानें सोडला होता. नारायणराव पेशव्याच्या बाबतींत ' ध ' चा

'मा' झाला होता असा लोकप्रवाद आहे; पण सर्जेरावाच्या वेळीं 'मा' चा 'ध' झाला असतांनासुद्धां त्याचा उपयोग झाला नाहीं. त्यानें इतके शत्रु निर्माण केले होते कीं, घाडगा केव्हां एकदां दुनियेपार होतो असें त्यांना झालें होतें.

मराठी राज्यांत सर्जेरावाच्या तोडीस लागेल असा मनुष्य झाला नाहीं. त्यास दया, माया, वात्सल्य व प्रेम यांपैकीं कोणत्याहि गुणांचा वाससुद्धां नव्हता. त्यानें कोणतीहि परंपरा पाळली नाहीं. अमका माझा अन्नदाता, तमका माझा उपकारकर्ता, तेव्हां त्याच्यावर हात कसा टाकूं हा विचार त्यास शिवला नाहीं. पुढें आलेला प्रसंग अमुक आहे आणि तो निभावून नेण्यास अमका कांटा निघाला पाहिजे, असा निर्धार होतांच तो त्यास तल- वारीनें दूर करण्यास कमी करीत नसे. पुढें आलेल्या प्रसंगांतून निभावून घेणें हें एकच तो चांगलें जाणत होता. त्याची दृष्टि सर्व बाजूंनीं विचार करणारी नव्हती; म्हणून त्याची हैवानी वृत्ति मराठी राज्याच्या नाशास पुष्कळशी कारणीभूत झाली.

"सर्जेरावाची शरीरयष्टि ठेंगू व जाड. उंची पांच फुटांहून जास्त नाहीं. सर्व अवयव बटबटीत. डोळे घारे, दृष्टि कावळ्यासारखी भेदक आहे. रंग गोरा व डोकीचे केंस पांढरे सफेद आहेत. मूर्ति पाहतांच त्याच्या स्वभावाची कल्पना सोळा आणे येते. कपट, क्रौर्य व खुनशीपणा यांचा त्रिवेणीसंगम त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतो. तो बोलूं लागतांच त्याच्या बुद्धिमत्तेची झांक त्यांत चमकते. पायघोळ धोतर नेसून अंगांत एक बन्यान, खांद्यावर घेतलेला एक शेला, डोकीस दांभणकांठ जरी-किनारीची एक टोपी. टोपी- च्या किनारीचे दोन गोंडे डाव्या खांद्यावर लोंबतात. असा हा बाळसंतूस पाहिला म्हणजे तो वेडा आहे कीं काय असें घटकाभर वाटतें. हातांत चंदनी मण्यांची माळ असून तिच्यांतील मणी तो बोटांनीं झराझर ओढतो. अलीकडे धन्याची मर्जी त्याच्यावरून उडाली आहे. नाहीं तर लहान-थोर त्यास चळचळां कांपत असत. जरा कोणी मर्जीविरुद्ध वागला कीं मेलाच म्हणून समजावा. आणि तो मृत्यूसुद्धां असा तसा नाहीं—गळफांस, विषप्राशन .हें तर नेहमींचेंच—पण अंगास बाण अगर नळे बांधून ते पेटवून दिले कीं त्या दुर्दैवी प्राण्याचे तुकडे तुकडे होऊन ते हवेंत वर उडून जातात!"

शिंदेदरबारची सर्व सत्ताधारी राणी बायजाबाई जिवंत असतां तिच्या बापाचा खून भर रस्त्यांत होतो! ह्या गोष्टीनें तिला फार नामुष्की आली; अत्यंत दुःख झालें. दौलतरावानें तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. तो तिचे अश्रु पुशीत व मनधरणी करीत अहोरात्र जागला, पण तिची समजूत पडेना. बायजाबाई या वेळीं सहा महिन्यांची गरोदर होती. बापाचा खून करणाऱ्या आनंदराव फाकड्यास शिक्षा करा असा तिनें हट्ट धरला, तेव्हां दौलतरावानें आनंदराव फाकड्यास बराच ऐवज गुप्तपणें पोंचवून पळून जाण्यास सांगितलें. तेव्हां आनंदराव शिंद्याचें राज्य सोडून गायकवाडाच्या आश्रयास गेला. हल्लीं त्याचा वंश बडोद्यास नांदतो. मेल्यावरसुद्धां सर्जेरावानें लोकांस त्रास दिला. त्याचें भूत दौलतरावाच्या देवडीवर बसत असे व लोकांस पछाडून त्रास देई! त्यामुळें त्याची लोकांस धास्ती बसली होती.

सर्जेरावास शोभेशीच त्याची मुलगी बायजाबाई होती. ती मोठी चाणाक्ष व धूर्त होती. नवऱ्यास तर तिनें पूर्णपणें आपल्या मुठींत ठेविलें होतें. बायजाबाईचा थाट व बडेजाव फार मोठा होता. तिच्याजवळ बटकींचा—भानशिनींचा मेळा फार मोठा होता. त्यांत हिंदुस्थानांतील अठरापगड जातींच्या बायकांचा भरणा असे. त्यांस सालीं दोन धडोती व पोटास गोळाभर अन्न मिळालें कीं त्या नोकरी करण्यास तयार असत. बाईजवळ थाटानें राहावयास मिळे, व असत् मार्गानें त्या लागेल तितका पैसा मिळवीत. रात्रीं फक्त चौघींनीं आळीपाळीनें नोकरी करावयाची; व बाकीच्या वेळांत वाटेल तिकडे भटकण्यास त्यांस मुभा असे. प्रत्येकीच्या पाशांत कोणी तरी लहानमोठा गृहस्थ अडकलेला असे. त्या त्याजजवळून पैका लुबाडीत. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, अशा लांडीलबाडीनें मिळविलेला पैसा आपण कसा पराक्रम करून मिळविला, कोणास कसें फशीं पाडलें हें मालकिणीजवळ सांगण्याची मोठी चुरस लागे. इतर लहानमोठ्या सरदारांजवळ अशा बटकी असत. त्यांची जिंदगी शेवटीं त्यांच्या पश्चात् मालकिणीस मिळे. त्यांना कांहीं मुलें असलीं तर त्यांच्या निर्वाहापुरता कांहीं पैसा ठेवून बाकीचा होतकरू बटकींस वांटून टाकण्याची चाल होती.

दौलतरावास रूपवती भार्या, अलोट धनसंपदा व सत्ता या सर्व गोष्टींची जोड मिळाली होती: पण पोटीं संतान नसल्यामळें तो फार कष्टी झाला

होता. बायजाबाईच्या लग्नानंतर दोन वर्षांनीं ती गरोदर राहिली. नाना फडणिसाच्या मृत्यूनंतर दौलतराव स. १८०० च्या दिवाळींत बाजीरावाच्या परवानगीनें जेव्हां उत्तरेंत जावयास निघाला त्या वेळीं त्यानें बायजाबाईच्या प्रसूतिनिमित्त जांबगांवास मुक्काम केल्याचें वाचकांच्या लक्षांत असेलच. पण हें मूल मोठें झाल्याचा उल्लेख नाहीं. पण आतां १८०९ सालीं, म्हणजे आपल्या चरित्रनायकाचा खून झाला त्या सालीं, बायजाबाई सहा महिन्यांची गरोदर होती. तिला पुत्र व्हावा म्हणून देवास अनुष्ठानें, अभिषेक, पिंपळास प्रदक्षिणा, मारुतिरायास नवस, तसेंच अंगारेधुपारे वगैरे अनेक प्रयत्न चालू होते. 'आपणास पुत्ररत्न होणार' म्हणून ग्वाही देऊन कित्येक ज्योतिशांनीं दौलतरावापासून बक्षिसें उपटलीं. पुढें ता. २०-१०-१८०९ रोजीं बायजाबाई प्रसूत होऊन तिला मुलगी झाल्याचें कळलें, तेव्हां सर्वत्र निराशा झाली. कांहीं काळ लोकांची समजूत अशी होती कीं, खरोखर मुलगाच झाला आहे, पण त्यास भुताखेताची बाधा होईल किंवा दृष्ट लागेल म्हणून खोटीच बातमी बाहेर पसरविली आहे! पण २९-१०-१८०९ रोजीं बारशाचा समारंभ झाला व मुलीचें नांव कृष्णाबाई ऊर्फ सोनूबाई ठेवण्यांत आलें त्या वेळीं या सर्व भ्रमाचा भोपळा फुटला.

बायजाबाई दीर्घायुषी होती. ती ऐंशीं वर्षें जगली. दत्तकपुत्र जनकोजी याच्याशीं तिचें कधींच पटलें नाहीं, म्हणून तिनें थोडासा बंडावा केला. तेव्हां इंग्रजांनीं तिला ग्वाल्हेर राज्यांतून काढून लाविलें (ता. ८-७-१८३४). तेव्हां ती तिची मुलगी आग्र्यास होती तिच्याजवळ राहिली. यापुढें तिनें फारशी हालचाल केली नाहीं. पण दुर्दैवानें चिमणाबाई ता. १४-१०-१८३३ रोजीं मरण पावली. यानंतर तिनें आग्रा सोडला व पुढचीं इ. स. १८३५ ते १८४० पर्यंतचीं पांच वर्षे ती प्रयाग व काशी येथें राहिली. नंतर नाशिक येथें स. १८४० ते १८४५ पांच वर्षे राहून स. १८४५ त ती पुन्हां इंग्रजांच्या परवानगीनें ग्वाल्हेरास येऊन राहिली. यानंतर शेवटपर्यंत ती येथेंच होती. तिचें देहावसान ता. २७-६-१८६३ रोजीं झालें. मरणसमयीं तिचें वय ८० वर्षांचें होतें.

आतां फक्त सर्जेरावाची रक्षा जवाहीर इची माहिति द्यावयाची. सर्जेरावाचें जवाहीरवर अत्यंत प्रेम होतें. त्याच्या एका चाकरानें तिच्याशीं एकदां चावटपणा केला. हें सर्जेरावास कळतांच त्यानें त्या चाकराचें नाक-

कान छेदून टाकिले. सर्जेरावाची तिच्यावर बहाल मर्जी असल्यामुळें तिनें पुष्कळच द्रव्यसंचय केला होता. सर्जेरावाचा खून होतांच बायजाबाईनें तिला व तिची मैत्रीण रत्नकुंवर नांवाची एक वेश्या होती तिला पकडून कैद केलें, व आपल्यासमक्ष आणून स्वतः आपल्या हातांनीं वेताच्या छडीनें व चाबकानें बेदम फोडून काढिलें. दौलतरावानें तर तिचें नाककान कापण्याचाच हुकूम फर्माविला होता; पण तिनें आपल्याजवळील सर्व द्रव्यसंचय देऊन टाकून कशीबशी जिवंत सुटका करून घेतली. जवाहीरची जी दशा तीच रत्नकुंवरची. रत्नकुंवर ही चांगल्यापैकीं गाणारीण होती; व सर्जेरावाचा मेहुणा पाटणकर याची ती राख होती. तिचे जवाहीरप्रमाणेंच हाल करण्यांत आले; पण तिनेंहि जवळील सर्व ऐवज देऊन टाकून स्वतःची सुटका करून घेतली. तिची एक लाख रुपयांची मालमत्ता दौलतरावानें हस्तगत केली तरीसुद्धां तिचा द्रव्यसंचय ठिकठिकाणीं विखुरलेला होता. असो.

अशा तऱ्हेनें सर्जेराव स्वतः व त्याचा परिवार सद्दीचा जोर संपतांच कसा हतप्रभ झाला हें आपण पाहिलें. कृत पापांचा झाडा याच देहीं याच डोळयांसमक्ष द्यावा लागतो, असें दुबळ्या मनाच्या समाधानासाठीं वाट-ल्यास म्हणावें, पण ज्या माणसानें हातांत असणाऱ्या सत्तेचा वाटेल तसा उपयोग करून यमाला लाजविणारी सुलतानी गाजविली, नीतिशास्त्रांचे ग्रंथराज जुत्याच्या ठोकरीनें उडवून दिले, सद्‍गुणांचे नंदादीप समशेरीच्या वारांनीं मालवून जिकडे वाट फुटेल तिकडे तो गेला, अशा व्यक्तीस मरण अत्यंत हालअपेष्टांचें यावयास पाहिजे होतें; पण समशेरीच्या वारानें मुंडी उडाली ! होत्याचा नव्हता झाला, संपलें ! विनादैन्येन जीवनम्—मिळा-लेंच होतें; अनायासेन मरणम्—तेंहि आलें. अशा दृष्टीनें सर्जेराव मृत्यु-लोकावर कृतार्थ झाला. आतां फक्त सर्जेरावाबद्दल खरेशास्त्री यांनीं लिहिलेलें एक मार्मिक वाक्य उतरून त्याच्या चरित्रावर व चारिघ्यावर पडदा टाकूं......!

" बाजी-दौलत-सर्जेराव या त्रिकुटापैकीं पहिल्याला नुसतें डोकें तर दुस-ऱ्याला नुसते हातच होते; पण तिसरा ( सर्जेराव ) दोहोंनींहि संपन्न होता ! "

# दुःखी मोहरे!

त्रिंबकजी डेंगळा

# त्रिंबकजी डेंगळा

## १ :: तोंडओळख व भूमिका

तो काल स्वराज्याचा होता. ज्याच्या मनगटांत जोर व खांद्यावर मस्तक शाबूत अशा कोणाहि कर्तबगार माणसास राजसिंहासनाच्या पायऱ्या रिकाम्या होत्या. त्या चढून शिंदे-होळकरांसारखीं कर्तबगार माणसें राजराजेश्वर झालीं आणि मराठी साम्राज्याचे दिक्पाल म्हणून त्यांनीं आपलें नांव अजरामर केलें; त्या भाग्यकालीं हुजऱ्याच्या हुजूर होण्यास फारसा वेळ लागत नसे. उलटयाची सुलटी अंबारी करणें ज्याच्या त्याच्या कर्तबगारीवर अवलंबून असे. अशाच एका कर्तबगार पण दुर्दैवी—दुर्दैवी म्हणण्याचें कारण इतकेंच कीं त्यास राज्य मिळालें नाहीं—अशा एका व्यक्तीचा परिचय करून द्यावयाचा आहे. ती व्यक्ति म्हणजे त्रिंबकजी डेंगळा ही होय. हा निंबगांव-जावळींचा पाटील. तो बाजीरावाजवळ हुजऱ्याचें काम करीत होता. बाजीरावाजवळ असणाऱ्या हुजऱ्यांत त्रिंबकजी जरा चणचणीत व हुशार असल्यामुळें बाजीरावाचें त्याच्यावर लक्ष होतें. पुढें तो जासूद म्हणून काम करूं लागला. पुढें सन १८०२ च्या मार्चमध्यें यशवंतराव होळकरानें दौलतरावाच्या फौजेचा पराभव करून पुण्याचा ताबा घेतला त्या वेळीं बाजीराव महाडास पळाला. या पलायनाचे वेळीं त्रिंबकजी डेंगळा त्याच्या-

बरोबर होता. श्रीमंतांची स्वारी महाडास पोंचल्यानंतर एक अत्यंत जरूरीचा लखोटा पुण्यास पोंचवून त्याचें उत्तर ताबडतोब आणावयाचें होतें. हें काम त्रिंबकजीनें कल्पनेबाहेर शिस्तीनें व जलद केलें. हें पाहून बाजीराव खूष झाला, व त्यानें आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली कीं त्रिंबकजी रद्दा नसून हरहुन्नरी व कोणतेंहि काम फत्ते करणारा आहे. हा त्याचा होरा पुष्कळ अंशीं खरा ठरला, आणि या वेळेपासून त्याची चलती सुरू झाली.

त्रिंबकजी डेंगळा हा हजरजबाबी, साहसी व शूर होता. कोणत्याहि संकटांत उडी टाकील व त्यांतून शिरसलामत बाहेर पडेल असा त्याच्या बुद्धीचा उरक होता. बाजीरावाविषयीं त्याच्या मनांत निस्सीम प्रेम होतें; व पेशव्यांचें जेणेंकरून कल्याण होईल तें तें सर्व करण्यास तो तयार होता. पेशव्यांची झालेली हलाखी व त्यांची सर्व बाजूंनीं होत असलेली घसरण ही त्यास पाहवत नव्हती. बाजीरावाची अशी केंविलवाणी स्थिति होण्याचें आदिकारण एकीएक इंग्रज आहेत अशी त्याची बालंबाल खात्री होती; तेव्हां इंग्रजांचा पांढरा पाय पेशव्यांच्या राज्यांतून काढून त्यांस पुन्हां पूर्वीचें वैभव प्राप्त करून द्यावें असें त्यानें ठाम ठरविलें होतें, व त्या दिशेनें त्यानें प्रयत्नहि केले.

पूर्वीं म्हणजे सन १८०२ च्या मार्च–ऑगस्टमध्यें वसईचा तह होण्याआधीं शिंदे–होळकरांनीं मराठेशाही इंग्रजांच्या पाशांतून सोडवून तिला स्वतंत्र करण्याची महत्त्वाकांक्षा धरली होती, तशांतलाच प्रकार त्रिंबकजीचा होता; पण त्रिंबकजीला स्वतःचें राज्य नसल्यानें मोठें नांव नव्हतें म्हणून त्याच्या प्रयत्नांस म्हणावें तसें तेज चढेना. तथापि त्याच्या मनाचा आटोप मात्र शिंदे–होळकरांच्याइतका होता. पण त्रिंबकजी डेंगळ्याच्या वांट्यास आलेला काल त्याच्या कल्पनेस मूर्त स्वरूप देण्यास अत्यंत प्रतिकूल होता. कारण वसईच्या तहाच्या पूर्वीच्या परिस्थितींत व आतांच्या परिस्थितींत जमीनअस्मानाचा फरक ! त्या वेळीं शिंदे–होळकर हे पेशव्यांचे पराक्रमी सरदार रिकामे होते—त्यांच्या मानेवर इंग्रज-सरकारच्या तहाचें जूं चढलें नव्हतें. ते मनांत आणते तर त्यांनीं कंपनीसरकारच्या राज्यास पायबंद घातला असता; पण त्या वेळीं ती गोष्ट झाली नाहीं. आतां तर शिंदे–होळकरांनीं इंग्रजांस पायबंद घालण्याचें दूरच राहून त्याऐवजीं इंग्रजांनींच त्या उभयतांना ठाणबंद केलें होतें. शिवाय त्यांच्या मनांत आतां पेशव्यांच्या-

बद्दलहि फारसा आदर राहिला नव्हता. याशिवाय वसईच्या तहानें खुद्द पेशवा हासुद्धां पुरेपूर इंग्रजांच्या घशांत उतरला होता. अशा स्थितींत मगरीनें गिळलेलें हें मराठी साम्राज्याचें माणिक तिचें पोट फाडून बाहेर काढणें फार कठीण होतें. त्याला शिव-समर्थांसारख्या नरनारायणाच्या जोडीचा अवतार व्हावयास पाहिजे होता, किंवा पहिल्या बाजीरावसाहेबाची शिकंदर समशेर रणांगणावर चमकावयास पाहिजे होती. पण या सर्व गोष्टी आतां अगदीं अशक्यप्राय असल्यामुळें त्रिंबकजी डेंगळ्याच्या प्रयत्नांस यश येणें शक्य नव्हतें. तरीहि त्रिंबकजीनें प्रयत्नांत कोणत्याहि तऱ्हेची कसूर केली नाहीं. किंबहुना त्यानें आपल्या आटोक्याबाहेर खटपट केली.

एवढा वेळपर्यंत सामान्यतः मराठ्यांची सत्ता कशी ठिसूळ आणि भुसभुशीत झाली होती याची कल्पना दिली. आतां त्यांच्या सत्तेचें मुख्य अधिष्ठान जो पेशवा तो स्वतः आपला खड्डा आपल्या हातांनींच कसा तयार करीत होता तें पाहूं. बाजीरावाचें वसईच्या तहानें आयतेंच काम झालें. राज्यरक्षणाची जबाबदारी इंग्रजानें शिरावर घेतली, त्याबरोबर त्याच्या स्वैरवृत्ति मोकाट सुटल्या. त्यानें शत्रुपक्षीय सरदारांचे सरंजाम व जहागिऱ्या जप्त केल्या. इतकेंच काय, पण जीं सरदारघराणीं त्याच्यावर लोभ करणारीं व वेळीं-अवेळीं त्यास मदत करणारीं होतीं त्यांनासुद्धां त्यानें सुखानें नांदूं दिलें नाहीं. त्यांच्या कारभारांत व गृहकलहांत उगीच ढवळाढवळ करावी, एकास हाताशीं धरावें तर दुसऱ्यास चांगला हात दाखवावा; एकास यू व दुसऱ्यास छू करावें, आणि मग उभयपक्ष झुंजूं लागले म्हणजे स्वतः गंमत पाहावी. इंग्रजांच्या कृपेमुळें लाभलेल्या या दिवाळींत आपण उडविलेले हे फटाके व आपटबार शेवटीं आपणासच आपटी देणार आहेत याची त्यास कल्पनाहि नव्हती. या फटाक्यांतून धुमसत राहिलेल्या ठिणग्यांतूनच अग्नीचा डोंब उसळून त्यांतच आपली उभी दौलत बेचिराख होणार आहे याचें पुसट स्वप्नसुद्धां बाजीरावास कधीं पडलें नव्हतें. बाजीरावाचे हे चाळे दृष्टीस पडतांच त्यास इंग्रजांनीं प्रतिबंध केला असता तर यदाकदाचित् बाजीरावाचें राज्य जास्त दिवस टिकलें असतें. पण इंग्रज बाजीरावाचें राज्य जास्त दिवस टिकवण्याकरितां आले नव्हते; हिंदुस्थानच्या शिरावर तुऱ्याप्रमाणें शोभून दिसणारा भगवा झेंडा काढून टाकून त्यांस तेथें स्वतःचा बावटा लावावयाचा होता. पण 'फळ पिकल्याशिवाय तोडूं नये, व गळूं

पिकल्याशिवाय फोडूं नये' या राजकारणांतील नीतीचा अवलंब त्यांनीं प्रथमपासूनच केला होता.

इकडे बाजीराव सरदारांचें मनाला मानेल तसें वाटोळें करीत होता, पण त्याच वेळेला त्याचें इंग्रज रेसिडेन्टाशीं वर्तन अत्यंत गोड होतें. बाजीरावाची रसना फारच मधुर! तो आपल्या मिष्टान्न भाषणानें मोठमोठ्या मुत्सद्द्यांस सहज चकवीत असे. त्याच्या कारकीर्दींत कर्नल क्लोज, हेन्री रसेल, अलफिन्स्टन असे तीन रेसिडेन्ट झाले. या तिघांसहि त्यानें आपल्या गोड बोलण्यानें वश करून घेतलें होतें. रेसिडेन्टाचे जितके हेर पेशव्यांच्या दरबारीं असत तितकेच बाजीरावाचे हेर रेसिडेन्सींत असत. हें जरी खरें, तरी इंग्रजास बाजीरावाच्या सर्व बातम्या कळत. याच्या उलट बाजीरावास इंग्रजांचें कारस्थान कळण्याचा संभव फारच कमी. कारण इंग्रज परका व परकी भाषा बोलणारा. तेव्हां बचरजीसारख्या सामान्य माणसास कळणारें राजकारण बाजीरावास कळे. अशी स्थिति होती. इंग्रजांचा लष्करी बडगा दाखवून त्यानें स्वतःच्या जहागिरदारांवर वचक बसविला खरा, पण राज्यरक्षणाच्या उपयोगी पडतील असे आपले जहागिरदार त्यानें कायमचे दुखाविले. एवढेंच नव्हे तर यापुढें आपल्या पदरीं एकहि सरंजाम ठेवावयाचा नाहीं, स्वतंत्र पगारी पायदळ ठेवावयाचें व त्याचा अधिकारी इंग्रज नेमावयाचा असें ठरविलें. या त्याच्या नवीन धोरणानें तर इंग्रजांचें आयतेंच फावलें.

बाजीरावानें आपल्या या नव्या फौजेवर कॅप्टन जॉन फोर्डची नेमणूक केली. फौजेंत लोक भरले तेहि परदेशी. हा इंग्रज सरदार व त्याची ही परदेशी फौज पलटणींत शिरतांना राजनिष्ठेची शपथ घेई, पण ती शपथ जगावेगळी औरच. ती अशी "आम्ही बाजीरावाशीं इमानानें राहूं, पण बाजीराव इंग्रजांशीं इमानानें राहील तोंपर्यंत." जणुं त्यांना महिन्याच्या महिन्याला चरिंदा इंग्रजच देत होता. पण असल्या फुसक्या शपथेच्या इमानावर विश्वास ठेवून पगारी फौज ठेवणाऱ्या शहाण्या राज्यकर्त्यांचें उदाहरण मात्र जगांत इतरत्र कोठेंहि आढळणार नाहीं. आपलाच दाम खोटा, दुसरें काय! अशा तऱ्हेनें रावबाजीनें आपल्या हातांतील समशेर स्वखुशीनें इंग्रजांच्या ताब्यांत दिली. याच्या उलट इंग्रजांनीं मात्र आपला पाय मराठी राज्यांत शाबूत व कायमचा रोंवला. सरदारांचे सरंजाम जप्त करण्याचें सत्र चालू

करून बाजीरावानें प्रत्येक सरदारागणिक शत्रु निर्माण केला, व इंग्रजांनीं या त्याच्या कृतीस वेळोवेळीं आडकाठी करून तेच सरदार स्वतःचे स्नेही बनविले. येणेंप्रमाणें बाजीरावानें स्वतःच्या नाशाची तयारी जारीनें चालविली व इंग्रजांच्या कराल जबड्यांत अजात उतरण्याच्या मार्गास तो लागला.

अशा तऱ्हेनें मराठ्यांच्या स्वराज्यमंदिराचा कळस कललेला व पाया खचलेला स्पष्ट दिसत होता, व असल्या आणीबाणीच्या प्रसंगांतून त्यास सोडवून पुन्हां सुप्रतिष्ठित करण्याची असामान्य महत्त्वाकांक्षा त्रिंबकजी डेंगळ्याची होती. त्रिंबकजीच्या महत्त्वाकांक्षेचा पल्ला फार मोठा होता; पण ती पूर्णपणें तडीस नेण्यास मात्र तो तितका लायक नव्हता. जन्मतः दरिद्री असल्यामुळें त्याच्याजवळ तितकीशी शीलसंपन्नता नव्हती; सूक्तासूक्त विचार नव्हता. अंगांत दरबारी हलकटपणा पुरेपूर भरलेला. अशा या दुर्गुणांमुळें त्याची कोणावरहि छाप बसली नाहीं. उलट त्याच्या नादानें रावबाजीच्या नादानपणांत जास्तच भर पडली; व त्यामुळें श्रीशिवरायांनीं संस्थापिलेल्या व पेशव्यांनीं विस्तारिलेल्या मराठी साम्राज्याचा अंत झाला.

प्रथम हुजऱ्या, नंतर निरोप व लखोट्यांची ने-आण करणारा जासूद या पायऱ्या त्रिंबकजी झटाझट चढला; आणि छोटेखानी सरदार होण्यापर्यंतची मजल त्यानें जरी उघडाउघड मारली नाहीं तरी सरदारी सत्ता गाजविण्याचें भाग्य त्यास इ. स. १८०४ नंतर केव्हां तरी लाभलें. बाजीरावानें त्यास सातारकर छत्रपतीवर नजर ठेवण्यासाठीं नेमिलें. यापुढील पांच-सात वर्षें त्यानें अशींतशींच काढलीं. त्रिंबकजी आपल्या मालकाप्रमाणेंच कपटनीतिनिपुण होता. इ. स. १८११ पासून त्याच्या कर्तबगारीस प्रारंभ झाला. तो कसाहि असो पण एवढें मात्र खरें, कीं तो बाजीरावाशीं शेवटपर्यंत एकनिष्ठ होता. त्यानें आपल्या कपटनीतीचा पहिला हिसका चतुरसिंग भोसल्यास चांगलाच दाखविला. मराठी राज्याच्या अंतकाळीं मराठ्यांच्या स्वातंत्र्यासाठीं अहोरात्र तळमळणारी जी कांहीं बोटांवर मोजण्याइतकी मंडळी होती त्यांच्यांत चतुरसिंग भोसल्याची गणना प्रामुख्यानें करावयास पाहिजे. चतुरसिंग हा साताऱ्च्या गादीवर या वेळीं राज्य करणाऱ्या शाहूचा पहिल्या घरचा धाकटा भाऊ. त्या वेळीं शक्यतेपलीकडे असणारें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून बिचारा उभ्या भारतवर्षांत भटकत होता. मराठेशाहींत एके काळीं दिक्पाल

म्हणून गाजलेले रथी-महारथी एकामागून एक टोपीकरांच्या कराल जबड्यांत नाहींसे होत होते; त्यांचीं राज्यें गडाडत होतीं, त्यांचीं सिंहासनें उध्वस्त होत होतीं, आणि त्यांचे राजमुकुट आणि किरिटकुंडलें इंग्रजांच्या राजदंडानें अवमानिलीं जात होतीं. अशा स्थितींत त्याच्या महत्त्वाकांक्षेचा पल्ला ओळखून तिच्याशीं समरस होणारा असा फक्त एकच रणधुरंधर महापुरुष शिल्लक होता तो म्हणजे यशवंतराव होळकर; त्यास भेटण्यासाठीं तो गेला. त्या वेळीं त्याच्या मनाची स्थिति सर्व बाजूनीं फार भयंकर होती. निराशेचे तडाके तो खात होता. अशा स्थितींत त्याच्या मनास जबरदस्त धक्का देणारी गोष्ट घडून आली ती म्हणजे साताऱ्च्या गादीवर राज्य करणारा त्याचा वडील भाऊ शाहू हा इ. स. १८०८ मध्यें निवर्तला. त्याबरोबर बाजीरावानें त्याची स्त्री व मुलगा बाळासाहेब यांस कैदेंत टाकलें. या दोन्ही बातम्या त्यास कळतांच त्याचा सर्व धीर खचला. त्याचे सर्व प्रयत्न ज्या एका गोष्टीकरितां चालले होते तिचा मुख्य आधार म्हणजे मराठ्यांचा राजा, साताऱ्च्या सिंहासनाचा मालक, शाहू, हा निवर्तल्यानें त्याची तीव्र निराशा झाली. अशा स्थितींत जिवाला थोडा विरंगुळा वाटावा म्हणून तो यशवंतरावाच्या भेटीस इ. स. १८०९ च्या जानेवारींत गेला, तों तेथें त्यास यशवंतरावास वेड लागल्याचें आढळून आलें. मग तर त्याची फारच निराशा झाली. अशा अगदीं व्याकुल परिस्थितींत त्यास आणखी जास्त विव्हल करणारी बातमी कळली ती अशी कीं, प्रतापसिंहास गादीवर बसवून बाजीरावानें खूष केलें आहे. या बातमीनें तर त्याची जास्तच कुचंबणा झाली. कारण पेशव्यांचें व सातारकरांचें फारसें बरें नव्हतें, आणि चतुरसिंग सातारकरांचा पक्षपाती म्हणून बाजीराव त्याला पाण्यांत पाहात होता. अशा स्थितींत आपण साताऱ्यास गेलों तर आपली काय शोभा होईल! कोणतें दुर्दैव आपणापुढें वाढून ठेविलें असेल याचा त्यास अंदाज येईना! यशवंतराव होळकराची ती केंविलवाणी स्थिति पाहून तो व्याकुळ अंतःकरणानें व साश्रु नयनांनीं इ. स. १८०९ च्या जुलईंत उज्जनी सोडून धारेस आला. या वेळीं धारेससुद्धां मोठी धामधूम चालू होती, त्यामुळें चतुरसिंगाचीं दोन वर्षें तेथेंच गेलीं. यानंतर त्रिंबकजीनें चतुरसिंगास माणसें पाठवून साताऱ्यास मोठ्या अगत्यानें बोलाविलें आणि अभिवचन दिलें कीं, बाजीरावाच्या मनांत आपल्याविषयीं कोणत्याहि तऱ्हेचें किल्मिष नाहीं. उलट आपला चांगला

बंदोबस्त करून द्यावा असेंच आहे, तरी आपण या प्रान्तीं येण्याचें करावें. ' अत्यादरः शंकनीयः ' या न्यायानें चतुरसिंगास त्रिंबकजीच्या या निरोपाची शंका यावयास पाहिजे होती; पण त्याच्या दुर्दैवानें तसें झालें नाहीं. त्यानें या विनंतीस मान देऊन सातारीं येण्याचें ठरविलें.

चतुरसिंग धारेहून गुजराथेंत आला, व इ. स. १८१० च्या श्रावणांत बडोद्यांत आला. तेथें गंगाधरशास्त्र्याची गांठ घेऊन त्यानें त्यास विचारलें कीं, मराठी राज्यसंरक्षणाचे बाबतींत बडोदकर कितपत मदत करूं शकतील? या त्याच्या विचारण्यास शास्त्र्यानें सांगितलें कीं, येथें गायकवाडीं इंग्रजाच्या हुकमाशिवाय झाडाचें पानसुद्धां हालत नाहीं. अशा स्थितींत तुम्हांस तुमच्या कामीं मदत मिळणें कालत्रयींहि शक्य नाहीं. बडोदें-दरबारचा मनसबा एकंदरीनें चतुरसिंगाच्या लक्षांत आला. याच सुमारास त्रिंबकजी डेंगळा खानदेशांत आला होता. त्याजकडून पुन्हां अगत्याची बोलावणीं आलीं, तेव्हां चतुरसिंग बडोद्याहून निघाला तो सोनगडचे वाटेनें खानदेशांत आला. या वेळीं त्रिंबकजीचा मुक्काम मालेगांवास होता. या ठिकाणीं बेलभंडार इमान होऊन ता. १०-२-१८११ चा दिवस भेटीसाठीं ठरला. गिरणेच्या कांठीं उत्तरेस चतुरसिंगाचा मुक्काम असून दक्षिणेस त्रिंबकजीचा तळ होता. मेजवानीचा बेत ठरला. त्याच्या खर्चाचा ऐवज, शाकभाजी व फर्मास त्रिंबकजीनें पाठविला. सहा घटका रात्रीं गोटाबाहेर खलबताची बैठक झाली. या ठिकाणीं चतुरसिंगराजे, रघुनाथराव गुजर, बापू फडणीस व अप्पाजीराव इंगळे हे चार असामी, यांशिवाय गोपाळराव न्यायाधीश, अप्पाभट पुणतांबेकर व त्याचे दोन बंधु, बाबाजी केशव पाडलीकर, लाडेखान जामदार व हवालदार, खिजमतगार इत्यादि मिळून एकंदर अकरा असामींस एकाएकीं वेढा घालून दगा केला. या प्रसंगीं स्वतः त्रिंबकजी तर आलाच नाहीं. त्यानें या सर्व मंडळीस मालेगांवच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेविलें व त्यांचा गोट लुटून साफ केला. पुढें वैशाखांत म्हणजे १८११ च्या मे महिन्यांत बाजीराव नाशकास आला असतां तेथें या सर्व राजकैद्यांस त्रिंबकजीनें बंदोबस्तानें नेलें. बाजीरावास आपला शत्रु हातीं लागला म्हणून मोठा आनंद झाला, व त्यानें लगेच त्यास बेड्या घालून रायगडावर रवाना केलें; आणि त्याच्याबरोबरच्या दहावीस मंडळीस निरनिराळ्या किल्ल्यांवर कैदेंत टाकिलें. रायगडनजीकच्या कांगोरी किल्ल्या-

वर कैदेंत असतांनाच ता. १५-४-१८१८ रोजीं चतुरसिंगाचा अंत झाला. अशा अत्यंत करुणाजनक स्थितींत मराठ्यांचें राज्य नीट सुव्यवस्थित व्हावें म्हणून अहोरात्र तळमळणाऱ्या या पुरुषाचा अंत झाला. चतुरसिंगाच्या अस्थि इंग्रज सरकारच्या राजवटींत बाळाजीपंत नातूच्यामार्फत वाईस आल्या व तेथून त्या साताऱ्यास पाठविण्यांत आल्या, आणि तेथें त्याचें उत्तरकार्य करण्यांत आलें.

बाजीरावाच्या मार्गांतील चतुरसिंगाचा कांटा त्रिंबकजीनें काढिला. या वेळपासून म्हणजे, इ. स. १८११ पासून, तों तहत् दुसऱ्यांदा इंग्रजांच्या कैदेंत पडेपर्यंत त्याच्या उलाढाल्या एकसारख्या चालू होत्या. बाजीरावाचा मार्ग ज्या तऱ्हेनें सुकर होईल व इंग्रजांविरुद्ध जेवढें कांहीं साहित्य जमा करतां येईल तेवढें जमविण्याचा त्यानें एकसारखा सपाटा चालविला होता. इ. स. १८११ त शिंदे व रघूजी भोसले यांना मुद्दाम पत्रें पाठवून पेशवे यांच्याबद्दल आदर व प्रेमभाव उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. कारण इ. स. १८०२ पासून म्हणजे वसईच्या तहानंतर शिंदे, नागपूरकर भोसले वगैरे मंडळींत व बाजीरावांत फारसा घरोबा राहिला नव्हता. या नाहीं त्या तऱ्हेनें त्यानें सर्व सूत्रें पुन्हां गुंफण्याचा प्रयत्न चालविला होता, पण पेशवाईचा मुख्य सूत्रधार नादान असल्यामुळें त्याचा सर्व खटाटोप मराठ्यांच्या नाशास कारणीभूत झाला. त्रिंबकजी डेंगळा नाना फडणिसासारख्या योजक माणसाचे हातीं लागता तर त्याचें चरित्र फारच निराळ्या तऱ्हेनें लिहिण्याचा सुप्रसंग आला असता.

आतां पेशवे व इंग्रज यांचे परस्परसंबंध कसे होते, ते प्रेमाचे केव्हां व कोठपर्यंत होते, त्यांत वितुष्ट येण्यास केव्हां सुरुवात झाली, तें कसकसें येत गेलें व त्यास त्रिंबकजी कसा कारणीभूत झाला हें पाहावयाचें म्हणजेच त्रिंबकजीचें चरित्र साकल्येंकरून सांगावयाचें. तेव्हां आतां तिकडे वळूं.

इ. स. १८०२ मध्यें वसईचा तह होऊन बाजीराव इंग्रजांच्या ताब्यांत गेला. १८०२ ते १८०५ अखेर शिंदे-होळकरादि मराठी दौलतीच्या पराक्रमी सरदारांचे पंख खुडून इंग्रजांनीं त्यांस हतवीर्य केलें. त्यामुळें लढाईचें वातावरण नाहींसें होऊन हिंदुस्तानांत पूर्णपणें शांततेचे वारे वाहूं लागले. सर्व रियासती गुण्यागोविंदानें कालक्रमणा करूं लागल्या. तेव्हां इंग्रजांविरुद्ध कांहीं कारस्थानें रचण्याचें कारण उरलें नाहीं. त्यांच्या सत्तेच्या

सावलीखालीं सुखानें दिवस काढावे. शत्रूची ना धास्ती ना भय. " प्रधान-जी राज्याचा बंदोबस्त कसा काय आहे ? " असा प्रश्न राजानें विचारावा " रामराज्य आहे हुजूर " असा लघळपणें जाब प्रधानजीनें द्यावा, असें हिडीस स्वरूप राजकारणास आलें होतें. असा हा काल इ. स. १८१० पर्यंत गेला. इ. स. १८०५ ते १८१० पर्यंतच्या कालाचा उल्लेख असा सांपडतो. " वसईस तहनामा झाल्यावर राज्याचा बंदोबस्त कंपनी सरकार-च्या दोस्तीमुळें बंडावा वगैरे मोडून मुलूख आबाद झाला. सालोसाल वसुलीची पैदास वाढत गेली. सारे सरदार हुकूम मानूं लागले. त्यावरून श्रीमंतांची मर्जी सुप्रसन्न होती, सदाशिव माणकेश्वरानें रेसिडेन्टाशीं रहस्य ठेवून श्रीमंतांचें हित साधलें."

यानंतर एक मोठी घटना घडून आली ती म्हणजे एल्फिन्स्टन हा पुण्यास रेसिडेन्ट म्हणून आला; आणि याची कारकीर्दच बाजीरावास भोंवली व त्यास पेशवाईवर उदक सोडण्याचा अत्यंत दुर्धर प्रसंग आला. एल्फिन्-स्टन् इ. स. १८०२ मध्यें एकदां पुण्यास आला होता. त्या वेळीं वर्ष दोन वर्षें येथें मुक्काम करून पेशवाईचा झोकनोक त्यानें पाहिला होता. त्याला हिंदी भाषा चांगल्या अवगत असल्यामुळें दुभाष्या दलालाची त्याला जरूर नसे. पूर्वी क्लोज व बाजीराव यांच्यामध्यें खुरशेटजी मोदी दुभाष्याचें काम करीत असे. त्याचें व बाजीरावाचा कारभारी सदाशिव माणकेश्वर यांचें रहस्य असल्यामुळें तो मध्यस्थाचें काम सर्व धोरणें संभाळून नीट करी व बाजीरावाचें हित साधी. पण एल्फिन्स्टन्च्या नेमणुकीमुळें खुरशेटजी मोदीचें कांहीं कामच उरलें नाहीं. त्यामुळें बाजीराव व रेसिडेन्ट यांच्या-मधील एक आडपडदा नाहींसा झाला व हीं दोन्ही चाकें एकमेकांवर घासूं लागलीं; त्यांमध्यें मोवारीचें वंगण घालणारा मध्यस्थ नाहींसा झाला. याच सुमारास आणखी एक अनिष्ट गोष्ट झाली ती म्हणजे रावबाजी व त्रिंबकजी डेंगळा यांचें जास्त रहस्य जमलें. याचें कारण असें झालें कीं, सदाशिव माणकेश्वर हा इंग्रजांस सामील आहे हें त्रिंबकजीनें पुराव्यानिशीं चवाठ्यावर आणिल्यामुळें तो बाजीरावाच्या मर्जींतून उतरला व डेंगळ्याचें प्रस्थ पेशवे-दरबारीं माजूं लागलें. त्याची जरा चढती कमान सुरू झाली. तो राज्य-कारभारांत जास्त लुडबुडूं लागला. इतकेंच काय, पण रेसिडेन्टाशीं बोला-चाली करण्याचें कामसुद्धां तो करूं लागला आणि हीच गोष्ट अत्यंत अनिष्ट

अशी झाली. कारण त्रिंबकजी रेसिडेन्टाशीं चढेल वृत्तीनें वागूं लागला. याचा साहजिकच परिमाण असा झाला कीं, इंग्रज व पेशवे यांच्यामध्यें वितुष्ट येण्यास सुरुवात झाली व त्याचा शेवट पेशवाईच्या नाशांत झाला.

दरबार झुलविणें, शत्रूच्या गोटांत जाऊन त्याच्या अंतःकरणाचा भेद घेणें, जाबजबाब अशा तऱ्हेनें करणें, कीं आपला मतलब तर सोळा आणे साधावा व शत्रूस तर तोंडावर प्रश्नोत्तर करतांच येऊं नये अशा प्रकारची मुत्सद्देगिरीनें ओथंबलेली रसवंती ज्याच्या वैखरीवर अवतीर्ण झाली असेल अशीं मधुभाषणी माणसें, एखादें वेळेस समशेरीस न लाभणारें सुयश, आपल्या वाक्सुमनानें मिळवितात. निदान आजचीं संकटें उद्यांवर तर खासच ढकलतात. असा हा सांगोपचारी धोरणाचा महिमा आहे; पण त्याचा गंध-सुद्धां त्रिंबकजीस नव्हता. दौलतीच्या कामाचा त्यास अनुभव नव्हता त्यामुळें त्यास कामाचें धोरण साधेना. पहिले सांप्रदाय सोडून त्यानें नवीन नवीन रिवाज सुरू केले; आणि रेसिडेन्टाशीं अत्यंत उन्मत्तपणाची भाषा बोलण्यास सुरुवात केली. त्यामुळें एल्फिन्स्टन त्याच्यावर नाखूष झाला. जसजसा बाजीरावाचा त्याच्यावर लोभ वाढत गेला तसतसा त्याच प्रमाणांत एल्फिन्स्टनच्या मनांतून तो उतरूं लागला. अशा तऱ्हेनें टोपीकर व पेशवे यांचें प्रकरण चिघळूं लागलें. इंग्रजांच्या मनांत पेशव्यांविषयीं शत्रुत्वाचा अग्नि चेतविण्यास त्रिंबकजी कारणीभूत झाला. येथेंच त्याच्या कर्तबगारी-ची मर्यादा संपली नाहीं. तिनें इतर ठिकाणींहि धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली. पेशव्यांचे जुने व खानदानी सरदार, पानसे, पटवर्धन, रास्ते, निपाणकर यांचे सरंजाम जप्त करण्याचा त्यानें तडाका चालविला. हें त्यास सहज करतां आलें. बाजीराव व त्रिंबकजी यांची मोहतृष्णा येथेंच संपली असती तर फार चांगलें झालें असतें पण बाजीराव आतां कोल्हापूरकर व सावंतवाडीकर यांच्यावरहि आपले अधिराज्य सांगूं लागला, तेव्हां त्या मंडळींनीं आपली तक्रार रेसिडेन्टापुढें जोरानें मांडली. हा अन्याय रेसि-डेन्टास पाहवेना म्हणून त्यानें त्यांत हात घातला व तसें त्यानें करतांच बाजीरावाचें व त्याचें वैमनस्य वाढीस लागलें. बाजीरावाच्या दटावणीस भीक न घालतां एल्फिन्स्टननें मध्यस्थी करून सरदारांचे सरंजाम वांचविले. अशा तऱ्हेनें सरदारांच्यावरील मोठें संकट नाहींसें करून त्यानें पेशव्यांच्या सरदारांचा जो दुवा घेतला, तो त्यास पुढें चांगलाच उपयोगी पडला

ता. ७-७-१८१२ रोजीं बाजीराव पंढरपुरास असतां एल्फिन्स्टननें जहागीरदारांची नवी व्यवस्था करून घेतली. या नवीन करारामुळें बाजीरावाचा सरदारांवरील वचक नाहींसा झाला व सरदारमंडळीच्या मनांतील त्याच्याविषयींचें प्रेम व आदर पार रसातळास गेला. इतकेंच काय, पण त्या वेळीं बाजीरावाचें संरक्षण करण्यास इंग्रजांची तैनाती फौज नसती तर त्यांनीं बाजीरावास पदच्युतसुद्धां केलें असतें; याबद्दलची वाटाघाट त्यांच्यामध्यें चालली होती; पण एल्फिन्स्टनच्या मध्यस्थीनें हा बनाव व्हावयाचा टळला इतकेंच.

याच सुमारास म्हणजे ता. १-८-१८१२ रोजीं बाजीरावानें "गणपतराव पानसे याजकडील तोफखान्याचें काम दूर करून तें त्रिंबकजी डेंगळे यास सांगितलें. भांबुर्ड्यास नवीन दारूखान्याचें काम चालविलें व जुन्या तोफखान्यांत बाणांची नवी तयारी सुरू केली." या वेळीं बाजीराव सर्वस्वीं त्रिंबकजीच्या तंत्रानें वागत होता. तो सांगील ती पूर्व अशी स्थिति असल्यामुळें शाहण्यासुर्त्या माणसांचें कांहींच चालत नव्हतें. या वेळीं बाजीरावाचा खर्चहि पण वाढला होता. आज ना उद्यां आपणांस इंग्रजाशीं युद्ध करावें लागणार म्हणून त्या दृष्टीनें त्याची तयारी चालू होती. तेव्हां पैसा जास्त जमा करण्यासाठीं म्हणून तो चढावानें मामलती विकूं लागला. जो जास्त वरचढ बोलेल त्यास मामलत मिळे. मग त्याच्या लायकी-नालायकीचा प्रश्नच उरत नसे. "कामास लायक नसला तरी चढ बोलला कीं त्यास मामलत सांगावी, अशी पैदास सालोसाल वाढत गेली. देवस्थानें, धर्मादाय, इनामें यांवर चढ किती कबूल करावयाचा त्याचें मान राहिलेंच नाहीं. पांच हजार मामलतीवर पन्नास हजार बोलला कीं, त्याजकडे मामलत सांगावी असा प्रकार होऊं लागला. अखेरीस बाक्या खूप थकल्या. त्याबद्दल कित्येक मामलतदारांस अटकेंत घातलें तरी बाकी वसूल झाली नाहीं."

बाजीरावाच्या मुलुखाचा वसूल १। कोट रुपयांचा होता. त्यापैकीं दरसाल तो पन्नास लक्ष रुपये शिल्लक टाकी. सन १८१५ त त्याच्याजवळ नगदी शिल्लक पांच कोट रुपये होते. अशा तऱ्हेनें त्यानें पैशाची भरपूर तरतूद ठेविली व इंग्रजांशीं सामना देण्याची वेळ आल्यास भरपूर फौजफांटा व दारूगोळा लागणार म्हणून त्याच्याहि व्यवस्थेंत तो होता. अशा तऱ्हेनें

त्रिंबकजीच्या सांगण्यावरून बाजीरावाची उठावणी चालू होती. सन १८१४ त कार्तिकस्वामीच्या यात्रेस दुसऱ्यांदा जाण्याचा बाहणा करून, बरोबर बंदोबस्तासाठीं म्हणून त्यानें आणखी फौज ठेविली. श्रीमंतांची स्वारी यात्रेसाठीं म्हणून कर्नाटकांत निघाली, तेव्हां धारवाडचा सुभेदार बापू शिंदे बाजीरावास भेटण्यासाठीं आला. हाच जणुं त्यानें मोठा गुन्हा केला असा अनुभव त्यास आला. कारण बाजीरावाची त्यानें गांठ घेतांच किल्ला त्रिंबकजीच्या स्वाधीन करण्याबद्दल त्यास त्यानें फर्माविलें. या हुकुमाची तामिली त्यानें केली नाहीं. त्यानें साफच उत्तर केलें कीं, मी किल्ला त्रिंबकजीचें स्वाधीन करीत नाहीं. सरकारनीं दुसरा कोणताहि कारकून द्यावा त्याचे स्वाधीन करतों. या उत्तरानें त्रिंबकजी चिडून गेला व त्यानें लगेच बापूजी शिंद्याच्या तोंडांत मारून त्यास कैद केलें आणि दमदाटी करून किल्ल्याची सोडचिठी लिहून घेतली. यानंतर शिंद्याचा फडणीस गंगाधरपंत यास बरोबर घेऊन किल्ला ताब्यांत घेण्यासाठीं म्हणून गेला. किल्ल्यांत बापूजी शिंद्याचें बंधु सहकुटुंब राहात होते, तेव्हां डेंगळ्यास बाहेर बसावयास सांगून गंगाधरपंत किल्ल्यांत पुढील सर्व व्यवस्था करण्यासाठीं म्हणून गेला, आणि किल्ल्यांत जातांच गंगाधरपंतानें असें सांगून पाठविलें कीं, किल्ला ताब्यांत देत नाहीं. या निरोपानें डेंगळा फजीत झाला व त्यास परत फिरावें लागलें त्रिंबकजी परत आला व बाजीरावाबरोबर कार्तिकस्वामीचे यात्रेस निघून गेला. या गोष्टीवरून बाजीराव व त्रिंबकजी या उभयतांस त्यांचें सरदारमंडळ काय तऱ्हेनें मानीत होतें हें चांगलेंच लक्षांत येतें.

पिढीजात सरदारांचे सरंजाम जप्त कर, मामलती अवाच्या सवा चढानें वीक व खजिना संपन्न कर, या नाहीं त्या निमित्तानें सैन्य वाढीव अशा सर्व तऱ्हांनीं बाजीरावानें इंग्रजांस तोंड देण्याची तयारी चालविली; पण त्यांत मोठेंच वैगुण्य होतें. शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले असे मोठमोठाले महापराक्रमी सरदार या महत् कार्यासाठीं वश करून घ्यावे, पानसे, पटवर्धन, फडके वगैरे बरकंदाज लढवय्यांची सहानुभूति मिळवावी आणि प्रजेचा दुवा घ्यावा "बाजीरावमहाराजांचा जयजयकार असो बाजीराव महाराजांचा जयजयकार असो" अशी आनंदातिशयानें प्रजेनें ललकारी मारून युद्धास तोंड लागतांना आपलें अभीष्ट चिंतावें, ही गोष्ट करण्यास बाजीराव चुकला; आणि त्रिंबकजीस हा पोंच नव्हताच. तेव्हां ही जी

तयारी झाली ती म्हणजे एखाद्या पक्षघात झालेल्या माणसासारखी. अर्धे शरीर जिवंत असून भागत नाहीं. ज्याला स्वतःचे शरीरधर्म नीटपणें उरकतां येत नाहींत असा मनुष्य आखाड्यांत उतरून काय कुस्ती जिंकणार! आणि कसें यश संपादणार? त्यास गोटीबंद शरीर लागतें ही मुख्य गोष्ट बाजीराव व त्रिंबकजी यांच्या लक्षांत येत नव्हती व त्यामुळेंच त्यांचा घात होणार हें निश्चित झालें होतें.



## २ : : बडोद्याचे राजकारणांत टोपीकराचें वर्चस्व

पेशवे व टोपीकर यांच्या मनाची परिस्थिति या वेळीं इतकी कांहीं नाजुक व चमत्कारिक झाली होती, कीं बोलायची सोय नाहीं. केव्हां कोणाचें कोठें बिनसेल आणि प्रकरण हातघाईवर येईल याचा नेमच नव्हता. अंतःकरण सर्व बाजूंनीं सुन्न झालेलें, मनाच्या आकाशांत काळ्याकभिन्न ढगांची खेचाखेच उडालेली, सोसाट्याचा वारा सुटून विजेच्या कडकडाटानें आकाश केव्हां धरणीवर कोसळेल याचा नेमच नव्हता. उभयपक्ष आपणांस पाहिजे तेव्हां तो प्रसंग यावा म्हणून आटोकाट प्रयत्न करीत होते. अशा तऱ्हेनें दोन्ही पक्षांची प्यादीं पुढेंमागें सरकत असतां, गंगाधरशास्त्र्याचें मोहरें पंढरपुरीं इरेस पडलें व इंग्रज-मराठ्यांच्या शेवटल्या संग्रामास तोंड लागलें व त्यांत मराठयांची उभी दौलत बेचिराख होऊन त्यांस स्वातंत्र्यास आंचविण्याचा दुर्धर प्रसंग आला.

गंगाधरशास्त्र्याच्या खुनामुळेंच आपल्या चरित्रनायकाचें नांव इतिहासांत गाजलें तेव्हां हा बनाव कसा झाला तें पाहूं. इंग्रज-मराठयांच्या संग्रामास कारणीभूत झालेली कटकट, बडोद्याच्या गायकवाडांची मराठी साम्राज्याच्या अंतकाळीं प्रत्येक राजघराण्यांत कांहीं ना कांहीं तंटेबखेडे चालू होते व त्यास गायकवाडघराणेंहि अपवाद नव्हतें. मुख्यतः हे तंटे दौलतीसंबंधीं चालावयाचे. मुख्य गादीचा खास वारस हा अर्धवट व नादान असावयाचा व त्याचे भाईबंद ( औरस व अनौरस ) हे त्यापेक्षां बुद्धिवान्, व

पराक्रमी असावयाचे; आणि मग त्या भाऊबंदकीच्या भांडणास जोर चढून त्याचा निकाल इंग्रजांच्या मदतीनें लागावयाचा, हा जणुं त्या वेळचा शिरस्ताच. त्याप्रमाणें येथेंहि झालें. पेशव्यांकडून सेनाखासखेलीचीं वस्त्रें घेऊन आलेला शेवटचा पुरुष गोविंदराव गायकवाड, यास हीं वस्त्रें ता. १९-१२-१७९३ रोजीं मिळालीं. या गृहस्थास औरस पुत्र चार व त्याची रक्षा गजराबाई इच्यापासून झालेले दोन—कान्होजी व भगवंतराव. या दोहोंपैकीं कान्होजी हा फार पराक्रमी व शूर होता. त्यानें आपल्या आईच्या मदतीनें व प्रोत्साहनानें बापाविरुद्ध पुंडावा सुरू केला व त्यास जेर केलें. या संकटांतून गोविंदराव मोठ्या शिकस्तीनें पार पडला व त्यानें सन१७९४मध्यें बडोद्यास कारभार सुरू केला. या वेळीं गोविंदराव गायकवाडाचें गाडें नीट मार्गास लागावें म्हणून नाना फडणिसानें रावजी अप्पाजी फणसे नांवाच्या गृहस्थास कारभारी म्हणून बडोद्यास धाडलें आणि याच वेळीं अहमदाबादेची सुभेदारी अबा कृष्ण शेलूकर यास दिली व त्यास पेशव्यांची अर्धी भागी वहिवाटण्यास सांगितलें; पण पुढें लवकरच दुर्दैवानें नाना निवर्तल्यामुळे शेलूकराचा आधार तुटला.त्याबरोबर गोविंदरावानें अबा शेलूकराशीं लढून अहमदाबाद हस्तगत केलें आणि अबास कैद करून बलसाडच्या किल्ल्यांत ठेविलें. यानंतर बाजीरावानें अहमदाबादेची वहिवाट गोविंदरावाचा राखीपुत्र भगवंतराव याच्या नांवानें लिहून दिली. दरसाल पांच लाख रुपये देण्याच्या करार झाला. यानंतर मात्र गोविंदराव गायकवाडास फारच अडचणी आल्या पण त्यांतून त्याचा निभाव त्याचा शूर व पराक्रमी भाऊ बाबाजी आणि कारभारी रावजी अप्पाजी यांच्यामुळें लागला. या संकटांचा परिणाम त्याच्या मनावर जास्तच झाल्यामुळें त्याची प्रकृति खालावली व त्यांतच त्याचा अंत ता. १९-९-१८००रोजीं झाला. गोविंदरावाच्या मरणानें गायकवाडांच्या घराण्यांत भलत्याच भानगडी निर्माण झाल्या.

गोविंदराव जिवंत असतां त्याच्या बंदोबस्तासाठीं म्हणून रावजीनें आरबांचा मोठा रिसाला ठेवला होता. या आरबांनीं त्याच्या मृत्यूनंतर एवढा बंडावा केला कीं, त्याचें निराकरण कसें करावें याचा मोठा प्रश्न पडला. शेवटीं हें बंड शांत करण्यासाठीं गायकवाडास इंग्रजी पलटणांची मदत घेण्याचा दुर्धर प्रसंग आला व अशा तऱ्हेनें इंग्रजांचें बोट बडोद्याच्या राजकारणांत कायमचें शिरलें.

गोविंदरावाच्या मृत्यूनें दौलतीच्या वारसाहक्कासंबंधीं झोंबाझोंबीस सुरुवात झाली. 'बळी तो कान पिळी' हा निसर्गाचा न्याय नेहमींच प्रभावी असल्यामुळें कान्होजीनें औरस भावंडांस धाब्यावर बसवून दौलतीवर आपला हक्क सांगण्यास सुरुवात केली. या वेळीं गोविंदरावाची बायको गहिनाबाई इनें मोठी चतुराई केली. तिला स्वतःचें संतान नव्हतें म्हणून अडून न बसतां गोविंदरावाचा ज्येष्ठ व औरस पुत्र आनंदराव यास गादीवर बसवून रावजी अप्पाजीस पुढें करून तिनें कारभार चालू केला. आनंदराव स्थानापन्न झाला खरा; पण तो भोळा व अर्धवट असल्यामुळें घोटाळे माजले.

कान्होजी हा हुशार व पराक्रमी होता. त्यानें गहिनाबाईच्या या डावावर तोड काढिली ती अशी, कीं त्यानें आनंदरावाच्या भोळ्याभाबड्या स्वभावाचा फायदा घेतला व त्याचें मन गोड गोड थापांनीं वश केलें व आरबांच्या रिसाल्याचा दंडुका दाखवून कारभार हातीं घेतला. येथपर्यंत त्याचें करणें ठीक होतें; पण सत्ता हातीं येतांच तो मदांध झाला व त्यानें भलभलते चाळे करण्यास सुरुवात केली. गोविंदरावाच्या बायकोस व इतर महत्त्वाच्या आप्तांस कैदेंत टाकिलें; व खर्च भागविण्याच्या निमित्तानें जडजवाहिर नाहींसें केलें. या त्याच्या कृत्यांनीं राजघराण्यांतील सर्व मंडळी चिडली व हा डाव त्याच्याच अंगावर उलटला. ज्या आरबांच्या जोरावर त्यानें बडोद्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं त्याच आरबांस फितुर करून व रावजी अप्पाजीस पुढारीपण देऊन कान्होजीच्या नातेवाईकांनीं त्यास ता. २९-१-१८०१ रोजीं पकडून रणपूर येथें कैद केलें. कान्होजीच्या कारभारासंबंधीं खालीलप्रमाणें उल्लेख आढळतो:—

"आनंदराव गायकवाडानीं दौलत करावी, त्यांत कान्होजी गायकवाड दुसरे पुत्र रजपुताणीचे यांनीं पांच सहा महिने दौलत केली. त्यास कोणाचेंच भान नाहीं. खुद्द आनंदरावास कैद करून परम अमर्यादा केली. ती ईश्वरास न मानली. पौषमासीं कान्होजीस सर्वांनीं कैद केलें. त्या दिवसापासून रावजींनीं कारभार करावा त्यास शिबंदीचा गवगवा मोठा त्यामुळें चैन नाहीं." अशा तऱ्हेनें कान्होजीचें प्रकरण निकालांत निघालें; पण आरबांचें प्रस्थ गायकवाडीं फारच माजलें. त्यांच्या जाचणुकींतून सुटका होईना, तेव्हां हा जाच कायमचाच नाहींसा करण्याकरितां म्हणून रावजी

अप्पाजीनें इंग्रजांची मदत घेण्याचें ठरविलें व खंबायतेहून कुमक आणविण्याची तजवीज केली.

या वेळीं इंग्रजांचें दैव असें कांहीं जोरांत होतें, कीं त्यांनीं इच्छा करावी व ती लगेच फलित व्हावी. अमुक एका राजघराण्यांत आपलें प्रस्थ माजावयास पाहिजे असा विचार इंग्रजांच्या डोक्यांत येण्याचाच अवकाश, कीं लगेच त्या घराण्यांतील कर्ता पुरुष मृत्युमुखीं पडावयाचा. गादीसंबंधीं तंटेबखेडे माजून प्रकरण इतकें चिघळावयाचें, कीं त्याचा शेवट कांहीं भयंकर होतो कीं काय अशी भीति वाटावयाची, व मग या एकमेकांशीं कडकडून कळवंडणाऱ्या मांजरांनीं टोपीकरांकडे न्याय–इन्साफ मागावयास जावयाचें, आणि टोपीकरांनीं लोण्याचा गोळा गट्ट करून इन्साफ द्यावयाचा असा सपाटा एकसारखा चालू होता. तोच प्रकार बडोद्यासहि झाला. खंबायतेस जाऊन रावजी अप्पाजीनें इंग्रजांची पायधरणी सुरू केल्याबरोबर दुसऱ्या बाजूनींहि पण इंग्रजांच्या मनधरणीस सुरुवात झाली. लिलावांत माल तेजीनें जावा म्हणून लिलाववाला ज्याप्रमाणें चढानें बोलणारे आपले बगलबच्चे निर्माण करतो त्याप्रमाणें आपली दौलत व सत्ता सुखरूपपणें इंग्रजांच्या हातीं जावी म्हणून गायकवाडांच्या घराण्यांतील आत्मघातकी भाईबंदांनीं इंग्रजांची दाढी खाजविण्यास सुरुवात केली व इंग्रजांच्यावांचून आपणास गति नाहीं असा देखावा निर्माण केला. गोविंदराव गायकवाडाचा चुलतभाऊ, कडीचा जहागीरदार मल्हारराव गायकवाड म्हणून होता त्यास, जणुं उपभोगीत असलेली जहागिरी न पुरून जास्तीची हाव सुटली व त्यानें फौज जमा करून आपल्या पितृघराण्याची व दौलतीची लांडगेतोड करण्यास सुरुवात केली. या त्याच्या बंडाव्यांत गोविंदरावाचा दासीपुत्र मुकुंदराव गायकवाड हाहि मोठ्या ईर्षेनें सामील झाला. या दोघांस लढण्याची रग जिरवावयाची होती व आणखी दौलत कमावावयाचीच होती तर त्यांचा हात कोण धरणार होता. उलट शेराचे बच्चे म्हणून त्यांची पाठच थोपटली गेली असती; पण आतां तें तेज आणि ती बहादुरी राहिली होती कोठें ? त्यांस बापजाद्यांनीं कमाविलेली दौलत साहेबाच्या हातास हात लावून बुडाखालीं घालावयाची होती, इतकेंच !

"काय साहेब, आपणांस सुरत चौऱ्यायशी परगणा पाहिजे. त्याच्यावर आज

बरेच दिवस आपलें लक्ष आहे, तर तो हा घ्या व आम्हांस आमच्या भाई-बंदांची गर्दन मारण्याकरितां मदत करा." अशी मागणी मल्हाररावानें इंग्रजांकडे केली. अशा तऱ्हेनें दोन्हीहि पक्ष इंग्रजांकडे मदतीची याचना करीत होते. या वेळीं जरा झपाटा मारल्यास आपण भारतवर्षाचे सर्वसत्ताधारी सम्राट् होऊं असें कंपनीसरकारचे मुख्य अधिकारी वेल्स्ली यास यथार्थतेनें वाटत होतें व त्याप्रमाणें चढाईचें धोरण सर्वत्र चालू होतें. या वेळीं मुंबईचा गव्हर्नर डंकन याजकडे दोन्ही पक्षांच्या मागण्या व खटपटी चालू झाल्या. तेव्हां बडोदें प्रकरणीं काय धोरण ठेवावें याचा नीट कयास येण्यासाठीं मुंबई-च्या गव्हर्नरनें मेजर वॉकर नांवाच्या एका इसमास खंबायतेहून दोन हजार फौज बरोबर देऊन बडोद्यास धाडलें. वॉकर बडोद्यास दाखल होण्यापूर्वीच मल्हारराव व रावजी अप्पाजी यांचा सामना चालू झाला. रावजी अप्पाजीचें सुद्धां इंग्रजांशीं पूर्वीपासूनच सूत्र असल्यामुळें व त्यानेंहि सुरत परगणा लिहून देण्याचें कबूल केल्यामुळें हा इंग्रजांस घरात आणतो म्हणून त्याच्यावर पेशवे व गायकवाडांच्या पदरीं असणाऱ्या आरबांचा राग होता; आणि साहजिकच त्याच्या नांवानें हे लोक एकसारखे जळत होते. अशा स्थितींत मल्हाररावानें रावजीवर चालून घेतलें व रावजीची दाणादाण उडविली; आणि त्याच्या कुटुंबावर सक्त पाहरा ठेविला. अशा पेंचांत सांपडल्यामुळें त्यानें शिंद्या-कडून कुमक मिळविण्याची जोराची खटपट केली. पण त्या वेळीं शिंदे-होळ-करांच्या आपआपसांत तुफान लढाया नर्मदेवर चालू असल्यामुळें शिंद्यास रावजीस मदत करणें अशक्य झालें. शिंद्यांच्या हातानें बडोद्याचा तंटा मिटल्यास शिंदे-गायकवाडांचा मिलाफ होऊन बडोद्याचें राजकारण डोई-जड होईल ही भीति इंग्रजांस होतीच. तेव्हां वॉकरनें लगोलग बडोद्यास जाऊन तेथील बंदोबस्त केला.

कोणास हाताशीं धरावयाचें व कोणास डावलावयाचें याचा हिशेब अगदीं ठरलेला. इंग्रज कधींहि या बाबतींत चुकावयाचा नाहीं. त्यांनीं रावजी अप्पाजीची म्हणजेच आनंदरावाची बाजू घेतली. वॉकरची व आनंदरावाची भेट झाली. भेटींत आनंदरावाचा धांदरट स्वभाव चाणाक्ष वॉकरच्या झट्-कन लक्षांत आला. या मुलाखतींत आनंदरानानें रावजी अप्पाजीबद्दल धन्योद्गार काढून त्याच्या नेकदारीची स्तुति केली व मल्हाररावाबद्दल द्वेष व्यक्त केला. त्याबरोबर वॉकरनें आपलें धोरण ठरविलें तें असें कीं. रावजीस

उचलून धरून मल्हाररावास नरम करावयाचें. त्याप्रमाणें तो ता.२३-२-१८०२ रोजीं कडीवर (मल्हाररावाच्या जहागिरीचा गांव) चालून गेला; पण मल्हारराव चांगला बंदोबस्तानें असल्यामुळें वॉकरला त्यानें दोन महिने वंगविलें. त्यानंतर इंग्रजांच्या फौजा चौबाजूंनीं जमा झाल्या त्यामुळें त्याचा इलाज खुंटला व तो ता. ३-५-१८०२ रोजीं इंग्रजांस शरण आला. तेव्हा वॉकरनें त्याची समजूत करून त्याची सर्व व्यवस्था नाडियाद येथें करून दिली. अशा तऱ्हेनें जास्ती जिंदगी व दौलत मिळविण्यासाठीं निघालेला मल्हारराव फजित झाला.

शिकंदर नशिबाचा टोपीकर गायकवाडींत घुसला, इतकेंच नव्हे तर त्यानें तेथील राजा व अधिराज्य आपल्या लगामीं लावलें. वॉकरनें सहा महिन्यांच्या आंत सर्व कारस्थानें आणि बखेडे पार निकालांत काढले, आणि आनंदरावाचा व आनंदरावाजवळ रावजी अप्पाजीचा चांगला जम बसवून दिला. त्याचा मोबदलाहि भरभक्कम लाटण्यास त्यानें कसूर केली नाहीं. रावजी अप्पाजीनें इंग्रजांस पाहिजे असलेले सुरत परगणे लिहून दिले. येथवर दिलेल्या बडोद्याच्या राजकारणासंबंधीं खालीलप्रमाणें उल्लेख आढळतो.

"गायकवाड बंधूंचा कलह लागला आहे. मल्हाररावानें फौजा जमा करून तमाम मुलखांत दंगा करून रावजीशीं लढाई सुरू आहे. रावजींनीं गायकवाडांचे अठ्ठावीस महाल सुरतेनजीकचे इंग्रजास देऊन त्यांचीं पलटणें कुमकेस आणिलीं. म्हणोन गायकवाडावर पेशव्यांची बहुत बेमर्जी झाली. सुरतकर इंग्रजांनीं मदतीच्या निमित्तें गायकवाडींत प्रवेश करून स्वराज्यांत मोठाच कलह उत्पन्न केला."

सुरत परगण्याचें महादान ता. ६-६-१८०२ रोजीं हातीं पडतांच व गायकवाडाचें सावज पूर्णपणें हातीं लागतांच वॉकरनें मुंबईची वाट धरली आणि तेथें गायकवाडाशीं कसें धोरण ठेवावयाचें याची गव्हर्नराशीं वाटाघाट करून तो ता. ११-७-१८०२ रोजीं बडोद्यास परत आला व लगेच त्यानें ता. २९-७-१८०२ रोजीं तहाच्या अटीवजा एक पत्र आनंदरावाच्या स्वदस्तूरचें लिहून घेतलें, तें असें:—

"आरबांनीं आमचा उच्छेद करून प्राण घेण्यापर्यंत प्रसंग आणिला म्हणून आमची सर्व लोकांस अशी ताकीद आहे कीं, मेजर वॉकर सांगतील तो प्रकार अवश्य मान्य करावा. त्याविरुद्ध खुद्द आमचे हाताचा जरी लेख असला तरी

ती कोणी मानूं नये. आमचे दिवाण रावजी अप्पाजी, त्यांचीं मुलें, बंधू अगर दुसरे कोणतेहि नातेवाईक, तसेंच माधवराव तात्या मुजुमदार या सर्वांविरुद्ध जर कोणी कांहीं गैरशिस्त प्रकार अथवा दुष्टावा केला तर त्याचा बंदोबस्त इंग्रजांनीं करावा." बडोदकरांचे हातपाय बांधून टाकणाऱ्या या सर्व कलमावर ताण करणारें कलम येणेंप्रमाणें आहे. "बडोदकर गायकवाड असें लिहून देतात कीं, खुद्द आम्ही किंवा आमचे कोणी वंशज कांहीं गैरशिस्त वर्तणूक करूं तर इंग्रज सरकारनें मध्यें पडून त्याचा टाकोटाक बंदोबस्त करावा."

टोपीकराच्या अजब कृतीचा प्रत्यय बडोदकरास अशा तऱ्हेनें आला. राजाजींची अशी विल्हेवाट लावल्यानंतर प्रधानजींचा प्रश्न शिल्लक राहिला. त्याचाहि फडशा त्यांनीं अशाच प्रकारें पाडला. इंग्रजानें राजाकडून करारमदार लिहून घेतले काय व प्रधानजीस लिहून दिले काय, दोहोंचा अर्थ एकच आणि तो म्हणजे इंग्रजांचें हित आणि राजा-प्रधानजींचें अहित. इतकें करूनसुद्धां इंग्रज पुन्हां नामानिराळाच, आणि पुन्हां तो टिळेमाळा घालणाऱ्या पायधोळ संताप्रमाणें असें म्हणणारच कीं, "येथें कोणाचें काय बा गेलें ज्याचें त्यानेंच अनहित केलें." वर कंपनी सरकारनें राजाकडून करार लिहून घेतला तर प्रधानजीस खलिता लिहून देण्याचा फार्सहि पण त्यांनीं केला, त्याचा आशय असा:—"कंपनीचे तर्फेनें मेजर वॉकर असें कबूल करितात कीं, राजे रावजी अप्पाजी दिवाण व त्यांचे पुत्र, पौत्र व भाई, आणि सगेसोयरे, दोस्त व पुस्त दरपुस्त यांची दिवाणगिरी व कारभार गायकवाडांची दौलत तोंवरी चालेल. दरम्यान बहाद्दरी कंपनीची असे. तुमचे पुत्र, बंधू, नातेवाईक व स्नेही यांस कोणतेंहि संकट आल्यास त्यांचा संभाळ इंग्रज सरकार करील. इतकेंच काय, पण खुद्द बडोद्याचे महाराजांपासून सुद्धां जर तुम्हांस उपद्रव होऊं लागला, तर त्याचा बंदोबस्त इंग्रज करून देतील. तुमच्याकडे इनामी गांवें चालू आहेत ती तशींच चालू राहून त्या शिवाय सालिना साठ हजार रुपये तनखा इंग्रजांकडून तुम्हांस मिळेल." अशा तऱ्हेनें कंपनी सरकारच्या धोरणाचा कांटेरी लगाम बडोद्याचे राजे व प्रधानजी यांस घालण्यांत आला. या कार्यकुशलतेबद्दल मेजर वॉकरची सगळीकडे वहा झाली. आरबांच्या जाचांतून आपली मुक्तता झाली म्हणून आनंदराव आनंदांत दंग होता. आपली कायमची व्यवस्था

लागली व दिवाणगिरी वंशपरंपरागत पदरांत पडली म्हणून रावजी अप्पाजी खुषींत होता व गायकवाड पूर्णपणें आपल्या गळास लागला व आतां त्यानें कितीहि प्राणान्तिक आदळआपट केली तरी त्याची सुटका होणें अशक्य म्हणून टोपीकर सुखाचे निःश्वास टाकीत होता. एवंच, तिघेहि आनंदांत दंग होते; पण त्या आनंदांत परी होत्या, पर्याय होते. आनंद-रावाचा आनंद व रावजी अप्पाजीचें समाधान म्हणजे ते त्यांच्या सत्तेचे व मत्तेचे जात्या वेळचें विकट हास्य होतें. यानंतर गायकवाडाच्या राजचिन्हांची प्रभा टोपीकराच्या राजदंडापुढें हतप्रभ होणार होती. जणुं त्या अमंगळ प्रसंगाची हा करार म्हणजे नांदी होती.



## ३ : : गायकवाडाच्या दरबारीं गंगाधरशास्त्र्याचें महत्त्व

बडोदें दरबारचा एकंदर पट कसा होता; इंग्रज, गायकवाड व पेशवे यांचीं सोंगटीं कोठकोठें व कसकशीं होतीं, कोण कुणाला शह देऊन बुर्जी करणार हा मोठा कौतुकाचा विषय होता. डावास रंग चांगला भरला होता हा डाव इंग्रज जिंकणार हें जवळ जवळ निश्चित झालें होतें, कारण वॉकरनें आनंदरावाकडून आपणास पाहिजे तसा करार लिहून घेतला, आणि दरबारच्या दरबार घशांत टाकला. साहेबाची हुकमत जिकडे तिकडे चालू लागली. दिवाणास कोणी विचारीना, तर खुद्द खाशास्वारीकडे कोणी बघेना. असें झाल्याबरोबर जो तो पस्तावला व आपण हें काय केलें म्हणून मनांतल्या मनांत चरफडूं लागला, आणि थेट देवघरापर्यंत गेलेलें हें उंटाचें पिलूं कसें बाहेर काढावें याचा विचार आतां हे उंटावरचे शहाणे करूं लागले; पण त्यांना कांहीं एक उपयोग झाला नाहीं. त्यांचा प्रत्येक बेत त्यांच्याच अंगावर बेतला जाऊन इंग्रज कायमचा बळावला.

पहिल्यांदा रावजी अप्पाजीस ता. ८-६-१८०२ रोजीं कंपनी सरकारनें करार लिहून दिला व यानंतर सुमारें एक दीड महिन्यानें म्हणजे तारीख २९-७-१८०२ रोजीं आनंदराव गायकवाडाकडून कंपनी सरकारनें करार लिहून घेतला आणि या दोन्ही करारांस वसईच्या तहांत बाजीरावानें मान्यता दिली. अशा तऱ्हेनें हें काम वज्रलेप झालें. पण पुढें लवकरच रावजी अप्पाजी मरण पावला; त्या योगें गायकवाड-दरबारांतील एक बऱ्यापैकीं

मुत्सद्दी नाहींसा झाला व बडोदकरांच्या दौलतींत अत्यंत घोटाळे माजले. रावजीस औरस पुत्र नव्हता पण त्याचा वडील बंधु चिमाजी यास दोन पुत्र होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें सखाराम व सीताराम अशीं होतीं.

मरणापूर्वी अवघे दोनच महिने ता. २२–५–१८०३ रोजीं रावजी अप्पाजीनें सीतारामास दत्तक घेतलें. हा सीताराम व गंगाधरशास्त्री हे समवयस्क असल्यामुळें लहानपणचे खेळीमेळीचे दोस्त होते, पण पुढें राजकारणापायीं परस्परांचे प्रतिस्पर्धी ठरले. सेनाखासखेलीचीं वस्त्रें घेऊन गोविंदराव गायकवाड बडोद्यास आला, त्याच वेळीं रावजी अप्पाजी हा कारभारी म्हणून गुजराथेंत आला आणि या रावजीचे आश्रित म्हणून गंगाधरशास्त्री पटवर्धनाचे वडील आले. रावजीच्या खटपटीनें व शिफारशीनें मेजर वॉकरनें शास्त्र्यास दरमहा शंभर रुपयांवर गायकवाडांचा दरबारवकील म्हणून ता. २–२–१८०३ ला नेमिलें. हाच गायकवाडातर्फे रेसिडेन्टाशीं बोलणें-चालणें करीत असे. या वेळेपासून याची भरभराट सुरू झाली. शास्त्री तल्लख बुद्धीचा खटपटी आणि साहसी होता. त्याचा उपयोग टोपीकरांनीं चांगलाच करून घेतला. असें जरी होतें तरी हा केव्हां काय प्रसंग निर्माण करून आपणास गोत्यांत आणील याची धास्ती इंग्रजांस एकसारखी होती. अग्नीचा उपयोग घरें जाळण्याकरितां व अचाट शक्तीनें जगाला चकित करणारी वाफ निर्माण करण्याकरितां सारखाच होतो. फक्त योजक डोक्याची काय ती जरूरी असते. तें टोपीकराजवळ असल्यानें त्यानें गंगाधरशास्त्र्याचा शंभर टक्के उपयोग करून घेतला. इंग्रजांशीं बडोदेकरातर्फे बोलणारा हा वकील १८०३ पासून १८१२ पर्यंतच्या अवघ्या नऊ वर्षांत मुतालिक झाला. बाराशें रुपये साल मिळविणारा हा सामान्य मनुष्य साठ हजारीचा सरदार झाला, व त्यास मुतालिकीसारखी बहुमानाची व अत्यंत विश्वासाची जागा मिळाली. शास्त्र्याची ही धनरेषा कशी उमटली तें पाहावयाचें.

गोविंदरावानंतर आरबांचा दंगा मोडून बडोद्यांत मेजर वॉकरच्या मदतीनें शांतता प्रस्थापित करणारा रावजी अप्पाजी ता. १८–७–१८०३ रोजीं मरण पावला. त्याबरोबर त्याची दिवाणगिरी त्याचा दत्तक पुत्र सीताराम याजकडे गेली; पण सीताराम नामधारी दिवाण झाला. त्याच्या हातांत

काडीइतकीहि सत्ता राहिली नाहीं. जिकडे तिकडे टोपीकराचा ' बीचमें मेरा चांदभाई सुरू झाला. ' ही परिस्थिति सीतारामास असह्य झाली. याला कांहीं तोड काढावी म्हणून त्याच्या डोक्यांतील चाकें त्या दिशेनें फिरूं लागलीं. याच वेळीं म्हणजे स. १८०४ त होळकरांशीं इंग्रजांचा सामना चालू होता, तेव्हां होळकरांची गर्दन मारण्याकरितां म्हणून इंग्रजांतर्फे गायकवाडी सैन्य गेलें होतें. त्या सैन्याचें सेनापतित्व सीताराम याचा थोरला भाऊ सखाराम व त्याचा आजा काकाजी फणसे याजकडे होतें. त्यांनीं इंग्रजांच्या हुकमाची तामिली न करतां त्यांविरुद्ध वागण्यास सुरुवात केली. याच वेळीं आडदांड कान्होजीनेंहि पण बंडावा सुरू केला. त्याबरोबर काठेवाडांत इंग्रजांविरुद्ध बराच मोठा उठाव झाला. या सर्व पुंडगिरीचें आदिकरण सीताराम दिवाण असावा असा वॉकरचा ग्रह झाला व त्यानें त्यास कारभारांतून काढून टाकण्याचें ठाम ठरविलें व तो त्याच्या राशीस लागला. गेल्याच वर्षी आपण त्यास दिवाणगिरी वंशपरंपरागत लिहून दिली काय, त्याच्या वालीद-वारसांच्या संरक्षणाची जबाबदारी घेतली काय, आणि आज आपलें काम होतांच त्यास दिवाणपदावरून अर्धचंद्र देण्यास आपण सिद्ध होतों काय याचा सूक्ष्मसूक्ष्म विचार इंग्रजांजवळ नाहीं. मग हे करार तोंडी असोत वा कागदी असोत त्यांची पर्वा त्यांस नाहीं. प्रत्यक्ष लेखी पुरावा असतांनासुद्धां आम्हीं असले करार केलेच नव्हते असें धादान्त खोटें बोलण्यापर्यंत सुद्धां त्यांची मजल जाईल; पण फिरंगा स्वार्थास सोडणार नाहीं. म्हणूनच भोळ्याभाबड्या सत्यासत्याच्या कल्पना उराशीं धरणाऱ्या आम्हां हिंदूंवर त्यांनीं मात केली व भारतवर्षांत आपले अधिराज्य केलें. या यशाचें श्रेय बहुतांशीं त्यांच्या या विचित्र नीतिमत्तेस आहे असें म्हणण्यास कोणत्याहि तऱ्हेचा प्रत्यवाय नाहीं.

बडोदेकरांचे वंशपरंपरागत दिवाण व टोपीकर यांचें बिनसलें आणि त्यास पदभ्रष्ट करण्याच्या उद्योगास तो लागला. दिवाणाशीं बिघडलें तर बिघडलें, राजाशीं तरी त्याचें सूत असेल असें म्हणावें तर तसेंहि नाहीं. त्यांचें त्यांचेंहि पार फाटलें. अहमदाबादेची वहिवाट गोविंदरावानें पेशव्यांच्याकडून सालिना ५ लाखांच्या करारानें घेतली होती. पुढें १८०४ मध्यें हा करार बदलण्यांत आला व सालिना साडेचार लाख रुपये घेण्याचें ठरलें आणि अहमदाबादेची वहिवाट गोविंदरावाचा ज्येष्ठ राखीपुत्र भगवानराव याच्या

नांवचें ठेवण्यांत आली. हा करार दहा वर्षांचा झाला. हा करार १८१४ त संपत होता, त्यामुळेंच त्या वेळीं पुढील भानगडी झाल्या.

सीतारामास कारभारांतून काढावयाचें नक्की ठरलें होतें तेव्हां तें साध्य करण्यासाठीं कांहींतरी नवी क्लृप्ति केली पाहिजे त्याखेरीज आपलें करणें साजून दिसावयाचें नाहीं असें वॉकरनें ठरविलें व त्या दृष्टीनें त्यानें आपली चाल चालविली. तख्तनशीन आनंदराव हा बिचारा गरीब आणि भोळा असल्यामुळें राजकारणाचे धक्के-चपेटे सोसण्याची ताकद त्याच्यांत नव्हती. तेव्हां नको तें राज्य आणि त्या भानगडी असें त्यास झालें होतें. त्याचा वडील पुत्र भगवानराव हा हुशार व चणचणीत होता, त्यावर आनंदरावाची मर्जी होती. तो त्याचा लाडका होता म्हणून त्यास गादीवर बसवून आपण या जबाबदारींतून मुक्त व्हावें असें आनंदरावाच्या मनानें घेतलें. आनंदरावाच्या मनानें खूप घेतलें, पण त्यास साहेबाची संमति नव्हती; कारण भगवानराव हा बाणेदार असल्यामुळें इंग्रजांच्या ओंजळीनें पाणी पिणारा नव्हता. तेव्हां त्यावर वॉकर नाखूप होता. त्याच्या राजयोगाच्या मार्गांत हा साहेब तर आडवा आला होताच; पण दुसरीहि एक अडचण होती. ती म्हणजे भगवानराव हा आनंदरावाचा दासीपुत्र होता. आनंदरावाच्या पहिल्या भेटींत त्याच्या मर्जीनुरूप आपलीं सर्व सूत्रें हलविणाऱ्या वॉकरनें, आतां कार्यभाग होतांच, आपला रंग पालटला व धोरण बदललें. आनंदरावाचा नाद सोडून गायकवाडाच्या घराण्यात फूट पाडण्याच्या उद्योगास तो लागला. आनंदरावानें भगवानरावास गादीवर बसविण्याचें मनांत आणतांच वॉकरनें त्याचा भाऊ फत्तेसिंग यास हातीं धरण्याचें ठरविलें. वॉकरनेंसुद्धां पुष्कळ ठरविलें; पण त्यास आतां निराळेंच स्वरूप येण्याचा घाट दिसूं लागला. फत्तेसिंग ज्या तऱ्हेनें आपल्या हातीं लागावा अशी वॉकरची इच्छा होती त्याच्या अगदीं विरुद्ध गोष्टी होऊं लागल्या. फत्तेसिंगास सुद्धां राज्यावर प्रस्थापित करण्यास एक अडचण होतीच. फत्तेसिंगास गोविंदराव गायकवाडानें जेजुरीच्या खंडोबास वाहिलें होतें, त्यामुळें फत्तेसिंग व त्याची आई हे उभयतां जेजुरीस राहात असत; पण स. १८०२ मध्यें यशवंतराव होळकरानें जेव्हां पुण्यास वेढा घातला त्या वेळीं या मायलेकरास त्यानें आपल्या ताब्यांत घेतलें. इंग्रजांचें गायकवाडदरबारीं वाढणारें वजन यशवंतराव होळकरास नको होतें म्हणून इंग्रजांस तेथें हलके

करण्यासाठीं त्यानें या मायलेकरांची रवानगी गुजराथेंत केली. तो स. १८०३ त सोनगडाजवळ आला, आणि तेथून हळू हळू जम बसवीत ता. २०-१०-१८०३ रोजीं त्यानें बडोद्यांत प्रवेश केला व गहिनाबाईजवळ राहण्यास सुरुवात केली. गादीचा अस्सल वारस जवळ येतांच दरबारांतील मुत्सद्दी लोकांस एक तऱ्हेचा हुरूप आला. नादान आनंदरावाच्या खुळचटपणानें गायकवाडांच्या दौलतीस लागलेलें खग्रास ग्रहण आतां आपण नाहींसें करूं असें त्यांस वाटूं लागलें व दरबारास एक तऱ्हेचें तेज चढलें. दिवाण सीताराम, गहिनाबाई व अरब यांनीं फत्तेसिंगास पुढारीपण देऊन बडोदे-दरबारास चांगलाच रंग आणिला. हें पाहून वॉकरचें धाबें दणाणलें व आतां टोपीकराचें वर्चस्व नाहींसें होणार असें त्यास वाटूं लागलें. साध्या मार्गानें हा डाव जिंकला जाणार नाहीं अशी खात्री होतांच वॉकरनें भेदनीतीचा अवलंब केला आणि आनंदरावाची आवडती बायको तख्ताबाई इला वश करून तिच्यामार्फत हा बनाव जागच्या जागीं हाणून पाडला आणि आपणच फत्तेसिंगाच्या पठडींत शिरून सीतारामास दूर करण्याचा घाट त्यानें घातला. या कामांत त्याच्या हातास यश आलें. फत्तेसिंग देवास वाहिला असल्यानें त्यास गादीवर बसविण्यास धर्माची अडचण आली. तेव्हां शास्त्रार्थ काढून त्याची तुला ता. ३-४-१८०६ ला करण्यांत आली. त्याचे साडेचार हजार रुपये ब्राह्मणांस वांटून फत्तेसिंगास शुद्ध करण्यांत आलें आणि अशा तऱ्हेनें त्याच्या हातीं मुखत्यारी देण्यांत आली. या सर्व खटाटोपानें वॉकर बळावला व सीताराम नामधारी झाला याच सालीं वॉकरनें एक रीजन्सी कौन्सिल निर्माण केलें. त्यांत मुख्यसत्ताधारी स्वतः इंग्रज म्हणजेच आतां वॉकर, रीजंट फत्तेसिंग, नेटिव्ह असिस्टंट गंगाधर शास्त्री, आणि दिवाणाच्या जागीं सीतारामाच्या ऐवजीं त्याचा चुलता बाबाजी यास नेमलें. बाबाजी हा मोठा शूर आणि पराक्रमी होता. त्यानें तलवारीच्या बळावर काठेवाडांत माजलेले सर्व पुंडावे जागच्याजागीं जिरवून टाकिले होते. हा त्याचा पराक्रम वॉकरच्या नजरेसमोर होता. तेव्हां असला शूर योद्धा, दिवाण सीतारामाचा जवळचा नातेवाईक असल्यानें, तो त्याच्या हातीं लागूं नये म्हणून त्यासच दिवाण करून सीतारामाचा पक्ष त्यानें हलका केला.

या नव्या रिजन्सी कौन्सिलमध्यें गंगाधरशास्त्री हा वकिलाचा नेटिव्ह

असिस्टंट झाला. बडोद्याचें राजकारण वॉकरनें आपल्या लगामीं लावलें खरें; पण अजून एक आडदांड शक्ति त्याच्या हातीं लागली नव्हती. या शक्तीस योग्य मार्गदर्शक लाभला असता, तर बडोद्याचा इतिहास उलट्याचा पालटा झाला असता. ही चित्‌शक्ति म्हणजे कान्होजी गायकवाड होय. इंग्रजांचें सामर्थ्य फोडून काढण्याकरितां म्हणून भीमबलानें धडका घेणारा कान्होजी निराश होऊन गायकवाडीबाहेर भटकत होता. त्याचा कोठें निभाव लागेना, तेव्हां त्यानें सन १८०६ त वॉकरकडे तडजोडीचें बोलणें लावलें. या बोलाचालींत दोन वर्षें निघून गेलीं व सन १८०८ त सालिना चाळीस हजार रुपये तनखा घेऊन पादरा येथें वास्तव्य केलें. या स्थितींत त्यानें जेमजेम दोन तीन वर्षें काढलीं. त्याच्या मानी प्रकृतीस हें गुलामगिरीचें जिणें परवडेना. स. १८११ त त्यानें बडोदे हस्तगत करण्याचा पुन्हां एकदां जोराचा प्रयत्न केला. त्यास राणी तख्ताबाईनें माणसें व पैसा पुरविला, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. त्याच्या सर्व हालचालींवर पाळत ठेवून इंग्रजांनीं ता. २-४-१८१२ ला पादरा येथें एकदम छापा घालून त्यास पकडलें आणि त्याच्या पायीं बेड्या ठोकून प्रथम सुरतेस, नंतर मुंबईस व शेवटीं मद्रासेस त्याची खानगी केली. या शूर पुरुषाचा अंत तिकडेच झाला. त्याच्या निधनानें फत्तेसिंग वगैरे मंडळीस मोठी हळहळ वाटली; पण जबरदस्त इंग्रजांपुढें त्यांचें कांहीं चालेना. आपल्या मृत माणसांबद्दल अश्रुमोचन करण्याची सुद्धां त्यांस चोरी झाली. कान्होजीस साह्य करणाऱ्या राणी तख्ताबाईस इंग्रजांनीं सक्त बंदींत ठेविलें. या सर्व भानगडींत इंग्रजांस गंगाधरशास्त्र्याचा चांगलाच उपयोग झाला. तेव्हां त्याजवर कंपनी सरकार खूष झालें व त्यांनीं त्यास सालिना साठ हजारांचा तनखा व मुतालकी दिली. अशा प्रकारें गंगाधरशास्त्र्याचें महत्त्व गायकवाडीं माजलें.

बडोद्यास हें रीजन्सी कौन्सिलचें नवें खूळ उत्पन्न झाल्यानंतर कारभारांत कोणत्याहि प्रकारची सुधारणा झाली नाहीं, इंग्रजांचें वर्चस्व मात्र वाढलें. त्यांचा जाच दरबारास असह्य आला. उघडाउघड विरोध करण्याचें त्राण कोणांतच नव्हतें. जो कोणी तसें करी त्याचा मुळापासूनच कांटा निघूं लागला. तेव्हां अशा परिस्थितींत आपणांस त्राता आतां पेशव्यांशिवाय कोणी नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें, व बडोदेदरबार मोठ्या आशेनें पेशव्यांच्याकडे

पाहूं लागला. याच सुमारास म्हणजे स. १८१३ ते १८१४ या सालांत हिंदुस्थानांत इंग्रजांविरुद्ध मोठें आंदोलन सुरू होऊन त्याचे वारे येथेंहि वाहूं लागले होते. पण या वेळीं बडोदेदरबारची स्थिति मात्र फारच केंविलवाणी झाली होती. कारण सर्व कर्तबगार व पराक्रमी माणसें इंग्रजानें आपल्या दाव्यास बांधिलीं होतीं. गादीचा खुद्द मालक आनंदराव अगदीच नादान होता. फत्तेसिंगास इंग्रजांविरुद्ध ब्र काढण्याची छाती नव्हती; शिवाय बडोद्यांतील या प्रमुख मंडळींच्या हालचालींवर शास्त्र्याची बारीक नजर असे आणि त्यांच्यामार्फत त्या सर्व साहेबास कळत; तेव्हां ही पीडा येथून नाहींशी होईल तर फार चांगलें होईल असें सर्वांस वाटूं लागले व त्याप्रमाणें प्रयत्नांस सुरुवात झाली. सीताराम व राणी तख्ताबाई यांनीं या कामीं पुढाकार घेतला, व जोरानें कामास सुरुवात केली. गोविंद बंधुजी गायकवाड नांवाचा आपला एक हस्तक पुणेंदरबारीं खटपटीस धाडला. त्यानें खुरशेठजी मोदीची व त्रिंबकजी डेंगळ्याची गांठ घेतली. त्यांचीं बडोद्याच्या राजकारणीं कारस्थानें व खलबतें सुरू झालीं. मुंबईकर इंग्रजांत फितुर माजवावा म्हणून गोविंदराव बंधुजीचा मेहुणा महिपतराय व दुसरा महंमददाऊद नांवाचा एक मुसलमान गृहस्थ हे दोघे मुंबईस ठाण देऊन बसले. या वेळीं सर्व ठिकाणी हरिभक्त सावकाराच्या पेढ्या होत्या, त्यांच्यामार्फत या कारस्थानाचीं पत्रें येऊं-जाऊं लागलीं. मुंबईकर गव्हर्नराचे हाताखालील मुख्य मुख्य अधिकाऱ्यांस पैसे चारून बातम्या काढण्याचा उद्योग सुरू झाला. राणी तख्ताबाई व सीताराम यांचीं रात्ररात्र खलबतें चालूं लागलीं. त्यांनीं आनंदरावाकडून गव्हर्नरास व पेशव्यांस खुद्द स्वदस्तुरचीं पत्रें लिहून घेतलीं, कीं सीतारामाचे हवालीं कारभार करावा व पेशवा हाच मराठी राज्याचा मुख्य चालक असल्यामुळें त्यानें आपली सत्ता गायकवाडावर सांगून इंग्रजांचा जोर कमी करावा. अशा तऱ्हेचा डाव खेळावा असा या मंडळींनीं घाट घातला; पण या सर्व कारभारांत विघ्नें निर्माण करणारा शास्त्री हा होता. तेव्हां त्यास बडोद्यांतून हाकलावा असें त्यांनीं ठरविलें. शास्त्री हा आपल्या चुगलखोर स्वभावानें बडोद्यांत कसा सलूं लागला होता, तें यावरून चांगलेंच स्पष्ट होतें.

गंगाधरशास्त्र्यास बडोद्यांतून काढावा व इंग्रजांस बित्तंबातमी देणारें हें एक अमोघ साधन नाहींसें करावें व पेशव्यांच्या सहायानें इंग्रजांस गायक-

वाडीतून हुसकावा असें राजकारण बडोद्यांत जोरांत शिजूं लागलें. इतकेंच नव्हे तर त्या दृष्टीनें त्यांचे प्रयत्न चालू झाले. या वेळीं पेशव्यांनीं गायकवाडाकडे दहा वर्षांच्या करारानें दिलेल्या अहमदाबादेच्या वहिवाटीची मुदत आतां संपत आली होती; तेव्हां ती वहिवाट पुढेंहि गायकवाडांकडेच राहावी असें इंग्रजांस वाटत होतें, व तसे प्रयत्न एल्फिन्स्टनच्यामार्फत बाजीरावाकडे चालले होते. गुजराथची सुभेदारी गायकवाडाकडे चालू राहण्यांत इंग्रजांचा फायदा होता; कारण या ठिकाणीं त्यांचें वर्चस्व आतां चांगलें प्रस्थापित झालें होतें, आणि गुजराथेंत त्यांचा मुलूख ठिकठिकाणीं पसरला होता. पण याच्या अगदीं उलट बाजीरावाची स्थिति होती. त्यास अशी धास्ती वाटे कीं, यापुढें जर गायकवाडांकडे सुभेदारी चालू ठेविली तर तो एक कायमचा दाखला होऊन आपला हक्क शाबूत राहणार नाहीं. तेव्हां कांहीं झालें तरी गायकवाडाकडून ही वहिवाट काढावीच असें त्यानें निश्चित ठरविलें. ही गुजराथची सुभेदारी आपणांस मिळावी म्हणून पुष्कळांच्या खटपटी सुरू झाल्या. त्यांत खुरशेटजी मोदी व त्रिंबकजी डेंगळे हे मुख्य होते. खुरशेटजी मोदीनें बाजीरावास इंग्रजांविरुद्ध चिथावण्यास सुरुवात केली, त्याचा बोभाटा इतका झाला कीं, बडोद्याहून शास्त्र्यानें करनॅक रेसिडेन्टाच्या मार्फत एल्फिन्स्टनला असे कळविलें कीं, बाजीरावास आपल्याविरुद्ध चिथावणाऱ्या मोदीस नोकरींतून एकदम कमी करा. गोविंदराव बंधुजीनें पुण्यास येऊन गायकवाडामार्फत राजकारण असें कांहीं जोरांत चालविलें कीं, पुण्याचा रेसिडेन्ट सतावून गेला व त्यानें बडोदा रेसिडेन्टास खडखडीत लिहिलें कीं, गोविंदराव बंधुजी पुण्यास राहून भलताच आगलावेपणा करीत आहे तरी त्यास माघारी बोलवावें. अशा तऱ्हेनें या राजकारणास मोठा जोर चढला होता; इतका कीं, उभयदरबारांतून तक्रारी सुरू झाल्या. तेव्हां त्यास पायबंद घालण्याचा इंग्रजांनीं कसून प्रयत्न चालविला; पण दिवसानुदिवस हें राजकारण चिघळत गेलें. या वेळीं म्हणजे स. १८१५ गहिनाबाईनें आनंदरावाचा वडील मुलगा भगवंतराव गायकवाड यास स्वतःचे पैसे देऊन गोविंदराव बंधुजीचे मदतीस पुण्यास धाडिलें. याच वेळीं आनंदरावाची चौथी बायको गयाबाई म्हणून होती तिनें आपला आपला मुलगा सयाजीराव यास कारभार द्यावा म्हणून पेशव्यांकडे खटपट चालू केली. याच वेळीं आनंदरावाचीं शिष्टाईचीं पत्रें घेऊन येणाऱ्या भगवंत-

रावाचा दरबार भरवून बाजीरावानें मोठा सत्कार केला. या गोष्टीनेंच साहेब चिडला, त्याच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. लगेच बडोद्याच्या रेसिडेन्टानें रीजन्सी कौन्सिलचा रीजंट फत्तेसिंग याकडे त्याबद्दल जोराची तक्रार केली. तेव्हां फत्तेसिंग म्हणाला कीं, या प्रकरणीं मला कांहींहि करतां येत नाहीं; फार झालें तर भगवंतरावाचा तनखा बंद करतां येईल. यानंतर आनंदरावाकडून इंग्रजांनीं भगवंतरावास पत्रें पाठविलीं कीं, तुम्हीं तावडतोब निघून बडोद्यास यावें. इंग्रजानें खूप लिहिलें पण त्याप्रमाणें वागण्यास गोविंदराव बंधुजी व भगवंतराव थोडेच बांधले होते. ते पुण्यास ठाणें देऊन बसले होते ते निघना निधेनात. तेव्हां त्या उभयतांस आपल्या हवालीं करण्याबद्दल एल्‌फिन्‌स्टननें जंग जंग पछाडलें पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. आनंदरावाची लाडकी राणी तख्ताबाई इनें त्याच्या मनांत असें भरविलें कीं, आपणच उठून पुण्यास पेशव्यांकडे जावें व हिशेबाचा घोळ मिटवून बडोद्याची व्यवस्था नीट लावून घ्यावी. या बातमीनें रेसिडेन्ट घाबरला. कारण पेशवे व गायकवाड हे एकमेकांस भेटल्यास नीट मजबुतीनें आपआपली व्यवस्था लावून घेतील तेव्हां हा कुयोग न यावा म्हणून त्यानें आनंदरावावर स्वतः पाहरा बसविला व त्यास बडोदा सोडून जाण्याची मनाई केली व अशा तऱ्हेनें हा बनाव टाळला.

इंग्रजांच्या करामतीनें आणि पकडापकडीच्या सैतानी धोरणानें वरील बनाव टाळला. पेशवे व गायकवाड यांचा मिलाफ होऊन त्यांनीं इंग्रजांवर मात करण्याची शक्यता संपली; पण गुजराथच्या सुभेदारीची व मागील हिशेबाची भानगड तशीच राहिली. बाजीरावानें पैशाची मागणी जोरांत चालू केली व तें प्रकरण अत्यंत जिकीरीवर आलें आणि त्यांतून कांहीं तरी तड काढणें उभयपक्षास अत्यंत जरूरीचें वाटूं लागलें. गुजराथेंत पेशव्यांचा निम्मा हिस्सा होता, त्याची ठरलेली रक्कम वर्षाच्या वर्षास गायकवाडाकडून बहुधा चुकती होत होती, त्यांत कोणत्याहि तऱ्हेचा बांधा निर्माण झाला नव्हता. नाहीं म्हणावयास मागील कांहीं देणें होतें त्यासंबंधीं मात्र कुरबुर चालू होती; पण हें प्रकरण हातघाईवर येण्यास कारण झालें तें असें कीं, अहमदाबादेच्या वहिवाटीची मुदत स. १८१४ मध्यें संपत होती. तेव्हां ती वहिवाट गायकवाडाकडून काढून आपण स्वतः करणार असें पेशवे म्हणत होते. पेशव्यांनीं गायकवाडाकडून वहिवाट काढण्यांत इंग्रजांचा तोटा होता;

तेव्हां अहमदाबादेची वहिवाट पेशव्यांनीं त्याकडेच ठेवावी असें त्यांस वाटत होतें; त्याप्रमाणें त्यांची खटपटहि चालू होती. एल्फिन्स्टन बाजीरावाकडे तशी भाषा बोलत होता. गायकवाडाकडे वहिवाट चालू ठेविल्यास तो कायमचा दाखला होऊन आपणास त्या हक्कास कायमचें मुकावें लागेल अशी साधार भीति बाजीरावास वाटत असल्यामुळें त्यानें ही वहिवाट गायकवाडाकडून काढण्याचा निश्चय केला. अहमदाबादेची वहिवाट आपणाकडे असावी म्हणून अनेक लोकांच्या खटपटी चालू होत्या, त्यांत खुरशेटजी मोदी हाहि एक होताच.

मोदी व एल्फिन्स्टन यांचें बरें नव्हतें. स. १८०१ ते २ पर्यंत क्लोजच्या हाताखालीं काम करीत असतां एल्फिन्स्टनला मोदीच्या स्वभावाची पारख चांगलीच झाली होती. त्यामुळें आतां तो सर्व कारभार मोदीला बाजूला सारून आपण अखत्यारीतें करी. त्यामुळें एलफिस्टन व मोदी या उभयतांत वितुष्ट आलें होतें. तेव्हां मोदीनें बाजीरावाचें मन एल्फिन्स्टनविषयीं कलुषित करण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता आणि या कामासाठीं त्यानें त्रिंबकजीस हाताशीं धरला होता. त्यानें त्याच्यामार्फत बाजीरावास असा इषारा दिला कीं, “ आजपावेतों साहेबाची चाल होती तशी एल्फिन्स्टनची नाहीं. त्याच्याशीं जाबसाल करणें तो संभाळून करीत जावा. त्यांनीं आपलें धोरण वेलस्लीसारखें ठेविलें आहे. आपले ठिकाणीं मजबुतीनें राहावें म्हणजे त्याचा इलाज चालणार नाहीं. आपला माझा अन्तःकरणापासून लोभ आहे म्हणून हें सुचवितों. ” हा उपदेश बाजीरावास रुचला आणि यापुढें त्रिंबकजी व शेटजी या उभयतांच्या सांगण्यावर बाजीरावाचा विश्वास जास्तजास्तच बसूं लागला; आणि ते सांगतील तसें तो वागूं लागला. आंतून आंतून कामकाजास त्रिंबकजीस यापूर्वीच घेतलें होतें पण आतां त्यास उघड उघड सरदार करून त्याच्या ताब्यांत फौजफांटा देऊन त्यास कामगिरीवर धाडण्यास श्रीमंतांनीं प्रारंभ केला. अशा तऱ्हेनें त्रिंबकजी व मोदी यांची गट्टी जमून दोघेहि एल्फिन्स्टनविरुद्ध राजकारणें करूं लागले. आणि हें त्या उभयतांचें धोरण बडोद्याच्या प्रकरणीं नडूं लागलें. साहेबास वंगवण्यासाठीं म्हणून मोदीनें असें चालविलें कीं, साहेब आपल्याशीं वाकून वागतो तर वागेना! श्रीमंत आपल्या हातांत आहेत तेव्हां त्यांच्याकडून साहेबाचे कामास वाटाण्याच्या अक्षता देण्यास सुरुवात केली कीं, लगेच साहेब

बंगेल व आपल्या कच्छपीं लागेल. म्हणून त्यानें बाजीरावास बदसल्ला देण्यास सुरुवात केली आणि या त्याच्या सांगण्यास त्रिंबकजीनेंहि पण भर दिली. हातांत बडगा असला, कीं साहेब नरम पडतो असें श्रीमंतांस त्या उभयतांनीं सांगावें, कीं बाजीरावानें सैन्याची भरती करावी. पेंढारी फौज टोपीकरास भारी आहे, ती परभारें निजाम व इंग्रज यांच्या मुलुखांत लांडगेतोड करून पोट भरील व आपणास लागेल तेव्हां ती आपल्या उपयोगीं पडेल. फक्त श्रीमंतांनीं त्यांच्यावर आपला लोभ आहे असा थाट दाखवावा, ही त्रिंबकजीची सल्ला श्रीमंतांस मानवली. श्रीमंत खूष झाले. त्याबरोबर शेठजी व त्रिंबकजी यांची चलती सुरू झाली. त्यांचा भरंवसा बाजीरावास जास्त जास्त वाटूं लागला. स. १८१४त श्रीमंतांचा मुक्काम कोरेगांव येथें असतां पेंढाऱ्यांचे सरदार त्रिंबकजीनें आणवून श्रीमंतांस भेटविले. मोठीं गोडीचीं भाषणें झालीं. आमच्या मुलखास उपद्रव न देतां परभारें पोट भरून असावें व प्रसंगीं आमच्या उपयोगीं पडावें, सरकारकडे तुमची चाकरी रुजू होईल काळजी नसावी. असा करार होऊन कृष्णाजी गायकवाड नांवाचा आपला हस्तक श्रीमंतांनी त्यांच्याकडे कायमचा ठेवून दिला व सरदारांस वस्त्रें देऊन निरोप दिला. बडोद्याचें लफडें ज्या वेळीं पुण्यास चालू होतें त्या वेळीं पेशव्यांच्या दरबारावर त्रिंबकजी व खुरशेटजी मोदी या उभयतांची पक्कड कशी बसली होती याची येथवर कल्पना दिली.

खुरशेटजी मोदी व त्रिंबकजी यांची जोडी फोडल्याशिवाय पेशव्यांच्या दरबारांतील घोळ नाहींसा व्हावयाचा नाहीं असा निश्चय एल्फिन्स्टननें केला व लगेच तसें करण्याचें ठरविलें. त्याने वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे लिहून कळविलें कीं, खुरशेटजी हा बाजीरावास आपल्याविरुद्ध चिथावीत असून उगीच नसत्या भानगडी उपस्थित करतो, तेव्हां त्यास कामावरून दूर करावें. याचें उत्तर वरून होकारार्थी येतांच त्यास रु. ५०० सेवानिवृत्त वेतन देऊन देशीं जाण्यास सांगितलें. यामुळें मोदीस अपमान झालासें वाटून त्यानें अमृत प्राशन केलें. अशा तऱ्हेनें एल्फिन्स्टनच्या मार्गांतील एक कांटा नाहींसा झाला हें जसें खरें, तसेंच त्रिंबकजीचा एक दोस्त नाहींसा झाला व त्याचा मार्ग तितकाच कठीण झाला हेंहि खरें.

आतां त्रिंबकजी व एल्फिन्स्टन यांचा सामना सुरू झाला आणि वास्तविक यापुढें ज्या घटना घडून आल्या त्यामुळें त्रिंबकजीचें नांव महशूर झालें.

अहमदाबादच्या निम्या वसुलाची वहिवाट स. १८१४ त संपतांच ती बाजीरावानें गायकवाडाकडून काढून तिच्यावर त्रिंबकजीची नेमणूक ता. २३-१०-१८१४ ला केली. त्याप्रमाणें त्रिंबकजीनें आपल्यातर्फेनें काम करण्यासाठीं म्हणून विठ्ठल नरसिंह नांवाच्या दुसऱ्या एका गृहस्थास रवानासुद्धां केला. अशा तऱ्हेनें वहिवाटीचा मुद्दा निकालांत निघाला; पण अजून घोळ पुष्कळच बाबतींत शिल्लक राहिला होता. आनंदराव गायकवाडाकडे नजराण्याची रक्कम रु. ५६ लक्ष निघत होती, याशिवाय अहमदाबाद स. १७५३ पेशव्यांनीं जिंकला त्या वेळेपासूनचें कांहीं देणें तुंबत तुंबत ३ कोटी रुपयांपर्यंत गेलें होते व या सर्व पैशाची मागणी बाजीरावानें एकटांकीं गायकवाडाकडे केली. एकदम तीन कोट रुपये देण्याची गायकवाडाची ऐपत नव्हती. याशिवाय हा सर्व हिशेब गायकवाडास मान्य नव्हता. हिशेबाचा प्रश्न महत्त्वाचा होताच; पण त्याहीपेक्षां महत्त्वाचे व गुंतागुंतीचे अनेक प्रश्न होते त्यांचा निकाल एकदांच लावून घ्यावयास पाहिजे होता. इतर कर्ज जसें सांचलें होतें तसेंच नजराण्याची रक्कमहि फार दिवसांची साचलेली होती. गायकवाड हा पेशव्यांचा मांडलिक तेव्हां त्याच्यावर हुकमत पेशव्यांची आहे किंवा नाहीं हा मोटा वादाचा आणि जिव्हाळ्याचा प्रश्न होता. नवीन वारस नेमतांना बाजीरावानें नजराणा घेण्याचा हक्क सोडणें म्हणजे आपलें अधिराज्य गमावण्यासारखें होतें. त्याचप्रमाणें कर्जाच्या वजावाटींतसुद्धां इंग्रजांच्या हिताचे व बाजीरावाच्या मूलभूत महत्त्वाच्या हक्कांसंबंधींचे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न उपस्थित होणार होते. तेव्हां पत्रोपत्रीं व खलित्यानें हें काम भागणार नव्हते म्हणून बाजीरावानें समक्ष वाटाघाटीसाठीं गायकवाडाचे वकील पुण्यास बोलाविले. तेव्हां इंग्रजांस साहजिक वाटले कीं, या गुंतागुंतीच्या जंजाळांत आपली बाजू बरोबर सांभाळील असा एकच पुरुष आहे व तो म्हणजे शास्त्री होय. स. १८१२ त एकदां फत्तेसिंगानें रेसिडेन्टास पत्र धाडून असें सुचविलें होतें कीं, शास्त्र्यास पुण्यास धाडावें म्हणजे तो आपल्या अक्कलेच्या जोरावर आपली बाजू बरोबर साभाळील आणि पेशवे दफ्तरांतील घोळ मिटवील. बडोद्यांत शास्त्री कोणासच नको होता तेव्हां ही ब्याद कोणत्या ना कोणत्या निमित्तानें एकदां पुण्यास जाईल तर फार चांगलें असें प्रत्येकास वाटे. तेव्हां त्यास पुण्याला नेणारी ही एक संधि आयतीच चालून आली व इंग्रजांनीं त्याच्या जिवाची जामीनकी घेतल्यावरून शास्त्री पुण्यास स. १८१४च्या फेब्रुवारींत दाखल झाला.

---

## ४ : : शास्त्र्याचा खून

गंगाधरशास्त्री स. १८१४च्या फेब्रुवारींत पुण्यास येऊन दाखल झाला. शास्त्री कांहीं सामान्य मनुष्य नव्हता, कीं तो वाऱ्याच्या झुळकेप्रमाणें येईल व जाईल. तें एक बडें प्रस्थ होतें. त्याच्या संरक्षणाची जबाबदारी टोपीकर इंग्रजानें घेतली होती. त्याच्यामागें तीन सत्ताधाऱ्यांच्या तीन समशेरी खड्या होत्या. त्यांनीं त्याचें संरक्षण करावयाचें, कीं त्याचा शिरच्छेद करावयाचा हें शास्त्र्याच्या कर्तबगारीवर अवलंबून होतें. बडोदेकरांच्या दरबारीं इंग्रजांचें प्रस्थ माजवावयाचें व पेशवा हलका करावयाचा आणि हें शास्त्र्याच्या करामतीनें तडीस गेलें, कीं बडोद्याची दिवाणागिरी त्यास मिळावयाची हें निश्चित; पण हा डाव हुकला, कीं ज्या बडोद्यांत शास्त्र्यानें फुलें वेंचलीं त्याच बडोद्यांत त्यास हिरमुसल्या चेहऱ्यानें वागण्याचा दुर्धर प्रसंग येणार होता. हें कळलें म्हणजे शास्त्र्याच्या महत्त्वाकांक्षेचा पल्ला केवढा मोठा होता याची स्पष्ट कल्पना येते.

मुंबईच्या गव्हर्नरची गांठ घेऊन शास्त्री पुण्यास आला व त्यानें पेशवे-दरबारचा ठाव घेण्यास सुरुवात केली. हिंदुस्थानांत सर्व राजेरजवाड्यांच्या दरबारीं बळावत चाललेल्या इंग्रजांचा हस्तक गंगाधरशास्त्री असल्यामुळें त्यालाहि थोडी 'ग'ची बाधा साहाजिकच झालेली. पेशवा तर बोलून चालून गायकवाडांचा मालक; तेव्हां तोहि ताठच. अशामुळें दोन्हीं बाजूंनीं ताठ झालेलीं हीं दोन टोकें कशीं मिळावयाचीं व त्यांत समेट कसा व्हावयाचा! तरी

सुद्धां उभयपक्ष आपल्या मगदुराप्रमाणें आपला डाव साधण्याचा तयारींत होते. शास्त्री पुण्यास आला; पण रेसिडेन्टाच्या मध्यस्थीशिवाय तो बाजीरावाची गांठ घेईना. पेशव्यास देण्यासाठीं गायकवाडाकडून आणलेला नजराणा रेसिडेन्टासमक्ष बाजीरावानें स्वीकारावा असा शास्त्र्यानें हट्ट धरला. शास्त्र्याचें हें धोरण बाजीरावास बिलकुलच पसंत पडले नाहीं. अशा तऱ्हेनें पाहिल्यापासूनच वैद्यास सुरुवात झाली. शास्त्र्यानें प्रारंभींच दाखविलेली रगेली त्याच्या चांगलीच अंगाशीं येण्याचा रंग दिसूं लागला. कारण बाजीराव त्याची दादच घेईना मग हिशेबाठिशेबाची बात तर दूरच. बाजीरावानें असें चढाईचें धोरण स्वीकारल्याबरोबर त्याच्या कारभाऱ्यांनीं शास्त्र्यास नादास लावून त्याच्याकडून पैसा उकळण्याच्या उद्योग सुरू केला. पण शास्त्री पक्का लुक्का असल्यानें कारभारी मंडळींचें हें धोरण त्याच्या तात्काळ लक्षांत आलें; व हिशेबाच्या कामांत आपणास यश मिळत नाहीं असें त्यास पुरतेपणीं वाटलें. तेव्हां आतां येथें राहण्यांत कांहीं एक तथ्य नसून आपण बडोद्याचा मार्ग सुधारावा असेंहि त्याच्या मनानें घेतलें. पण काम फत्ते न करितां बडोद्यास जाणें म्हणजे नामुष्कीचें जिणें, तेव्हां तेंहि करणें त्याच्या जिवावर आलें. हिशेबाच्या कामाचा फडशा पाडून शास्त्री माघारीं जाता तर सीतारामाची दिवाणगिरी त्याचीच होती, व मग दिवाण या नात्यानें गायकवाडाचें हित पाहणें हें त्याचें कर्तव्य होतें; पण त्यानें हात हालवीत माघारीं जाणें धोक्याचें होतें. कारण मग तो इंग्रजांशीं मिळून बडोदें व पुणें या दोन्ही दौलतींस धोका करणार हें ठरलेलें. तेव्हां या पेचास काय तोड काढावी हा मोठा प्रश्न बाजीरावास पडला.

प्रथम बाजीरावानें बडोद्यास आनंदराव व फत्तेसिंग यांची स्थिति काय आहे याचा तलास काढिला, तों त्यास त्याच्या हेरामार्फत असें खात्रीपूर्वक कळलें कीं, त्या दोघांसहि इंग्रजांचा तगादा आहे, ते त्यांच्या कैदेंत असल्यासारखे आहेत. इंग्रजांचा जाच त्यांस सहज होईना. या संकटांतून आपली मुक्तता पेशव्यांनीं करावी. कारण पेशवे आपले धनी. ही त्यांची अपेक्षा अगदीं रास्त होती. बाजीरावानें त्रिंबकजीमार्फत एल्फिन्स्टनला या बाबतींत सांगून पाहिलें पण त्यानें ह्या प्रकरणीं हालचाल करण्याचें साफ नाकारलें.

दोघांच्या बोलणीं पुष्कळच झालीं. शेवटीं एल्फिन्स्टननें असें लखख

सांगितलें कीं, "गायकवाड तहानें आमचा मांडलिक बनला." या उत्तरानें बाजीराव उसळला व "गायकवाड पूर्वापार आमचा नोकर आहे, आमच्या परवानगीशिवाय तुमचा ताबा स्वीकारण्यास त्यास काय अधिकार ? तसेंच आमचा चाकर सुखांत आहे किंवा नाहीं हें पाहणें आमचें कर्तव्य आहे. बडोदा रेसिडेन्टाच्या मध्यस्थीशिवाय त्यांची गांठ घेऊन आमचीं माणसें आलीं आहेत त्यांच्या सांगण्यावरून आनंदराव व फत्तेसिंग हे दोघेहि कैदेंत असल्यासारखे आहेत असें आम्हांस कळतें तरी या सर्व प्रश्नांचा खुलासा व्हावा." या सर्व प्रश्नांस एल्फिन्स्टन फक्त एकच उत्तर देई तें म्हणजे "तुमचा आतां गायकवाडावर हक्क नाहीं." या उत्तरानें बाजीराव चिडून जाई व म्हणे, "आमचा हक्क गायकवाडावर नाहीं म्हणतां तर मग त्यास वस्त्रें कोण देणार, वस्त्रें देण्याचा हक्क आमचा आहे कीं नाहीं ? नसल्यास तो केव्हां नाहींसा झाला व इंग्रजांनीं केव्हां घेतला ? वस्त्रें घेण्यासाठीं गायकवाडांनीं पुण्यास आलें पाहिजे का नाहीं." अशा तऱ्हेचें अनेक प्रश्न विचारून बाजीरावानें एल्फिन्स्टनला निरुत्तर केलें. असा आणीबाणीचा प्रसंग आला कीं, इंग्रजांचा सनातन ठरलेला शिरस्ता म्हणजे कालहरणाचा; त्याचाच अवलंब एल्फिन्स्टननें केला. "आपण उपस्थित केलेल्या सर्व प्रश्नांचा खुलासा गव्हर्नर जनरलकडे विचारून करतों" असें उत्तर देऊन ही वेळ तर एल्फिन्स्टननें मारून नेली. या वेळीं इंग्रज पेचांत होता. नेपाळांत त्यास अपयशांचे रट्टे बसत होते व भोपाळच्या नबाबावर शिंदा चालून गेला होता. तेव्हां पेशव्यांची कुरापत काढणें आतां तितकेंसें श्रेयस्कर नसल्यामुळें एल्फिन्स्टननें वेळ मारून नेली.

शास्त्री १८१४ च्या फेब्रुवारींत पुण्यास आला व पांचसहा महिने त्यानें इकडे तिकडे खटपट करून पाहिली पण कोठेंच कांहीं डाळ शिजेना. एल्फिन्स्टनलाहि पण बाजीरावानें निरुत्तर केलें, तेव्हां दसऱ्याच्या सुमारास एल्फिन्स्टननें शास्त्र्यास कळविलें कीं, आतां तुमच्यानें हें खेंकटें नेटेलसें दिसत नाहीं; तरी तुम्ही माघारीं जावें. साहेबाच्या या सांगीनें शास्त्री सर्द झाला. कदाचित् या वेळीं तो माघारीं जाता तर त्याच्या जिवास अपाय झाला नसता; पण शास्त्री काम न करतां माघारीं जाण्यास नाखूष होता. त्याच्यासारख्या महत्त्वाकांक्षी माणसास असें हात हालवीत माघारीं जाणें म्हणजे केवळ मरण ! हिशेबाचें काम फत्ते करून जाण्यांत त्यास एक तऱ्हेचा मान

होता, भूषण होतें. याशिवाय गायकवाडाची दिवाणगिरी त्यास मिळणार होती. पण काम न करतां जाणें म्हणजे बडोद्यांत कोण फजीतवाडा व नाचक्की! शास्त्री हिशेबाचें काम न करतां गेला तर तो कमजोर होऊन त्याचे सर्व बेत ढांसळणार होते व सीतारामास जोर चढणार होता हें ठरलेलें तेव्हां ही आपत्ति टाळण्याकरितां म्हणून शास्त्र्यानें एल्फिन्स्टनजवळून आणखी थोडे दिवस खटपट करण्याची संधि मिळविली.

गायकवाडावर अधिराज्य कोणाचें—पेशव्यांचें का इंग्रजांचें—याबद्दल गव्हर्नर जनरलकडून कांहीं खुलासा आला का नाहीं कोणास ठाऊक; पण एल्फिन्स्टननें मात्र इ. सन १८१५ च्या फेब्रुवारींत बाजीरावास पुढील-प्रमाणें रोखठोक कळविलें. "गायकवाडावरील ताबेदारी तुम्हीं सोडावी. तसेंच सीताराम रावजींचे दोन वकील गोविंदराव बंधुजी व भगवंतराव हे आमच्याविरुद्ध तुमच्या दरबारीं भलत्याच भानगडी करीत आहेत तरी त्यांस आमच्या हवालीं करावें. या दोन गोष्टी तुम्ही कराल तरच आम्ही गायकवाडाकडील तुमचें येणें येण्यासाठीं मध्यस्थी करूं नसल्यास या कामा-साठीं आलेल्या शास्त्र्यास माघारीं पाठवून आम्ही हें काम येथेंच सोडूं." एल्फिन्स्टनच्या या म्हणण्यास बाजीरावानें कांहींच भीक घातली नाहीं. त्यानें त्यास तितक्याच जोरांत कळविलें कीं, "गायकवाडाच्या बाबतींत आम्हांस तुमच्या मध्यस्थीची बिलकुल गरज नाहीं." बाजीरावाकडून हें उत्तर येतांच एल्फिन्स्टननें शास्त्र्यास बडोद्यास परत जाण्याबद्दल पुन्हां सुचविलें; पण शास्त्र्यानें ते ऐकलें नाहीं व त्यावर अशी तोड काढली कीं, मी आतां स्वतंत्रपणें बाजीरावाशीं बोलणें करून कांहीं मार्ग निघाला तर पाहतों व त्यांत अपयश आल्यास मी माघारीं जाण्यास तयार आहेच. एल्फिन्स्टन व शास्त्री यांच्यामध्यें गायकवाडाच्या राजकारणासंबंधीं चाललेली ही भाषा बाजीरावास कळतांच त्यास मोठा पेंच पडला. कारण इंग्रजांनीं मध्यस्थी सोडल्यास गायकवाडाकडील कर्जास कायमचाच खार लागणार होता. या बाबतींत सीताराम रावजीनें पेशव्यांस असें आमिष दाखविलें कीं, 'तुम्ही शास्त्र्याचा नाद सोडा. गायकवाडाकडील सर्व देणें आम्ही वसूल करून देऊं." सीता-राम रावजींचें हें बोलणें शक्य होण्यास एक मोठी अडचण होती ती म्हणजे इंग्रजांचें बडोदें दरबारांतील वजन ही होय. इंग्रजांचें प्रस्थ कमी झाल्या-

शिवाय शास्त्री नामशेष होणे शक्य नव्हतें व अशी स्थिति झाल्याशिवाय सीताराम रावजीच्या बोलण्यांत राम नव्हता. बरें शास्त्री रागावून माघारीं गेला तर इंग्रज बिथरेल व मग गायकवाडावरील आपला हक्क व पैसा या दोन्हींसही मुकण्याचा आपणांवर प्रसंग येईल, असें त्रांगडें होतें; तेव्हां या गंडांतरांतून सुटण्याकरितां बाजीराव व त्रिंबकजी या दोघांनीं निराळाच घाट घातला.

आजपर्यंत शास्त्र्याशीं त्यांची वागणूक अत्यंत तुसडेपणाची होती ती सोडून त्यांनीं त्याच्याशीं प्रेमाची वागणूक सुरू केली व गायकवाडाकडील देण्याघेण्यासंबंधीं सामोपचाराची भाषा सुरू झाली. बाजीरावानें शास्त्र्यास असें सुचविलें कीं, गुजराथेंत सात लाखांचा मुलूख गायकवाडानें आम्हांस तोडून द्यावा म्हणजे गायकवाडाचें सर्व देणें आम्ही त्यास सोडून देतों. बाजीरावाचें हें म्हणणें शास्त्र्यास पसंत पडलें. वास्तविक पाहतां या योजनेंत दोन्ही पक्षांचा फायदा होता. गायकवाडास आज एवढी मोठी रक्कम देण्याचें टळत होतें व पेशव्यांच्या ताबेदारींतून त्याची कायमची मुक्तता होत होती. तसेंच पेशव्यांची राज्य वाढविण्याची इच्छा सिद्धीस जात होती. अशा तऱ्हेनें हिशेबाचा घोळ कांहीं तरी पर्यायानें मिटणार अशी आशा दिसतांच उभयपक्षांतील प्रेम वाढीस लागलें. एक ठिकाणीं बैठकी व भेटकुटें होऊं लागलीं. शास्त्री आणि बाजीराव यांच्यामधील हीं खलबतें सन १८१५ चा मार्च आणि एप्रिल अशी तब्बल दोन महिने चालू होतीं. या दोन महिन्यांत त्रिंबकजी व बाजीराव यांनीं शास्त्र्यावर आपल्या वागणुकीची मोहिनी टाकून त्यास जवळ जवळ आत्मसात् केलें. शास्त्रीहि एकंदर पेशव्यांच्या वागणुकीवर खूष झाला. कारण बाजीराव व त्रिंबकजी यांनीं त्याच्याभोंवतीं टाकलेले गळहि पण तसेच सामर्थ्यवान होते. "आतां बडोद्यास कशास जातां, येथेंच राहा व आमचा कारभार पाहा. माणकेश्वराच्यानें तें काम नीट रेटत नाहीं. आम्हांस तुमच्यासारखा बाका मुत्सद्दी लाभेल तर मराठी राज्याची विसकटलेली घडी आम्ही नीट बसवूं."

त्रिंबकजी व बाजीराव यांच्या असल्या गोड भाषणांनीं शास्त्र्याच्या अंतःकरणाचा ठाव घेतला. बडोद्याचा दिवाण होण्याची शास्त्र्याची सामान्य महत्त्वाकांक्षा; पण त्यास खुद्द पेशव्यांचें दिवाणपद घरीं चालून आलें त्यामुळें तो बेहद्द खूष झाला. शास्त्री पुण्यास मोठ्या थाटानें राहात असे. तो

पहिल्यांदा एल्फिन्स्टनच्या भेटीला गेला त्या वेळच्या त्याच्या दिमाखावरून शास्त्र्याच्या थाटाची आणि डामडौलाची कल्पना येते. शास्त्री आला तो चिंचवडास उतरला आणि तेथून त्याची स्वारी एल्फिन्स्टन्च्या भेटीस निघाली. त्या वेळच्या त्याच्या स्वारीचा थाट म्हणजे गायकवाडाच्या वकिलास शोभण्यासारखा. गायकवाडाचे शें-दोनशें स्वार पुढेंमागें चालत आहेत, मध्यें एक अंबारीचा हत्ती झुलत आहे, तर त्याच्या पुढें दुसरा नुसताच डुलत चाललेला अशा थाटानें चाललेली ही वकिलाची स्वारी रेसिडेन्टाच्या बंगल्यावर येऊन, नंतर या वकिलाची व रेसिडेन्टाची भेट मोठ्या थाटानें झाली. त्यानें आपल्या मुलाची मुंज ता. १९-४-१८१५ रोजीं पुण्यांत मोठ्या थाटानें केली. मुंजीस खुद्द पेशव्यांची स्वारी आली होती. मुंजीचा थाट मोठाच झाला. शास्त्र्यानें ब्राह्मणांस शालजोड्या देऊन त्यांचा मोठा सन्मान केला. यानंतर गंगाधरशास्त्र्यास पेशव्यांचा व्याही होण्याचा सुप्रसंग आला. बाजीरावाची मेहुणी ( बायकोची बहीण ) लग्नाची होती ती शास्त्र्याच्या मुलास देण्याचें घाटूं लागलें. ही सर्व बोलाचाल त्रिंबकजीमार्फत चाले. त्यामुळें शास्त्री व त्रिंबकजी यांचा स्नेह चांगलाच जमला. पुढें शास्त्र्यासमवेत ठिकठिकाणच्या यात्रा करण्याचें ठरलें व लगेच नाशीक, त्र्यंबक येथें जाण्याचा बेत ठरून स्वाऱ्या निघाल्या. बाजीरावानें लग्न नाशकास करण्याचें ठरवून त्या बेतानें सामान, माणसें व कुटुंब बरोबर घेतलें. शास्त्री कोणत्या मुहूर्तावर पुण्यास आला देव जाणे पण आतां त्याचें भाग्य शिगेला पोंचलें. प्रथम स्नेही, नंतर दिवाण व नंतर व्याही अशा एकापेक्षां एक सरस अशा परम भाग्याच्या पायऱ्या त्याचें दैव चढलें; पण आतां मात्र त्याच्या भाग्यश्रीस दृष्ट लागली, ती भंगली व कोलमडून खालीं पडण्याच्या पंथास लागली.

लग्नांत विघ्न निर्माण झालें तें असें. शास्त्र्यानें सात लाखांचा मुलूख पेशव्यांस तोडून देऊन कर्जांतून मुक्त होण्याबद्दल बडोदे दरबारची मंजुरी मागितली होती, त्याचें उत्तर फत्तेसिंगाकडून नकारात्मक आलें आणि या एका गोष्टीनें पुढील सर्व गोंधळ माजविला व त्यांत बिचाऱ्या शास्त्र्याचा अंत झाला. असें हें कथानक सुखान्त दिसतां दिसतां त्यास भलतेंच वळण लागून त्याचें पर्यवसान दुःखान्त झालें.

एखादें सुंदर चित्र पूर्णपणें तयार होण्याच्या बेतांत असावें, तों त्यावर एखादा सुरा फेकला जाऊन तें टरूकन फाटलें जावें. कळस चढविण्याच्या

मंगल प्रसंगीं दुर्दैवानें मंदिराचा सभामंडप कोसळून पडावा, तशांतलाच प्रकार प्रस्तुत वेळीं झाला. शास्त्र्यानें सुचविलेली तडजोड फत्तेसिंगानें फेटाळली, त्याबरोबर शास्त्री घाबरला. त्यास काय करावें हेंच सुचेना. बाजीरावास ही गोष्ट ताबडतोब सांगण्याचा त्यास धीर होईना आणि खरो-खरीच त्याच्या परिस्थितीचा विचार करितां तें कठीणहि होतें. ज्या एका गोष्टीवर पेशव्यांच्या दरबारीं शास्त्र्याची चहा चालू होती त्याच गोष्टीवर कुऱ्हाड बसली. त्याबरोबर शास्त्र्याची बैठक ढळली व ती त्यास सावरता येईना व काय करावें तें सुचेना. बाजीरावाच्या कचाट्यांतून आपली कशी सुटका होईल या एकाच गोष्टीचा तो आतां विचार करूं लागला. मुलाचें लग्न आतां नको, पुढें पाहूं असें शास्त्र्यानें बाजीरावास कळाविलें. तेव्हां आतां इतक्या नांवारूपास आलेलें हें लग्न मोडण्याचें त्रिंबकजीच्या जिवावर आलें. कारण या लग्नानें फार पुढचा पल्ला गांठला होता. लग्नाची मोठी तयारी झाली होती, जिकडे तिकडे थाट उडाला होता व मंडळी जमा झाली होती. तेव्हां अशा स्थितींत लग्न मोडणें मोठें कठीण झालें होतें, त्याचे पदरीं मोठी नामुष्की येत होती. मराठी साम्राज्याच्या मालकाचा हा मोठा अपमान होत होता व याचा सूड आपण पुरेपूर घेतला पाहिजे असे विचार त्रिंबकजीचे मनांत येऊं लागले. या भरींत भर म्हणून बाजीरावाची आणखी एक आगळीक शास्त्र्याकडून झाली, ती म्हणजे बाजीरावाच्या बायकोनें शास्त्र्याच्या बायकोस भेटीस बोलाविलें, पण बाजीरावाचा या बाबतींतील लौकिक जाणून शास्त्र्यानें आपल्या बायकोस वाड्यांत धाडण्याचें नाकारलें. या वर्तना-नें आपला अत्यंत अपमान झाला असें बाजीरावाच्या मनानें घेतलें आणि शास्त्र्याचे ग्रह फिरले.

आम्ही इतकें नमतें घेत असतां व लांगूलचालन करीत असतां शास्त्री उद्धटासारखा वागतो, त्याला आमची कांहींच पर्वा नाहीं, तेव्हां त्यास या गोष्टीबद्दल चांगला धडा शिकविला पाहिजे असें उभयतांच्या मनानें घेतलें. ही धनीचाकराची जोडी एकमेकांस अगदीं योग्य व अनुरूप अशीच होती. बाजीराव वहिमी व भित्रा, तर त्रिंबकजी काळीज नसणारा कर्दनकाळ. तेव्हां उभयतांची वक्रदृष्टि शास्त्र्याकडे वळली व त्यास लंबे करण्याचा बेत झाला. आतां शास्त्र्याच्या मनांत आपणांबद्दल कांहींएक किंतु राहूं नये म्हणून त्रिंबकजीनें जास्तच लघळ-

पणा चालवला. नाशिकच्या यात्रेला स्वारी चालली असतां त्रिंबकजीनें शास्त्र्यास असें सांगितलें कीं, तुमचा आमचा स्नेह जमला नसता तर तुमचा कांटा काढावा असासुद्धां आमचा विचार झाला होता. ही बातमी शास्त्र्यानें एल्‌फिन्स्टनला सांगितली. त्याबरोबर तुम्ही असल्या घातक माणसावर विश्वासून राहणें गैर आहे असें तो म्हणाला. या वेळीं शास्त्री आणि पेशवे यांच्यामधील स्नेहभाव इतक्या थराला पोंचला होता कीं, अशी वेडीवांकडी शंका घेणें शास्त्र्याच्या बुद्धीच्या बाहेरचें होतें. किंबहुना शास्त्र्याचें म्हणणें फत्तेसिंगाकडून फेटाळलें गेलें नसतें तर उभयतांच्या स्नेहास उत्तम फळेंहि आलीं असतीं.

आतां वातावरण सर्वच बाजूंनीं बिथरल्यामुळें लग्न राहिलें, नाशिकची यात्रा संपली व आषाढ आला. तेव्हां आषाढी एकादशी-निमित्त सर्वांसह पुन्हा पंढरपुरच्या यात्रेस जाण्याचा बेत बाजीरावानें केला. या यात्रेस मोठ्या लवाजम्यानिशीं न जातां थोडेच लोक घेऊन जावें असें बाजीरावानें ठरविलें. शास्त्र्याच्याबरोबर त्याचा मदतनीस बापू मैराळ म्हणून होता त्यानें पंढरपूरच्या यात्रेस येऊं नये असें त्रिंबकजीनें सुचविलें. बापू मैराळ हा मोठा धूर्त व चाणाक्ष होता. अंतस्थ बातम्या काढण्यांत त्याचा हातखंडा होता. तो बरोबर असल्यास शास्त्र्यास जागा करील म्हणून त्यास बरोबर घेतलें नाहीं. पेशव्यांनीं मैराळाला पुष्कळ बरोबर घेतलें नाहीं पण तो राहिला कसा व आपल्या जिवास धोका आहे ही कल्पना शास्त्र्यास असतां त्यानें त्यास राहूं दिलें कसें याचा मोठा अचंबा वाटतो. खुद्द एल्‌-फिन्स्टनसुद्धां आपल्याबरोबर नसावा असें वाटल्यावरून बाजीरावानें त्यास सुचविलें कीं, आम्ही थोडेच लोक घेऊन पंढरपुरास जात आहों दर्शन घेऊन लगेच माघारीं येऊं, तरी आपण येण्याची तसदी घेऊं नये. बाजीरावाची ही सूचना एल्‌फिन्स्टनला पटली व त्यानें त्या अवधींत वेरूळचीं लेणीं पाहून येण्याचें ठरविलें. अशा तऱ्हेची व्यवस्था होऊन बाजीरावसाहेबांची स्वारी ज्येष्ठ वद्यांत नाशकाहून पंढरपुरास जाण्यास निघाली.

पंढरपुरचा मार्ग आक्रमीत असतां बाजीरावानें अशी कंडी पिकंविली, कीं नागपुराहून कांहीं मारेकरी आपला जीव घेण्याकरितां आले आहेत. तसेंच हैदराबादेहून कांहीं पठाण त्याच उद्देशानें निघाले आहेत. या हुलीमुळें रस्त्यांत बाजीरावाच्या संरक्षणार्थ मोठा कडक बंदोबस्त ठेवण्यांत आला.

बाजीराव कोणासहि भेटेना. जवळ हत्यारबंद पहारेकरी नेहमीं सज्ज राहूं लागले. पंढरपुरास पोंचल्यानंतर हा बंदोबस्त जास्तच कडक राहूं लागला. गोविंदराव बंधुजी याच्याशीं बाजीरावाचें सूत जमून तो त्रिंबकजीच्या माणसाबरोबर पंढरपुरास दाखल झाला. ही बातमी शास्त्र्यास कळतांच त्यानें त्याबद्दल त्रिंबकजीकडे तक्रार केली. त्रिंबकजीनें शास्त्र्यास या बाबतींत व्यवस्थित तऱ्हेनें सांगून त्याच्या मनांतील किंतु नाहींसा केला. आषाढ शुद्ध अष्टमीच्या दिवशीं पेशव्यास मेजवानीचा बेत झाला, त्या प्रसंगीं शास्त्री भोजनास गेला होता. त्या वेळीं कमीजास्ती खाणें होऊन शास्त्र्याची प्रकृति बिघडली. पुढें कांहीं दिवस त्यास बिलकुल चैन पडेना. शास्त्र्यानें बाजीरावास कळविलें कीं, माझी प्रकृति बरीच खालावली असून बाहेर येण्याची ताकद माझ्यांत उरली नाहीं. 'आतां शास्त्री बडोद्यास येत नाहीं' अशा अर्थाचें पत्र गोविंद रावानें राणी तख्ताबाईस लिहिलेलें शास्त्र्यास मिळालें. म्हणून तोहि बंदोबस्तानें राहूं लागला. घरीं कोणी भेटावयास आल्यास त्यास भेटूं नये असें त्यानें ठरविलें. ता. १७ जुलै १८१५ रोजीं आषाढी एकादशी होऊन गेली व पुढें दोनतीन दिवसांनीं म्हणजे ता. २० जुलै १८१५ रोजीं अस्तमानीं लक्ष्मणपंत नांवाचा एक मनुष्य त्रिंबकजीकडून शास्त्र्याकडे आला व म्हणूं लागला कीं, 'उदईक पेशव्यांची स्वारी माघारीं परतणार व आतां दाटी नाहीं तरी आपण आज या वेळीं दर्शन करून परत जावें.' 'आज मला चालण्याची ताकद नाहीं.' असा निरोप शास्त्र्यानें त्रिंबकजीस धाडला. तरी सुद्धां पुन्हां तोच निरोप शास्त्र्याकडे आला, तेव्हां शास्त्र्यानें रावजी मराठे नांवाचा आपला एक इसम त्याकडे धाडला व शास्त्र्यास चालवत नाहीं, असें त्यानें त्यास सांगितलें. तरी सुद्धां त्रिंबकजीनें आपला हट्ट सोडला नाहीं. 'आज दर्शनाची सोय चांगली आहे' आपण एकवार येऊन जा' असा निरोप मराठ्यामार्फत त्रिंबकजीचा आला; तेव्हां मात्र वारंवार नाहीं म्हणणें बरें नव्हे, त्यांत हटवादीपणा दिसतो; व असें केल्यास त्रिंबकजीस वैषम्य वाटेल आणि हें गाडें जास्तच बिथरेल म्हणून जवळ सात बिनहत्यारी माणसें घेऊन शास्त्री देवदर्शनास निघाला. वाटेनें जात असतां 'बोळांत शास्त्री कोणता ?' म्हणून कोणीं विचारलें, तेव्हां हे गळ्यांत कंठा असणारे शास्त्री म्हणून एकानें दाखविलें. याकडे कोणी लक्ष दिलें

नाहीं, मंडळी तशीच देवळांत गेली. दर्शन झालें. नंतर शास्त्रीबुवा त्रिंबकजी तात्याजवळ क्षणभर बसून बिऱ्हाडाकडे निघाले. शास्त्रीबुवा पुढें होते व त्यांचा हात रामचंद्र बडदे यांनीं धरला होता. इतक्यांत देवळांत शास्त्र्यास त्याचा वृद्ध उपाध्याय भेटला. त्याच्यापाशीं आपले तीन लोक प्रसादासाठीं ठेवून बाकीच्या चार इसमांसह शास्त्री निघाला. बोळांतून वाट दाखविण्यास त्रिंबकजीचे शिपाई पुढें चालले होते. मंडळी भवानी-बावा यांचे जाग्यापासून सुमारें दहा पंधरा हात पुढें गेली असतील नसतील तों बोळांत गलबल झाली. कांहींजणांना तरवारीचा परज लागला, आणि एकदम पाठीमागून तीन इसम 'वाट द्या, वाट द्या' म्हणून मोठ्यानें ओरडत गर्दी मोडत धावत आले. एकानें शास्त्रीबोवास पाठीमागून तलवारीनें वार केला. आणि दुसऱ्या दोघांनीं पुढून येऊन त्यांचे तुकडे केले. त्याबरोबर शास्त्रीबोवाचे मशालजी मशाली टाकून पळाले. शास्त्र्यांनीं बरोबर घेतलेल्या चार इसमांस थोड्याबहुत जखमा झाल्या होत्या, पण त्यांनींसुद्धां पोबारा केला. इतक्यांत वृद्ध उपाध्याय व बाकीचे तीन इसम त्याच वाटेनें आले आणि चुडी घेऊन न्याहाळतात तों शास्त्र्याची खांडोळीं त्यांच्या नजरेस पडलीं आणि हातांत नागव्या समशेरी घेऊन देवळाकडे धावत येणारे पांच इसम दिसले. घडल्या प्रकारावरून हा खून त्रिंबकजीनें स्वतःच्या खास देखरेखीखालीं करविला अशी सर्वांची खात्री झाली.

कांहीं मंडळी व सरकारचे शिपाई शास्त्र्याचें प्रेत घेऊन नाकेबंदींतून आणि चौक्यांतून नदीवर गेली. पुंडलिकाचे उजवे बाजूस दहनविधि करून उजाडतांना माघारीं आली. अशा तऱ्हेनें शास्त्र्याचा ग्रंथ आटोपला.

या भयंकर प्रकाराची चौकशी होऊन खुनी कोण त्याचा तपास जारीनें करून अपराध्यास या घोर कृत्याबद्दल शासन करा असें शास्त्र्याच्या मंडळींनीं त्रिंबकजीस सांगितलें. त्यावर तो म्हणाला—

"शास्त्र्याची गत अशी झाली, होऊं नये गोष्ट होऊन गेली ! तरी पुढील चौकशी जारीनें करून अपराध्यास या घोर कृत्याबद्दल शासन व्हावें. आपण व बाजीरावमहाराज झाल्या प्रकाराबद्दल फार दिलगीर आहोंत. कालचा महापूजेचा बेत होता तो रहित झाला असें सांगितलें. शास्त्र्याचा आमचा स्नेह जिव्हाळ्याचा, त्याच्या संरक्षणाची खबरदारी आम्हीं घेतली, पण आकाशाच्या कुऱ्हाडीस काय करावें, शिवाय शास्त्री-

बोवास पाण्यांत पाहणारे लोक फार! कोणाचा म्हणून वहीम घ्यावा? सीताराम रावजी कैदेंत आहे तो तर शास्त्री दुनियेपार केव्हां होईल याची वाटच पाहतो. दुसरा, इंग्रजांच्या कैदेंत दिवस ढकलणारा बंडखोर कान्होजी गायकवाड. तोहि शास्त्र्यावर समशेर उपसून आहे. तेव्हां हें कृत्य कोणाचें म्हणून सांगावे? दगेकरी कर्नाटकी होते म्हणून शास्त्र्याची मंडळी म्हणूं लागली. तेव्हां मारेकऱ्यांनीं भाषा कर्नाटकी वापरली म्हणून ते कानडी असावेत असा भास झाला, पण शास्त्रीबुवास मारून जाते समयीं ' पुरे झालें हीं अक्षरें मराठी भाषेनें बोलले. मग कर्नाटकी असोन मराठी बोलले, कीं मराठी असोन कर्नाटकी वेष न कळे! ''

दुसऱ्यां दिवशीं शास्त्र्याची मंडळी पुण्यास आली, तेव्हां त्यास बाजीराव व त्रिंबकजी यांचा निरोप पोंचला कीं, तुम्ही आतां आमचे भेटीस येऊं नये. यानंतर बाजीराव व त्रिंबकजी हे उभयतां मोठ्या कडक बंदोबस्तानें राहूं लागले. हें प्रकरण आपल्यावर शेकतें कीं काय अशी त्यांस सारखी धास्ती वाटत होती. या खुनाचा तपास करावयाचा. अपराध्यास शासन करावयाचें. अशांतला प्रकार त्यांनीं कांहीं एक केला नाहीं. उलट या खुनाचा कोणी उच्चार सुद्धां करूं नये, कोणी केल्यास त्यांचीं नांवें त्रिंबकजीस कळवावीं म्हणून हेरांचें जाळें विणण्यांत आलें. गोविंद बंधुजी व भगवंतराव पुण्यांत निर्भयपणें वावरूं लागले. अशा तऱ्हेनें जुलै महिना संपला. खुनानंतरचे दहापंधरा दिवस असेच गेले.

---

## ५ : : जबरदस्ताचा न्याय

पंढरपुरांत शास्त्र्याचा खून झाला. 'शास्त्री कोणता ?' म्हणून विचारतां 'गळयांत कंठा आहे तो' तसेंच 'पुरे झालें' म्हणून उच्चारले गेलेले शब्द, कानड्यानें मराठी उच्चारले का मराठ्यानें कानडीची नक्कल केली का घाबरून कंपितपणें उच्चारले गेले याचा झालेला गोंधळ शास्त्र्याची झालेली खांडोळीं, मशालीच्या प्रकाशांत शास्त्र्याच्या आश्रितांनीं पाहिली. शास्त्र्याचे दहन झालें. एवढा मोठा शास्त्री पण त्याची राजकारणाच्या कचाट्यांत तीन चिमटी राख झाली. ही बातमी आगीसारखी सर्व देशभर पसरली. ज्याच्या त्याच्या तोंडीं एकच विषय झाला. गायकवाडाचा वकील पंढरपुरीं मारला गेला असें जो तो म्हणूं लागला. पुढें काय होतें याच्याबद्दल जो तो अत्यंत उत्सुकतेनें विचार करूं लागला. या खुनामुळें गायकवाड दरबारीं काय गोंधळ होतो. पेशव्यांच्यावर हें प्रकरण कितपत व कसें शेकतें आणि कंपनी-सरकार काय धोरण आंखतें असा हा तीन पदरी तिढा होता. त्यांतून बऱ्याच भानगडी निर्माण होणाऱ्या होत्या.

शास्त्र्याच्या खुनाची बातमी एल्फिन्स्टनला वेरुळास कळली. त्याबरोबर त्याच्या मनास आनंद झाला का धक्का बसला हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. पण आपलें राजकारण तडीस गेलें किंवा जाण्याच्या मार्गास लागलें म्हणून त्याच्या मनास आनंदच होण्याचा संभव फार. कारण शास्त्र्याच्या

बाबतींत त्यानें माहीत असून सहेतुक टाळाटाळ केली होती. नाशिकच्या यात्रेस जातांना " आमचें व पेशव्यांचें हिशेबाच्या बाबतींत न जमतें तर डेंगळा माझा खून करणार होता " असें शास्त्र्यानें एल्फिन्स्टनला सांगितलें, त्या वेळेपासून व त्याच्या आधींपासून शास्त्र्याचें महत्त्व त्याच्याभोंवतीं खेळणारें राजकारण आणि गायकवाड व पेशवे यांच्या दरबारांत प्रमुखपणें वावरणारी उच्छृंखल मंडळी पाहिली, म्हणजे शास्त्र्याच्यासंबंधीं ही बातमी म्हणजे स्वप्नांतहि न होणारी गोष्ट झाली असें एल्फिन्स्टनला वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण ही बातमी कळतांच एलफिन्स्टननें मात्र फारच कडक धोरण आंखलें व या बाबतींत आपणावर कोणतीच जबाबदारी नाहीं; फक्त अपराध्यास कडक शासन करणें हेंच काय तें आपण करावयाचें अशा बाण्यानें तो शेवटपर्यंत वागला. खुनाची बातमी कळतांच त्यानें बाजीरावास वेरुळाहून एक पत्र धाडलें कीं, 'गुन्हेगारांचा तपास करून त्यांस ताबडतोब शिक्षा करा.' तसेंच गव्हर्नर जनरलकडेहि सर्व हकीगत इत्थंभूत कळवून पुढील कामकाजासाठीं जादा अधिकार त्यानें मागविला व आपण वेरुळाहून निघून ता. ६ ऑगस्ट रोजीं पुण्यास पोंचला. वाटेंत पंढरपुराहून निघालेली मंडळी त्यास भेटली. त्यांच्याजवळ खुनासंबंधीं चौकशी करतां त्यांनीं त्रिंबकजीचें नांव घेतलें व जास्त तपासाअन्तीं त्रिंबकजीचें नांव जास्त जास्तच त्याच्या नजरेस आलें. ह्या खुनाची बातमी हां हां म्हणतां सर्व हिंदुस्थानभर पसरली व कांहीं दिवस सर्वांच्या चर्चेचा हा एक विषय झाला. या प्रकरणीं, एल्फिन्स्टननें, बाजीराव व नेहमीं चढ्या आवाजानें बोलणारा त्रिंबकजी, हे दोघे कचाट्यांत सापडतांच त्यांच्यावर चांगलीच शिस्त धरली.

ता. ६ ऑगस्टला एल्फिन्स्टन पुण्यास आला व त्रिंबकजी ता. ७ ऑगस्टला आला. त्यानें या खुनाच्या प्रकरणीं कांहीं तपास करावा, तें कांहीं एक न करतां कालक्रमणा करण्यास सुरुवात केली. गोविंदराव बंधुजी व भगवानराव उजळ माथ्यानें वावरूं लागले. नागपंचमीला म्हणजे ९ ऑगस्टला बाजीराव पुण्यास आला तो अगदीं गुपचुप, बुरख्याच्या पालखींतून, नेहमींप्रमाणें सलामी किंवा कांहीं एक थाट झाला नाहीं. श्रावणांतील दक्षिणेस मोठ्या थाटानें व दिमाखानें प्रारंभ व्हावयाचा त्यांतील कोणताच प्रकार न होतां एकदम सामसूम व उदास झालें. बाजीराव व त्रिंबकजी या खुनामुळें अंतर्यामीं फार घाबरले व या प्रकरणाचा शेवट काय होणार याची

त्यांची त्यांनाच कल्पना येईना. भयंकर गोष्ट होऊन गेली आतां काय करावें याच्या त्यांस उमज पडेना. रेसिडेन्ट कांहींतरी जबरदस्त प्रकार करणार अशी त्यांची खात्री होऊन चुकली व त्यांतून बचाव करण्यासाठीं म्हणून त्यांनीं फौजा जमविण्यास सुरुवात केली. एल्फिन्स्टननें जालन्याची तैनाती फौज घोडनदीस आणून ठेविली. अशा तऱ्हेनें फौजांची हालचाल झाली पुण्यांतील लोक हवालदिल झाले. बडोद्याच्या लोकांशीं कोणीहि कांहींहि संबंध ठेवीना कीं नीटपणें बोलेना. बाजीराव व त्रिंबकजी यांचा संबंध खुनाशीं येईल असें सर्व कांहीं नाहींसें करण्याच्या खटपटी सुरू झाल्या. हें एल्फिन्स्टनला कळतांच ता. ११ ऑगस्ट रोजीं एल्फिन्स्टननें बाजीरावास ताबडतोब आजच्या आज भेट पाहिजे म्हणून खलिता धाडिला. ' आज आमची प्रकृति बरी नसल्यानें भेट होणार नाहीं. ' लगेच दुसऱ्या दिवशीं पुन्हां ताबडतोब भेट पाहिजे म्हणून एल्फिन्स्टननें निरोप धाडिला. यावर ' आजच जन्मलेली आमची मुलगी वारली. तीन दिवस अशौच आहे. सबब भेट होणार नाहीं' म्हणून जबाब धाडला. त्यावर एल्फिन्स्टननें एक खलिता लिहून तो सदाशिव माणकेश्वराजवळ दिला व त्यास तो बाजीरावास देण्यासाठीं लिहिलें. त्यास, माझ्याच्यानें खलिता देणें होणार नाहीं, असें माणकेश्वरानें कळविलें. तेव्हां एल्फिन्स्टननें तो खलिता आपल्या मुनशीबरोबर देऊन त्यास बाजीरावाकडे पाठविलें. मुनशीचीसुद्धां बाजीरावानें भेट घेतली नाहीं. मात्र त्यानें एक पर्याय केला तो असा कीं, आपलीं दोन माणसें पत्रांत काय मजकूर आहे तो समजावून घेण्याकरितां रेसिडेन्सींत पाठविलीं. त्या मंडळीस साहेबानें असें सांगितलें कीं, ' या गुन्ह्याच्या प्रकरणीं खुद्द पेशव्यांच्यासंबंधीं आमचें कांहींएक म्हणणें नाहीं. अपराधी त्रिंबकजी आहे त्यास आमचे स्वाधीन करा म्हणजे झालें; पण त्याला वांचविण्याचा प्रयत्न जर पेशवे करतील तर मात्र त्यांवर जबाबदारी येईल." असा पत्रांतील मजकूर आगाऊ कळल्यानंतर बाजीरावानें तें पत्र ता. १५ ऑगस्टला स्वीकारलें. त्या पत्रांत मजकूर खालीलप्रमाणें होताः—

"तुम्ही स्वतः ब्राह्मण आहां तेव्हां ब्राह्मणी राज्यांत ब्राह्मणाचा खून होणें तुम्हांस सुद्धां प्रशस्त वाटणार नाहीं. खरा गोंधळ काय झाला व काय होत आहे याची तुम्हांस कल्पना नसावी. तेव्हां खरा प्रकार काय आहे तो तुमच्या

कानांवर घालणें भाग आहे. खुनाची मुख्य जबाबदारी त्रिंबकजीवर येते, याविषयीं आम्हांस काडीइतकीहि शंका नाहीं. सर्व जग या प्रकारासंबंधीं असेंच बोलत आहे. खुनास इतके दिवस झाले असतां यासंबंधीं तुम्ही किंवा त्रिंबकजी कोणत्याहि प्रकारचा तपास करीत नाहीं, वहिमी माणसास पकडीत नाहीं. तपास करण्याविषयीं आम्ही आग्रह धरीत असतां त्रिंबकजी त्याकडे बिलकुल लक्ष देत नाहीं. त्रिंबकजीविरुद्ध भरपूर पुरावा आहे. तोच या खुनाचा प्रेरक, तेव्हां त्यास गोविंदराव बंधुजी व भगवंतराव या तिघांस पकडून एकदम कडेकोट बंदोबस्तांत ठेवा. या गृहस्थांच्यासंबंधीं तुमची जरी खात्री नसली तरी त्यांस पकडण्यास भरपूर इतका पुरावा आहे. त्याचा पुढें काय निकाल द्यावयाचा तो गव्हर्नर ज. व तुम्ही मिळून देणें तो द्यावा; पण या लोकांस अटक करण्यांत एक क्षणाचाहि विलंब करूं नये एवढेंच काय तें माझें म्हणणें आहे. परराष्ट्राचा वकील तुमच्या डोळ्यांदेखत मारला गेल्यानें तुमची बाहेर बेअब्रू झाली ती धुऊन काढण्यासाठीं म्हणून तुम्हांस या गोष्टी करणें भाग आहे. नाहींतर या एकट्या त्रिंबकजीमुळें तुमचें राज्य गोत्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. कारण असल्या भयंकर माणसाच्या हातांत फौज व सर्वाधिकार आहेत. निजाम, गायकवाड व इंग्रज यांच्या सरहद्दींस तुमची सरहद्द भिडलेली असल्यानें त्या सर्वांस नुकसान पोंचण्याचा संभव आहे. त्रिंबकजी जे कांहीं अत्याचार करील त्या सर्वांची जबाबदारी तुमच्यावर पोंचल्याशिवाय राहणार नाहीं म्हणून मी तुम्हांस वेळेवर सावध करीत आहे. यापुढें परराष्ट्राचे कोणीहि वकील तुम्हांकडे येण्यास धजणार नाहींत. त्या योगें कंपनी सरकारशीं तुमचा संबंध तुटेल. हे सर्व परिणाम लक्षांत घेऊन तुम्हांस काय करणें तें करा व काय करतां तें ताबडतोब कळवा. त्रिंबकजीच्या जागीं दुसऱ्या कोणास नेमावयाचें त्याचा विचार तुमचा तुम्ही पाहा. तुमच्या अंतर्व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्याची आमची बिलकुल इच्छा नाहीं."

या खलित्यानें बाजीराव अगदीं गोंधळून गेला. त्यास काय करावें तें सुचेना. तुम्ही आम्ही समक्ष भेटून कांहींतरी निकाल करूं असा मोघम निरोप त्यानें या खलित्याला धाडिला व भेटीचा दिवस नेमला, तोहि जरा दूरचा. त्यावर एल्फिन्स्टननें भेट ताबडतोब घ्यावयाची असेल तर घ्या आणि भेटीच्या वेळीं त्रिंबकजी असतां कामा नये असें कळविलें. यावर सदाशिव माणकेश्वराबरोबर बाजीरावानें कळविलें कीं, " आमच्या मतें खुनाशीं

त्रिंबकजीचा कांहींएक संबंध नाहीं, केवळ तुमच्या मोहबतीखातर आम्ही त्यास बंदींत ठेवण्यास तयार आहोंत." ही गोष्ट एल्फिन्स्टनला मान्य झाली, पण ही गोष्ट करण्याची बाजीराव पुन्हा टाळाटाळ करूं लागला. त्रिंबकजीनें तरी स्वस्थ बसावें कीं नाहीं; पण त्यानें तसें न करतां बापू भैराळ व इतर बडोदेकर माणसांचा छळ चालविला. त्यांस पुण्यास राहणें धोक्याचें वाटूं लागलें. तेव्हां ते इंग्रज हद्दींत रेसिडेन्टाच्या आश्रयास जाऊन राहिले. त्यांची बरीच मंडळी त्रिंबकजीनें फितुर केली. बापु भैराळ रेसिडेन्सींत जाऊं लागला; त्याबरोबर त्रिंबकजीस फितुर झालेल्या लोकांनीं त्याला पगारासाठीं अडवून धरलें. तेव्हां लगेच एल्फिन्स्टननें सव्वा लाख रुपये भरून त्याची सुटका केली. त्रिंबकजीनें मोठ्या फौजा जमा केल्या, तेव्हां एल्फिन्स्टननें बाजीरावास कळविलें कीं, तुम्ही फौजा पुण्यांतून काढून न्या नाहींतर आम्हांस घोडनदीची फौज येथें आणावी लागेल आणि त्याचा परिणाम भयंकर होईल. तेव्हां बाजीरावानें त्यांस कळविलें कीं, इंग्रजांशीं वैर करण्याची आमची इच्छा नाहीं; पण त्रिंबकजीस हस्तगत करावयाचा तो दमादमानेंच केला पाहिजे, कारण तो सामान्य सरदार नाहीं. त्याच्याजवळ दहा हजार स्वार व पांच हजार पायदळ इतकी मोठी फौज सज्ज आहे. याशिवाय ५०–६० किल्ले आहेत. अशा इसमास पकडणें ही गोष्ट सोपी नाहीं. शिवाय त्याच्या अंगीं गुन्हा लागू केल्याशिवाय कायद्यानें त्यास पकडतां येत नाहीं. कारण ज्या इसमांनीं खून केला त्यांचा व त्रिंबकजीचा काडी-इतकाहि संबंध नाही. तेव्हां या बाबतींत घिसाडघाई करूं नये असें आम्हांस वाटतें."

बाजीराव आणि एल्फिन्स्टन यांच्यामध्यें ही पत्रापत्री व निरोपानिरोपी चालली होती, त्या अवधींत त्रिंबकजी स्वस्थ नव्हता. त्याच्या भानगडी चालू होत्या. एल्फिन्स्टननें त्याच्याविरुद्ध पुरावा गोळा केला होता तो नाहींसा करण्यांत तो गुंतला होता आणि बाजीरावाचीहि त्याला फूस होती. त्रिंबक-जीस कोठें तरी बाहेर धाडावें, त्यानें तेथें बंड उभारावें, त्यास पेशव्यांनीं गुप्तपणें साह्य करावें व इंग्रजांचा समाचार घ्यावा असे बेत चालू होते. या बनावास तोंड देतां यावें म्हणून एल्फिन्स्टनचेहि उद्योग चालू होते. त्यानें हैदराबादची फौज जालन्यास बोलावली आणि त्रिंबकजी बाहेर सटकल्यास बंदोबस्त करील म्हणून त्याच्या पाठीवर जाण्यासाठीं कर्नल स्मिथची नेमणूक

केली. याशिवाय बाजीरावाच्याहि क्लृप्त्या चालू होत्याच. याखालीं ऑगस्ट गेला. म्हणजे खुनापासून महिना दीड महिना नुसता नमनावारी गेला. १ सप्टेंबरला गव्हर्नर जनरलचा रेसिडेन्टास हुकूम आला त्यांत त्यानें बाजीरावासंबंधीं आंखलेल्या धोरणास पूर्ण संमति दिली व त्याबरोबर बाजीरावास असें पत्र आलें कीं, "त्रिंबकजीस अटक करून चौकशीअंतीं त्याच्यावर जरी गुन्हा शाबीत झाला तरी त्यास फांसावर न चढवितां जन्मठेप कैद करण्यांत येईल; पण गुन्ह्याचा तपास झालाच पाहिजे आणि त्यासाठीं तुम्हीं तुमच्या हातीं असेल ती सर्व सत्ता उपयोगांत आणून आमच्या रेसिडेन्टास मदत केली पाहिजे. तुम्ही जर त्रिंबकजीचा बचाव कराल किंवा त्यास फरारी होण्यास संधि द्याल तर मात्र फार जड जाईल. हें प्रकरण येथेंच न थांबतां फार विकोपास जाईल." याशिवाय एल्फिन्स्टनला असा हुकूम आला कीं, यापुढें बाजीरावाशीं सर्व व्यवहार बंद ठेवून त्रिंबकजी पळून न जाईल असा कडेकोट बंदोबस्त ठेवा. ग. ज. चा असा हुकूम येतांच एल्फिन्स्टनला जोर चढला होता. इतका वेळ एल्फिन्स्टन त्रिंबकजीला अटक करा असें नुसतें म्हणत होता; पण ग. ज. नें त्यापुढें जाऊन डेंगळ्याचा ताबा मागितला. ग. ज. चा हा हुकूम व त्यासोबत आपलें पत्र बाजीरावास एल्फिन्स्टननें ता. ४ सप्टेंबरला धाडिलें तें पाहून बाजीरावाच्या मनाला काय करावें याचा निश्चय होईना. इंग्रजांशीं दोन हात करावे कीं काय करावें याचा निकाल लागेना. आपण व डेंगळा उभयतांनीं बाहेर जाऊन युद्ध करावें असा मनाचा निश्चय बाजीरावानें प्रथम केला पण त्यास बापू गोखल्यानें हरकत घेतली. ४ सप्टेंबरच्या पत्रांत एल्फिन्स्टननें बाजीरावास बजाविलें होतें कीं, 'डेंगळ्याचा ताबा न द्याल तर इंग्रज फौजा पुण्यास वेढा देतील. या धमकीमुळें बाजीरावास कांहीं तरी निर्णय देणें क्रमप्राप्त होतें; तेव्हां ता. ४ सप्टेंबरला आपले सर्व मित्र व मुत्सद्दीमंडळ जमा करून त्यानें बरीच भवति न भवति केली व दुसरे दिवशीं सकाळीं रेसिडेन्टास निरोप धाडला कीं, आम्ही त्रिंबकजीस अटक करतों आपण ताबा मागूं नये. यावर एल्फिन्स्टननें कळविलें कीं, प्रथम त्यास अटक करा मगच भाषा बोला. त्यावरून ता. ५ सप्टेंबर रोजीं डेंगळ्यांस अटक करून त्याची वसंतगडावर रवानगी केली !

डेंगळ्याची रवानगी वसंतगडास झाली, त्याबरोबर त्याच्या देण्याघेण्याच्या व्यवहारासंबंधीं बरीच घालमेल उडाली. त्यासंबंधींचा उल्लेख पुढील

आशयाचा आहे–' डेंगळयास अटक होण्याच्या आदल्या दिवशीं ' चवेचाळीस हजारएकशें पस्तीस होन घोड्यावर घालून निंबाजी जाधवानें ताथवड्यास नेलें ' ताथवड्याच्या ताब्यासंबंधीं बैद्रा झाला तेव्हां हा ऐवज फलटणास जानोजीराव नाईक निंबाळकराच्याकडे ठेवण्यांत आला. डेंगळा बंडखोर ठरतांच त्याचा ऐवज वसूल करण्याचें काम विंचूरकराकडे आलें. विंचूरकराचें धरणें फलटणीं गेलें. निंबाळकरानें विंचूरकराचे कारभाऱ्यास दरबारखर्च म्हणून तीन हजार रुपये दिले व आपल्या वाटेस न जाण्याबद्दल आणि चौकशी न करण्याबद्दल ठराव केला. या चौकशीच्या धांदलींत एका गृहस्थाकडे ( त्यांचें नांव नाहीं ) चार हजार रुपये रोख व अडीच हजारांचे दागिने सांपडले ते घेऊन विंचूरकरांचा कारकून उठून आला. या ऐवजांत आणखी दीड हजारांच्या दागिन्यांची भर पडली ती निंबाजी जाधवाच्या घरांतील अशा तऱ्हेनें डेंगळयाकडील ऐवज थोडाबहुत वसूल करण्यांत आला.

डेंगळयास टोपीकर इंग्रज मागूं लागले तेव्हां तो आळंदीस गेला होता. आळंदीहून माघारीं येतांच दुसऱ्या दिवशीं त्यानें हरी भगवंत व श्रीपति जामदार यांच्या साह्यानें सोनें, रुपें, रोकडा, व कपडा लांबविला. हो ना करतां करतां व बगल देतां देतां त्रिंबकजीची रवानगी शास्त्र्याच्या खुनामुळें वसंतगडावर झाली त्याच्या दुसऱ्या दिवशीं हरी भगवंतानें खंडू शिंदा व गंगाजी खाटीक यांस किल्ले ताथवडे येथें अटकेंत ठेविलें. हे दोन्ही इसम शास्त्र्याच्या पाळतीवर होते. त्यांच्याकडे शास्त्र्यासंबंधींची बातमी पोंचविण्याचें काम होतें. शास्त्र्याच्या खुनास वाचा या लोकांच्यामुळें फुटेल म्हणून त्यांस कैद केलें होतें, पण शेवटीं तसेंच झालें. कांहीं दिवसांनंतर या कैद्यांची रवानगी फलटण येथें झाली. तेथें त्यास जास्तच त्रास होऊं लागला. तेव्हां त्या जाचास व कटकटीस कंटाळून त्या लोकांनीं ' शास्त्र्याचा प्रत्यक्ष खून करण्याचें काम 'दाजिबा डफळा' यानें केलें असें सांगितलें, या दोन कैद्यांपैकीं गंगाजी खाटीक हा पुढें राबीणसाहेबाकडे नोकरीस होता. त्रिंबकजीकडून शास्त्र्याच्या मारेकऱ्याचें नांव जरी कळलें नव्हतें तरी तें अशा तऱ्हेनें बाहेर पडलें. गंगाजी खाटीक हा इंग्रजाचा नोकर होता.

ता. ६ रोजीं सकाळीं रेसिडेन्टास तसें केल्याचें कळविलें; पण हें प्रकरण येथें थांबलें नाहीं. रेसिडेन्टानें त्यास कळविलें कीं, डेंगळा पळून जाऊन कांहीं बंडावा जर करील त्याचा जाब तुम्हांस द्यावा लागेल व मग

भलताच गोंधळ होईल. तेव्हां तो प्रसंग टाळण्यासाठीं तुम्ही त्रिंबकजीस आमच्या ताब्यांत द्या म्हणजे सर्व बैदा मिटेल व तुमचे आमचे व्यवहार पूर्वीप्रमाणें सलोख्यानें चालू होतील. तसें न कराल तर ग. ज. कडून कांहीं कडक हुकूम आल्यास मला नाइलाजानें त्याची अमलबजावणी करावी लागेल. या गोष्टींचा नीट विचार करा व काय करणें असेल तें तावडतोब करा. डेंगळ्यास बाजीरावाकडून झालेली अटक म्हणजे केवळ नाटक होतें व तें रेसिडेन्टाजवळ यशस्वी तऱ्हेनें वठविण्याकरितां सदाशिव माणकेश्वराची रवानगी झाली होती. तो एल्फिन्स्टनची मनधरणी करूं लागला, " साहेब, आपण डेंगळ्यास ताब्यांत घेण्याचा हट्ट सोडा त्यास पेशव्यांतर्फे अटक झालीच आहे, एवढ्यानें आपलें समाधान होईल व न झालें तर तें मी हर प्रयत्नानें करतों असें आश्वासन श्रीमंतांस देऊन मी आलों आहे. तरी आपण माझें एवढें ऐका व मला यश द्या. नाहींतर माझी धडगत नाहीं. मला विषप्राशन करून जीव द्यावा लागेल. माणकेश्वराच्या या लघळपणास एल्फिन्स्टननें दाद दिली नाहीं. या अवधींत बाजीरावानें वाईस जाऊन बंड उभारण्याचा घाट घातला. त्याबरोबर एल्फिन्स्टननें शिरूरची फौज पुण्यास बोलावून बाजीरावास असा शेवटचा व निर्वाणीचा निरोप धाडला कीं, "त्रिंबकजीस हवालीं करा म्हणजे सर्व प्रकरण मिटेल. उगाच चिडाचिडी वाढूं देऊं नका, त्यापासून तुम्हास धोका आहे. त्रिंबकजीस हवालीं करा आणि शास्त्र्याच्या कुटुंबास थोडी नुकसानभरपाई द्या म्हणजे सर्व भागेल. यापेक्षां तुमचा हेकाच तुम्हांस तडीस न्यावयाचा असेल तर त्यास आमची तयारी आहे. पण त्यांत तुम्हांस धोका आहे हें लक्षांत ठेवा." हा निरोप बाजीरावास कळला त्या वेळीं मेजर फोर्ड हा बाजीरावाच्या बोलावण्यावरून भेटीस आला होता व तसेंच या वेळीं मोरो दीक्षित मराठे याची कारभारावर नेमणूक झाली होती त्यास चिमाजी अप्पानें व बाजीरावानें मिळून या डेंगळ्याच्या प्रकरणीं काय काय करावें म्हणून विचारलें, तेव्हां फोर्डनें सांगितलें कीं, डेंगळ्यास स्वाधीन करणें तुमच्या हिताचें आहे. ही साहेबाची सल्ला बाजीरावास मानवली. लगेच फोर्डच्यामार्फत त्रिंबकजीस स्वाधीन करतों म्हणून एल्फिन्स्टनला त्यांनीं निरोप पाठविला. त्याबरोबर लगेच ता. ११ सप्टेंबर रोजीं कॅ. हिक यास ८५० लोक बरोबर देऊन वसंतगडास धाडण्यांत आलें. ता. १९ सप्टेंबरला त्रिंबकजी वसंतगडावर कॅ. हिकचे स्वाधीन झाला पुढें पांच-

सहा दिवसांनीं म्हणजे ता. २५ ला गोविंद बंधुजी व भगवंतराव या दोघांस रेसिडेन्टाचे स्वाधीन करण्यांत आलें. ता. २६ रोजीं तिघांची रवानगी ठाण्याच्या किल्ल्यांत करण्यांत आली.

शास्त्र्याचा खून झाला त्याबरोबर एल्फिन्स्टनचें माथें खवळलें व त्यानें नरसिंह-अवतार धारण करून डेंगळ्यास व त्याचे साथीदार गोविंदराव बंधुजी व भगवंतराव यांस पकडलें व त्याची ठाण्याच्या किल्ल्यांत रवानगी केली. अशा तऱ्हेनें बाजीरावाचा नक्षा उतरविला म्हणून त्याची सगळीकडे चहा होऊं लागली. इंग्रजांची बाजू संभाळली इतकेंच काय पण इंग्रजांच्या सत्तेस पेशवे दरबारीं नवें तेज चढलें म्हणून ग. ज. नें एल्फिन्स्टनला शाबासकी दिली. बाजीरावास घडलेल्या कृत्याबद्दल आपला जिगरदोस्त आपल्या हातानें कंपनी सरकारच्या स्वाधीन करावा लागला! ह्या प्रसंगांतून निसटण्यासाठीं म्हणून बाजीरावानें शक्य त्या सर्व पळवाटा काढल्या व हा प्रसंग आपल्यावर येऊं नये म्हणून शिकस्तीचे प्रयत्न केले. पण कंपनी सरकारच्या अगस्थाळीपणामुळें त्यास हार खावी लागली; आणि कंपनी सरकारचा कांगावखोरपणाच शेवटीं यशस्वी ठरला! कारण शास्त्र्याचा खून झाला तो बाजीरावाभोंवतीं वावरणाऱ्या बेलगाम वृत्तीच्या आडमाप स्वभावाच्या लोकांनीं केला आणि इंग्रजांस हवी असलेली संधि एल्फिन्स्टनच्या बुद्धीमत्तेमुळें चालून आली. कारण शास्त्री पुण्यास आला तो इंग्रजांनीं त्याच्या जिवाची हमी घेतली म्हणून; पण टोपीकर इंग्रजानें त्याच्या जिवाचें रक्षण केलें नाहीं, तर उलट तो मारला जावा म्हणून शत्रुपक्षाच्या लोकांना वाव दिला आणि त्याचा खून होतांच खुनी इसमांना शिक्षा करण्याचें व आपलें बडोद्याचें राजकारण तडीला नेण्याचें काम मात्र झपाट्यानें केलें. वास्तविक एखाद्याच्या जिवाची जामीनकी घ्यावयाची म्हणजे तो मारला गेल्यानंतर खुनी इसमांना दंड करावयाचा किंवा फांशीं द्यावयाचें असें नसून खून न होईल अशीच दक्षता बाळगावयाची; पण त काम इंग्रजांनीं केलें नाहीं.

शास्त्र्याचा खून झाल्याबरोबर आमच्या मायबाप कंपनी सरकारनें क्षणाचाहि विलंब व हलगरज न करतां खुनी इसमास शासन केलें कीं नाहीं म्हणून कंपनी सरकारास दुवा द्यावयाचा असेल तर खुशाल द्या, पण ही रीत नाहीं व कर्तव्यनिष्ठ इंग्रजांबद्दल तरी अशी शेखी कोणी मिरवूं नये.

आतां शास्त्र्याच्या खुनाचा व त्या वेळच्या घटनांचा विचार करावयाचा. शास्त्री पुण्यास येतो, तो बडोद्याच्या हिशेबासंबंधीं उभयपक्षाला सामान्यपणें मान्य होईल अशी तोड काढतो व येथपासून शास्त्र्याबद्दलचें पेशव्यांचें धोरण बदलूं लागतें. शास्त्री पेशव्यांचा स्नेही होणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागतात, कारण शास्त्र्यास पेशवे आपला दिवाण होण्याबद्दल विचारतात हें येथेंच न थांबतां बाजीराव आपली मेहुणी शास्त्र्याच्या मुलास देण्याची भाषा करतो; इतकेंच नव्हे तर लग्नाची तयारीसुद्धां होते पण दरम्यान शास्त्र्याने सुचविलेली तडजोड फत्तेसिंग फेटाळून लावतो व तेथून हे सर्व गाडें बिनसण्यास सुरुवात होते. फत्तेसिंगानें जर शास्त्र्याचें म्हणणें मान्य केलें असतें तर हा सर्व गुंता सुटला असतां व त्याचे परिणाम भावी राजकारणावर इंग्रजांस हवे तसे झाले नसते !

शास्त्री आपलासा करण्याकरितां बाजीरावानें ही सर्व मिष्ठास भाषा केली. त्याच्या प्रत्येक बोलण्यांत आणि कृतींत राजकारण मुसमुसलें होतें. शास्त्र्याला पूर्णपणें बेसावध करण्याकरितां त्याला आपला व्याहीसुद्धां बाजीरावानें केलें. शास्त्री मेला तर मेला औषधावांचून खोकला गेला, आपला जांवई म्हणजे शास्त्र्याचा मुलगा जिवंत आहेच. असा दुष्ट व स्वार्थी विचार बाजीरावाच्या मनांत होता असें जरी धरून चाललें तरी त्याला हरकत नाहीं. चंद्रराव मोऱ्याला मारून शिवाजीस जावळी मिळाली तद्यांतला प्रकार शास्त्र्याच्या बाबतींत होता का ? शास्त्र्याला मारून बडोद्याचें राजकारण सिद्धीस जाणार होतें का ? तर त्याचें उत्तर साफ नाहीं असेंच आहे. म्हणजे शास्त्री जगता तर त्यांत बाजीरावाचा फायदा वा तोटा कांहींच नव्हता. झाला असता तर फायदाच झाला असता ! कारण एखादे वेळेस बडोद्याचा घोळ मोठ्या उत्कृष्ट तऱ्हेनें मिटला असता. शास्त्र्याचें म्हणणें म्हणजे असें कीं, गायकवाडानें फक्त सात लाखांचा मुलूख पेशव्यांस तोडून द्यावा म्हणजे पेशवे तीन कोटींचें देणें सोडून देण्यास तयार होते. म्हणजे बाजीरावानें मान्य केलेला हा समेट खरोखरच समंजसपणाचा होता. त्यास फत्तेसिंगाकडून होकारार्थी उत्तर आलें असतें; पण हें म्हणणें शास्त्र्यामार्फत आलें म्हणूनच उधळलें गेलें. तेंच म्हणणें जर गोविंदराव बंधुजी व भगवंतराव यांच्यामार्फत जातें तर त्यास मान्यता मिळाली असती; पण शास्त्री हा बडोदे दरबारीं सलत असल्यामुळें हें असें झालें. शास्त्र्याचा डोळा

सीताराम रावजीच्या दिवाणगिरीवर असल्याकारणानें, सीताराम रावजी त्यास पाण्यांत पाहात होता व तें खरेंहि होतें. कारण हिशेबाचा तंटा मिटवून शास्त्री माघारीं जाता तर बडोद्याची दिवाणगिरी त्याचीच होती. शास्त्री आज ना उद्यां आपल्या पोटावर पाय देणार म्हणून सीताराम रावजी त्याच्या नांवानें जळत होता. तसेंच शास्त्री हा कंपनी सरकारचा बगलबच्चा म्हणून आनंदराव, फत्तेसिंग वगैरे लोकांस तो नको होता; पण आतां या गोष्टीस तोड निघणें शक्य होतें. शास्त्र्याशीं प्रथम बाजीराव तुसडेपणानें वागला, त्याची कोठेंच डाळ शिजेना; पण शास्त्र्यानें दम खाऊन त्यांतून मार्ग काढला तसाच प्रकार आतांहि होण्याचा संभव होता. कारण पेशव्यांनीं शास्त्र्यास दिवाण होण्याबद्दल विचारलें होतें. म्हणजे शास्त्री पेशव्यांचा दिवाण झाला असता तर सीताराम रावजीच्या मनांतील त्याच्याबद्दलचा द्वेष नाहींसा झाला असता, कारण गायकवाडाची दिवाणगिरी त्याची त्याच्याकडे राहिली असती. आपणांस दिवसेंदिवस जड होणारा हा इंग्रजांचा हस्तक पेशव्यांच्या पदरीं कायमचा गेलेला पाहून आनंदराव व फत्तेसिंग यांस एक ब्याद टळली म्हणून समाधान वाटलें असतें. हिशेबाचा घोळ मिटून पेशव्यांची दिवाणी मिळती तर शास्त्र्यास निरतिशय आनंद झाला असता कारण गायकवाडांचा दिवाण होण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या शास्त्र्यास पेशव्यांचा दिवाण होण्याचें भाग्य म्हणजे अपूर्व होते. आतां बाजीरावानें शास्त्र्यास देऊं केलेली दिवाणगिरी हें केवळ आमिष होतें, त्यांत तथ्य नव्हतें असें म्हणतां येत नाहीं. कारण बाजीरावास चांगल्या, कर्तबगार व हुशार दिवाणाची जरूरी होती. सदाशिव माणकेश्वराकडून कारभार नीटपणें होत नाहीं. हें बाजीरावाचें म्हणणें खरें आहे. त्यास प्रत्यंतर म्हणजे त्यानें शास्त्र्याच्या खुनानंतर मोरो दीक्षित मराठ्यास कारभारावर महिन्या दीड महिन्यांनींच ठेविलें हें होय.

ह्या सर्व गोष्टी, हिशेबाचा घोळ मिटता तर तडीस जाणाऱ्या होत्या. आतां हें हिशेबाचें काम सुद्धां बोटचेपें झालें होतें. कारण तीन कोटींचा हिशेब सालिना सात लाखांचा मुलूख सोडून देण्यावर संपणार होता. तीन कोटी व सालिना सात लाख या दोन आंकड्याचा विचार करतां हें तंत्र सुद्धां फारसें कठीण नव्हतें. या वेळीं एकोत्रा व्याजाचा दर म्हणजे अगदीं कमी. पैकीं या व्याजाच्या दरानें सहा कोटींचें व्याज सालिना तीन

लाख होतें म्हणजे मुद्दल सोडून देऊन पेशवे नुसत्या व्याजावर खूष होते या समेटाचा विचार केला म्हणजे ' तूं कर दिल्यासारखें–मीं करतों घेतल्य सारखें ' अशांतलाच हा प्रकार होता असें म्हणावयास हरकत नाहीं या वेळीं बाजीरावाच्या मनाचा विचार करतां व त्यानें इंग्रजांविरुद्ध मराठ्यांची जूट करण्यासाठीं चालविलेले प्रयत्न पाहतां असेंच म्हणावे लागतें कीं, शास्त्र्याच्या बुद्धिमत्तेस व कर्तबगारीस या गोष्टी घडवून आणणें अगदीं शक्य होतें. पण या सर्वांस अडचण काय ती कंपनी सरकारचीच होती. शास्त्री मूळ इंग्रजांचा हस्तक. गायकवाडींत इंग्रजांचें प्रस्थ वाढविणारा, इंग्रजांचा वकील म्हणून वावरणारा व गायकवाड दरबारास दमदाटी करणारा असा हा इरसाल गृहस्थ, दरमहा शंभर रुपये मिळविणारा सामान्य मनुष्य; पण सालिना साठ हजार रुपये तनखा कमविता झाला आणि मुतालीक म्हणून मान्यता पावला, तोहि कंपनी सरकारच्या कृपेमुळेंच. शेवटीं तर इंग्रजांचा हितचिंतक म्हणून त्यांच्या जामिनकीवर पेशवे व गायकवाड यांच्यामधील तीन कोटींचा तंटा तोडण्यासाठीं म्हणून तो आला; पण दुर्दैवानें इंग्रजांच्याच हलगर्जीपणामुळें तो स्वतः तोडला गेला. येथपर्यंत शास्त्री म्हणजे कंपनी सरकारच्या गळ्यांतील ताईत होता. त्याचें वजन व महत्त्व फार मोठें होतें. बापू मैराळास म्हणजे शास्त्र्याच्या हस्तकास त्रिंबकजीनें फितुर झालेल्या नोकरांच्या त्रासांतून मुक्त करण्याकरितां म्हणून दिडकी दिडकीची किंमत जाणणाऱ्या कंपनी सरकारनें—एल्फिन्स्टननें सव्वा लाख रुपये भरून त्याची मुक्तता केली. ही किंमत शास्त्र्याच्या हस्तकास कंपनी सरकारनें दिली. या एकाच गोष्टीवरून शास्त्र्याची किंमत इंग्रजांस फार होती हें स्पष्ट दिसतें. पण एवढा मोठा बहुमोल हिरा कवडीमोल झाला याचें कारण कंपनी सरकारचा स्वार्थ.

येथवर लिहिल्याप्रमाणें शास्त्री जर जगता व पेशव्यांचा दिवाण होता तर कंपनी सरकारचें फार नुकसान झालें असतें. गायकवाड दरबारचे सर्व सूक्ष्म धागेदोरे जाणणारा शास्त्री पेशव्यांनीं आत्मसात् केला असता, तर गायकवाडींत वाढत असलेलें इंग्रजांचें प्रस्थ ताबडतोब हलकें झालें असतें व ज्या शास्त्र्याचें वर्णन खुद्द एल्फिन्स्टन असें करतो कीं:—

" गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान आहे. त्यानें बडोदें संस्थानची व्यवस्था उत्तम ठेवली आहे. येथें पुण्यास तो पुष्कळ खर्च करून ऐष-

आरामांत राहतो. त्याची स्वारी मोठ्या दिमाखानें निघते, इतकी कीं, सबंध शहर त्याकडे मोठ्या कौतुकानें पाहतें. तो जुन्या पद्धतीचा पाढिक शास्त्री आहे; पण वागणूक मात्र थेट साहेबाची. तुरतुर चालतो. चुरचुर बोलतो. पेशवा व त्याचे कारभारी यांना मूर्ख म्हणतो. डॅम रासकल हा शब्द त्याच्या तोंडीं फार आहे. तो बोलतांना इंग्लिश शब्द फार घुसडतो.” वरील वर्णनांतील त्याचे महत्त्वाचे शब्द म्हणजे शास्त्री मोठा धूर्त व बुद्धिमान आहे. त्यानें बडोदे संस्थानची व्यवस्था फार चांगली ठेविली. हीं दोन वाक्यें फार महत्त्वाचीं आहेत. तेव्हां हा बुद्धिमान व व्यवस्थित मनुष्य पेशव्यांचा दिवाण झाला तर आपणांस पेशव्यांशीं पुढील राजकारणाचे डाव खेळणें फार जड जाईल व गायकवाडींतून आपला पाय निघेल असे विचार एल्फिन्स्टनच्या डोक्यांत आले नसतील असें तरी कसें म्हणावें? किंवा साहेबानें आपली चाल त्याप्रमाणेंच चालविली असें तरी म्हणण्यास काय हरकत आहे? कारण शास्त्री, पेशवे व एल्फिन्स्टन नाशिकच्या यात्रेस चालेल असतां शास्त्र्यानें आपल्या जीवास धोका असणारी भाषा एल्फिन्स्टनला सांगितली होती व “तुम्ही त्यांच्यावर विश्वासून इतके गहाळ कसे राहतां?” असें उत्तर साहेबानें त्यास दिलें होतें. म्हणजे शास्त्र्याच्या जिवास आज ना उद्यां धोका आहे हें एल्फिन्स्टनला माहीत होतें. त्यांतून आतांची वेळ तर शास्त्र्याचें म्हणणें फत्तेसिंगानें फेटाळलें होतें. तसेंच शास्त्री आणि पेशवे यांच्यामध्यें होणारी सोयरीक शास्त्र्यानें मोडली होती व त्याच्या बायकोस बाजीरावाच्या बायकोनें भेटण्यास बोलाविलें होतें; पण शास्त्र्यानें बाजीरावाचा त्या बाबतींतील लौकिक मनांत आणून तिला वाड्यांत धाडलें नव्हतें म्हणजे शास्त्री व पेशवे यांचें बिनसलें होतें, व त्रिंबकजीच्या म्हणण्याप्रमाणें तो मरण्यास लायक झाला होता. या सर्व गोष्टी एल्फिन्स्टनला माहीत असल्याच पाहिजेत. कारण या सर्व गोष्टी लोकचर्चेचा विषय झाल्या होत्या. असें असल्यामुळें एल्फिन्स्टननें शास्त्र्याच्या जिवाची काळजी जास्तच घ्यावयास पाहिजे होती; पण त्यानें तसें न करतां “हें पहा, आम्ही थोडेच लोक घेऊन येथून परभारें पंढरपुरास जाऊन दर्शन घेऊन लगेच पुण्यास येतों. तुम्ही तिकडे बरोबर येण्याचें कांहीं कारण नाहीं हें बाजीरावाचें सांगणें धूर्त एल्फिन्स्टनला पटावें व त्यानें वेरूळचीं लेणीं पाहण्यास निघून जावें याचें मोठें आश्चर्य वाटतें. जसें कांहीं तिकडे मोठें

राजकारण गुंतलें होतें. अंतस्थ हालचाली जाणणारा शास्त्र्याचा सामान्य मदतनीस व पुढें ज्याच्याकरितां एल्फिन्स्टननें सव्वा लाख रुपये खर्च केले असा बापू भैराळ, त्रिंबकजीच्या शिताफीनें पुण्यासच राहतो याचेंसुद्धां मोठें आश्चर्य वाटतें. याच्याहि पुढें म्हणजे शास्त्र्यावर प्रत्यक्ष वार करणाऱ्या इसमाचें नांव सांगणाऱ्या दोन कैद्यांपैकीं गंगाजी खाटीक पुढें साहेबाकडे नोकर असतो. हें सुद्धां खुनाशीं संबंध नसल्याचेंच लक्षण समजावयाचें कीं काय ? थोडक्यांत इत्यर्थ असा, कीं शास्त्र्याबरोबर पंढरपुरास जाऊन जें राजकारण त्यास साधावयाचें होतें तें त्यानें तेथें न जातां साधलें. शास्त्री आज ना उद्यां मारला जाणार तोसुद्धां पेशव्यांच्या सान्निध्यांत आणि पेशवे किंवा गायकवाड यांच्या लोकांकडून हें त्यास निश्चितपणें माहीत होतें. फक्त अडचण काय ती आपलीच; तेव्हां ती आपण दूर केली, कीं कार्यभाग झाला अशी त्याची अटकळ होती आणि त्यानें तसें करतांच अपेक्षेप्रमाणें शास्त्री मारला गेला व लगेच त्याच्या खुनाचें झोंबट साहेबानें आपण नामानिराळे राहून बाजीरावाच्या मागें लावून दिलें.

गंगाधरशास्त्र्याच्या खुनाशीं बाजीरावाचा कांहींएक संबंध नव्हता असें मानण्यास आणखी एक पुरावा आहे. तो म्हणजे प्रभाकर कवीचा. प्रभाकर कवि व पटवर्धनशास्त्री हे लहानपणचे सोबती आणि त्यांचा स्नेहभाव आजन्म होता. परस्परांचे परस्परांशीं संबंध इतके प्रेमाचे व जिव्हाळ्याचे होते कीं, शास्त्र्याच्या मुलास—आबासाहेबास तर त्याची मुलगी केली होती. तेव्हां शास्त्र्याच्या खुनांत बाजीरावाचा संबंध असला तर या गोष्टीचा उल्लेख प्रभाकरानें आपल्या पोवाड्यांत खास केला असता, कारण शास्त्री, त्याचा व्याही व स्नेही, त्याचा खून बाजीराव करता अगर करविता तर त्याचा उल्लेख तितक्याच निष्ठुरपणानें त्यानें केला असता. बरें, पेशवा आतां हतबल व भाग्यहीन झाला होता. तेव्हां आतां तर त्याचेवर वाटेल तसें तोंडसुख घेण्यास हरकत नव्हती. त्याच्या कवनांत शास्त्र्याच्या खुनाचा उल्लेख आहे म्हणजे त्यानें हा विषय हाताळला आहे, पण त्या ठिकाणीं तो असें लिहितो—

बाजीरावसाहेब पेशवे आपल्या राज्याला फार जपत होते.

" फार दिवस आधिं जपत होते या इंग्रज राज्याला ।
अनायासें निमित्त झालें पंढरपुरास कज्जाला ।

भंकट पडलें कांहीं सुचेना प्रधान पुज्याला।
सद्दी फिरली सारांश मिळाले लोक अपुल्याला।
परम कठीण वाटलें आठवलें त्रिभुवन रावबाजीला।
थोर थोर मध्यस्थ घातले साहेबांचे समजीला।
निरुपाय जाणुनी केलें हवालीं मग त्रिंबकजीला।

हा पोवाडा प्रभाकरानें इंग्रजी राज्य झाल्याबरोबर लिहिला असल्यामुळें या म्हणण्याला जास्तच जोर येतो, व त्या वेळच्या लोकांना यासंबंधीं काय वाटत होतें याचें चांगलेंच प्रत्यंतर येतें. शास्त्र्याची मुलगी गं. भा. यमुनाबाई आपल्या बापाच्या खुनाचा आरोप बाजीरावावर करीत नाहीं.

थोडक्यांत म्हणजे गंगाधरशास्त्री पटवर्धनाचे वंशज, त्यांची कन्या, त्यांचे लहानपणापासूनचे मित्र, व्याही, सोयरे व इतर आप्तेष्ट व त्या वेळीं सरदारांत वावरणारी कवि मंडळी, या खुनाचा आरोप बाजीरावावर करीत नाहींत. यानंतर बाजीरावाचा स्वभाव, त्याची भेकड वृत्ति व धार्मिक बुद्धि आणि त्यानंतरची त्याची अगदींच थिजलेली वागणूक या सर्वांवरून बाजीराव या खुनाच्या बाबतींत अगदींच निर्दोषी होता. या खुनामुळें तो इतका घाबरला त्याचें कारण एकतर खून त्याच्या सान्निध्यांत झाला म्हणून हें बालंट आपल्यावर येणार म्हणून तो धास्तावला असेल. तसेंच नारायणरावाच्या खुनानें वडिलांची माती झाली, या खुनानें आपली होते कीं काय, या चिंतेनें त्याच्या अंतःकरणाचा ठाव घेतला असेल. त्याच्या अपेक्षेप्रमाणें तसें झालेंहि.

आतां या प्रकरणीं फक्त एकच विचार शिल्लक राहतो, तो म्हणजे खुद्द शास्त्र्यासंबंधींचा. शास्त्री बडा अक्कलमंद व हुषार पण त्यानें स्वतःच्या जिवाची कशी कांहींच काळजी घेतली नाहीं? कारण त्याला आपल्या जिवास दगाफटका आहे हें माहीत होतें, मग तो गाफील कसा राहिला?

या प्रश्नास उत्तर असें कीं, शास्त्री बडा अक्कलमंद असेल. त्यानें टोपीकराची नाजुकसाजुक कामें करून चांगलें महत्त्व संपादन केलें असेल, पण शास्त्री तो शास्त्री; कारण त्याच्या लक्षांत हा तेढा डाव यावयास पाहिजे होता. तो आला नाहीं म्हणजे तो या वेळेपुरता तरी नादान ठरला खास. कारण मैत्रीच्या पोटीं भेटीस गेलें असतां, 'कुठें आहे तुझा शिंदा आणि होळकर' म्हणून सवाल करतांच नेत्राच्या इषाऱ्याबरोबर शिंदा, होळकर निजामापुढें

खडा करून पहिला बाजीराव गाजी ठरला. तसेंच दोस्तीचे भेटींत कुस्ता करण्याचा घाट घालतांच हातांतील वाघनखांनीं अफजुलखानाचा कोथळा-चा कोथळा बाहेर काढणारा शिवाजी शककर्ता झाला. या दोन उदाहरणांचा विचार करतां शास्त्री नादान ठरतो. शास्त्र्यानें आपल्या जिवाची थोडीबहुत काळजी घेतल्याचें दिसतें, पण त्यानें आपल्या रक्षणाकरितां सशस्त्र लोकांची चौकी ठेवावयास पाहिजे होती किंवा कंपनी सरकारनें तशी काळजी घ्यावयास पाहिजे होती. चौकी मारून जर शास्त्र्याचा खून झाला असता, तर मग त्याची जबाबदारी कंपनी सरकारवर आली नसती.

"खून मुख्यतः त्रिंबकजीनें करविला. त्यास भरपूर प्रोत्साहन बडोद्यांतून मिळालें. मूळ कल्पना बडोदकर मंडळीची. त्याचें साहित्य सिद्ध केलें त्रिंबकजीनें आणि माहिती असून दुर्लक्ष केलें बाजीरावानें असा निर्णय पुराव्यावरून देतां येईल." असा निर्णय सुप्रसिद्ध रियासतकार रावसाहेब सरदेसाई देतात. यावर माझें म्हणणें खालीलप्रमाणें आहे—

"खून मुख्यतः उरल्. त्रिंबकजीनें करविला. त्यास प्रोत्साहन बडोद्यांतून मिळालें, मूळ कल्पना कोणाची तें सांगतां येत नाहीं. त्यांत साहित्य तयार केलें त्रिंबकजीनें. या खुनाच्या बेताची कानगी बाजीरावास असेल; पण मध्यंतरीं शास्त्री आणि बाजीराव यांचा स्नेह जमल्यानंतर शास्त्र्याला लंबे करण्याच्या कल्पना बाजीरावाच्या मनांतून नाहींशा झाल्या असाव्यात कारण शास्त्री जिवंत राहण्यांतच त्याचें हित होतें. बडोद्याचा घोळ आतां तर त्याच्यामार्फतच मिटला असता. एल्फिन्स्टननें मात्र माहिती असून आपला स्वार्थ साधण्यासाटीं सहेतुक दुर्लक्ष केलें असेंच म्हणावें लागतें."

## ६ :: सुटका, बंदिवास व अखेर

शास्त्र्याचा खून झाला त्याबरोबर एल्फिन्स्टननें आकांडतांडव करून डेंगळा, गोविंदराव बंधुजी व भगवंतराव या तिघांस कैद करून ठाण्याच्या किल्ल्यांत ठाणबंद केलें, व आपलें राजकारण तांतडीनें तडीस नेण्याचा उद्योग चालविला. बडोद्यांत आपलें आसन डळमळीत झाल्याचा भास इंग्रजांस झाला पण तो भासच होता. त्याचें कारण शास्त्र्याचा खून नसून, इंग्रज नेपाळांत गुंतला होता व दोन ठिकाणीं युद्ध चालविणें त्यास शक्य नव्हतें. म्हणून एकदोन वर्षे त्यांनीं नुसत्या दमांत मारून नेलें व आपणांस योग्य अशी संधि येतांच मराठ्यांचा समाचार घेण्याचें ठरविलें. बडोद्यांतून इंग्रजांचें प्रस्थ नाहींसें करण्याच्या उद्योगांत सीताराम रावजी प्रमुख होता, त्यास इंग्रजांनीं कैद केलें. बडोद्याचा कारभार शास्त्र्याच्या मुलास देऊन टाकिला. शास्त्र्याच्या खुनाबद्दल पेशव्यांच्याकडून दंड म्हणून घेतला नव्हता तोहि पुढें त्यांनीं दामदुप्पट घेतला. थोडक्यांत बडोद्याचें प्रकरण अशा तऱ्हेनें निकालांत लागलें.

त्रिंबकजीला अटक झाल्याकारणानें बाजीरावाचें काम लंगडें झालें. त्याच्या अत्यंत विश्वासाचा स्नेही व नोकर नाहींसा झाला. तेव्हां एल्फिन्स्टनकडे स्वतःच्या बुद्धीस प्रामाणिकपणें वाटेल तें सांगून पेशव्यांची बाजू संभाळणारा त्याच्याजवळ दुसरा मनुष्य नव्हता. सदाशिव माणकेश्वर हा एल्फिन्स्टनकडे बोलाचाल करावयास जात असे, पण तो अंगचोर व

इंग्रजांस सामील होता. एका प्रसंगीं त्रिंबकजीनें ही गोष्ट बाजीरावाच्या नजरेस पुराव्यानिशीं आणिली होती. त्या वेळेपासून त्रिंबकजीकडे मंत्रीपद आलें आणि साहेबाशीं जाबजबाब करण्याकरितां त्रिंबकजी जाऊं लागला. त्रिंबकजी डेंगळ्यास अटक केल्यानंतर एल्फिन्स्टनकडे बोलणें चालणें करण्यासाठीं सदाशिव माणकेश्वर, मोरो दीक्षित, चिमणाजी नारायण वगैरे मंडळी जाऊं लागली; पण यांपैकीं कोणावरहि बाजीरावाचा विश्वास नव्हता. ही सर्व मंडळी निखालसपणें जरी इंग्रजांस सामील नव्हती तरी त्यांचा बावनकशी भरंवसा बाजीरावास नव्हता. डेंगळ्यास अटक केल्यानंतर त्यांस कोठें ठेवावें याबद्दल तिघांचीं तीन मतें पडलीं. त्यास काशीस ठेवावा अशी बाजीरावाची सूचना होती, अलाहाबादेस ठेवावा असें एलफिन्स्टनचें मत होतें, पण गव्हर्नर जनरलनें त्यास ठाण्यास ठेवावा असा हुकूम धाडला. त्याबरोबर बाजीराव व एल्फिन्स्टन यांचे हुकूम जागच्या-जागीं राहून त्रिंबकजीस ठाण्यास ठेवण्यांत आलें.

२७ जुलै १८१५ला शास्त्र्याचा वध झाला. १९ सप्टेंबर रोजीं त्रिंबकजी कॅ. हिक्चे स्वाधीन झाला व वसंतगडावरून त्याची ठाण्याच्या तुरुंगांत रवानगी झाली. यानंतर बरोबर ५१ आठवड्यांनीं म्हणजे १२ सप्टेंबर १८१६ ला तो इंग्रजांच्या हातांवर तुरी देऊन पळाला. त्रिंबकजीस फांशीं देण्यासाठीं म्हणून पंचवीस गारदीबरोबर देऊन मेण्यांत घालून खाडी-कांठीं आणिला व आतां त्याचा शिरच्छेद होणार तों त्यानें मारेकऱ्यांस विनंति केली कीं, ' आम्हांस मारूं नये पुण्यास जिवंत घेऊन चलावें, मी तुमचे उपकार फेडीन.' हें त्रिंबकजीचें बोलणें ऐकून मारेकरी म्हणाले कीं, आम्हांस सोळा हजारांचा ऐवज, रोख मोहरा पंधरा हजार आणि रोख रुपये एक हजार इतके पैसे देण्याचा हमीदार द्या म्हणजे पुण्यास येतों. खाडीच्या कांठीं प्रत्यक्ष हमी घेण्यासाठीं ऐपतदार मनुष्य कोठून आणावा अशी पंचाईत त्रिंबकजीला पडली. पण इतक्यांत आबा जोशी नांवाचें गृहस्थ तेथें आले, त्यास त्रिंबकजीनें आपली वस्तुस्थिति नीट समजावून सांगितली; तेव्हां त्यानें जातीनें जोखीम घेतली व मारेकऱ्यांस सांगितलें कीं, त्रिंबकजीस जिवंत घेऊन तुम्ही पुण्यास चला. तेथें जातांच तुमची ठरलेली रक्कम मी स्वतः तुमच्या पदरांत टाकीन. असें सांगून आबा जोश्यांनीं मारेकऱ्यांची खात्री पटविल्यावर रात्रीचा दिवस करून एकसारख्या मजला

मारीत ही सर्व मंडळी सहावे दिवशीं पुण्यास आली. पुण्यास येतांच आपण गुप्त राहून डेंगळ्यानें स्वहस्तानें एक *पत्र आपले स्नेही हरबा आबा यांस लिहिलें व त्यांस पंधरा हजार होन व एक हजार रोख अशा ऐवजाची तरतूद तावडतोब करून आबा जोश्यांच्या स्वाधीन करण्यास सांगितलें. ऐवज आजच्या आज हातीं न येईल तर मारेकरी आमची गर्दन मारतील म्हणून ऐवजाची व्यवस्था करावी. तसेंच आबा जोशी सांगतील त्याप्रमाणें वागावें. गोष्ट पट्‌कर्णी करूं नये. येथून सुटलों म्हणजे बापू गोखल्याच्या लष्करांत जाईन असें सर्व खुलासेवार लिहिलें होतें. त्याप्रमाणें ऐवजाची वगैरे व्यवस्था होऊन त्रिंबकजी सुटला.

त्रिंबकजी निसटला तो प्रथम खानदेशांत गेला. तेथें बागलाणकडील डोंगरांत त्यानें आपला जम बसविण्यास सुरुवात केली. प्रथम भिल्ल, रामोशी, मांग वगैरे लोकांस मिळवून घेतलें. पुढें कांहीं दिवसांनीं उत्तरेकडचा प्रदेश सोडून तो दक्षिणेस आला व शंभोमहादेवाच्या डोंगरांत राहूं लागला. तेथें स्वारांची जमवाजमव केली. अशा तऱ्हेनें तो आपल्या तयारीचें एकेक पाऊल पुढें टाकूं लागला. टोपीकरांच्या कैदेंतून त्रिंबकजी डेंगळा निसटला ही अचंब्याची गोष्ट हां हां म्हणतां सगळीकडे पसरली व लोकांस आश्चर्य वाटलें. भोळ्याभावड्या वृत्तीच्या बाजीरावास ही ईश्वरी कृपा असें वाटूं लागलें व आतां आपण जोर केल्यास आपली विसकटलेली घडी नीट बसण्याचा बराच संभव आहे. म्हणून त्यानें त्रिंबक-

---

*ही हकीगत नवीन आहे. पेशवे दप्तर भाग ४१ मध्यें पत्र नं. ९१ मध्यें आली आहे. सर्व पत्र त्रिंबकजीच्या हस्ताक्षराचें आहे. सदरहू पत्रांत सुरुवातीचा मजकूर असा आहे.

“ राजश्री हरबा आबा यांसी प्रति त्रिंबकजी डेंगले रामराम विनंती विशेष होळकराने इंग्रजांचा थोरला माणूस मारला सबब आम्हांस फाशी द्यावयाकर्ता भेण्यात घालून बरोबर पंचवीस गारदी देऊन खाडीचे काठी आणिले. ”

या पत्रांतील होळकरानें इंग्रजांचा थोरला माणूस मारला याचा संदर्भ नीट लागत नाहीं. तरी कोणा तज्ज्ञास तो लागल्यास आम्हांस कळविण्याची कृपा करावी.

जीस ऐवज पाठवून साह्य करण्यास सुरुवात केली. त्याबरोबर त्रिंबकजीच्या हालचालीस जोर चढून हें प्रकरण न आवरलें तर आपणांस जाचक होईल असें वाटून इंग्रजांनीं पुन्हां त्रिंबकजीस पकडण्याचा उद्योग चालविला.

१९ सप्टेंबर १८१५ रोजीं त्रिंबकजी कॅ. हिकचे स्वाधीन झाला. त्या वेळेपासून बरोबर एक वर्षपर्यंत त्यास आपला काल इंग्रजांच्या कडक शिस्तीत काढावा लागला. त्याच्यासारख्या उलाढाल्या माणसास हा काल कंठणें म्हणजे मरणप्राय दुःख झालें; पण त्यानें आपली सुटका या नाहीं त्या मार्गानें केली व साहेबाच्या हातांवर तुरी दिल्या व तो ता. १२ नव्हेंबर १८१६ला इंग्रजांच्या कैदेतून निसटला. १८१६ पासून १८१७. पर्यंतच्या एका वर्षाच्या अवधींत त्याच्या उद्योगास चांगलेंच तेज चढलें. १८-३-१८१७ ला म्हणजे पाडव्याच्या मुहूर्तानें त्रिंबकजी उघड फौजा घेऊन बाहेर पडणार आणि सामन्यास सज्ज होणार अशी बातमी एल्फिन्स्टनला कळली. या वेळीं बाजीराव फुलगांवला आपल्या राजवाड्यांत तीन महिने राहिला होता. त्या वेळचा त्याच्यासंबंधींचा उल्लेख असा सांपडतो कीं, "श्रीमंत रथांत बसून फुलगांवाला जात होते. पांडुरंगपंत ढमढेरे यांची स्त्री रथांत होती मार्गी रथ लवंडला आणि श्रीमंतांचें अंग दुखावलें सबब स्वारी फुलगांवास राहिली. तेथेंच बाजीरावानें मोरो दीक्षित याचे कन्येचें लग्न केलें. त्रिंबकजी येथें येऊन श्रीमंतांस चोरून भेटूं लागला. त्यानें पेंढारी स्वार बरोबर घेऊन कोंकणांतील गांव लुटले. बहुत खराबी केली." या वेळची बाजीरावाची वागणूक खरोखरीच मुत्सद्दयाला शोभण्यासारखी होती. त्रिंबकजी आपला दोस्त, शत्रूंचा नक्षा उतरवण्याकरितां धडपड करतोय तर त्यास मदत करणें आपलें आद्य कर्तव्य म्हणून तें केलेंच पाहिजे आणि तसें करतांना आपल्या शत्रूंस मात्र त्याचा ठावठिकाणाहि लागूं नये; इतकेंच काय पण, त्याचा वाससुद्धां येऊं नये अशी आपली वागणूक असावी हेंच योग्य आणि न्याय्य ठरतें आणि या प्रसंगीं बाजीरावाची तशी ती होती. या वेळीं त्रिंबकजी सुटल्याची वार्ताहि आपणांस नाहीं, तसेंच त्याचा पाठपुरावा करण्याची आपली इच्छा नाहीं असा वागण्याचा ढंग बाजीरावानें ठेवला.

इंग्रजांस खूष करण्याचे शिकस्तीचे प्रयत्न बाजीरावानें चालविले. पेंढाऱ्यांचें बंड मोडण्याच्या विचारांत इंग्रज होता, त्यास बाजीरावानें आपण होऊन चांगल्या उपयुक्त सूचना केल्या; तसेंच इंग्रज व आपण यांच्यामध्यें

कलहाचे म्हणून पुष्कळच प्रश्न होते त्यांचा निकाल इंग्रजांशीं नमतें घेऊन त्यानें केला. त्याच्या वागणुकीची चहा इंग्रज करूं लागले. बाजीरावास असाच खूष राखा, त्याच्या कलानेंच गोष्टी करा, उगाच कुरापत काढूं नका असें गव्हर्नर जनरलनें रेसिडेन्टास मुद्दाम लिहिलें. इतकेंच काय, पण बाजीरावानें याच्याहि पुढें जाऊन म. १८१७च्या फेब्रुवारींत बापू गोखल्यास त्रिंबकजीवर धाडलें; कारण या वेळीं त्रिंबकजीचा बंडावा नीरेच्या दक्षिणेस चालू होता. पण बंड वगैरे कांहीं नाहीं सगळीकडे शांत आहे असें सांगत बापू गोखला माघारीं आला. २४ फेब्रुवारीपर्यंत बाजीरावाची ही वागणूक म्हणजे केवळ वरपांगी आहे, आंतून त्रिंबकजीस त्याचें साह्य आहे असें इंग्रजांससुद्धां वाटलें नाहीं. एवढा इंग्रज धूर्त पण त्यावरसुद्धां बाजीरावानें किंचित् काल मात केली. पण बाजीराव पुरा दुर्दैवी होता. त्याच्याभोंवतीं फितुरांचा गराडा पडला होता. त्यामुळें त्याच्या यशाचा कलश नेहमींच भंगला जाई. तसेंच आतांहि झालें. २४ फेब्रुवारीस कांहीं कागदपत्र रेसिडेन्टाचे हातांत पडले व त्यावरून त्रिंबकजीस बाजीरावाचें साह्य आहे असें एल्फिन्स्टनच्या नजरेस आलें. त्याबरोबर एल्फिन्स्टनची ब्याद बाजीरावाच्या मागें लागली.

मार्च महिन्यांत बाजीराव व एल्फिन्स्टन यांच्यामध्यें पुन्हां कचकाकचकीस सुरुवात झाली. "त्रिंबकजीनें उभारलेलें बंड नेस्तनाबूद करण्याकरितां मी फौजा पाठवितों व त्याचा बंदोबस्त करतों." या बाजीरावाच्या म्हणण्यास एल्फिन्स्टननें उत्तर दिलें कीं, "या कामीं आम्हांस तुमच्या फौजेची बिलकूल गरज नाहीं, आम्ही आपल्या फौजा पाठवून त्याचा बंदोबस्त करूं. त्याचे नातेवाईक व मित्रमंडळ उघडपणें वावरत आहेत त्यांचा बंदोबस्त तुम्ही करून त्यास कैद करा म्हणजे झालें. तसेंच तुम्ही त्रिंबकजीला गुप्तपणें साह्य करतां ते करूं नका व तुम्हीं फौजांची जमवाजमव चालविली आहे ती बंद करा म्हणजे झालें." एल्फिन्स्टनचें हें भाषण ऐकून बाजीरावानें उत्तर केलें कीं, "मी इंग्रजाची मनधरणी करीत असतां माझ्यावर हें कुभांड उगाचच घेतलें जात आहे." व या आपल्या म्हणण्याची सत्यता इंग्रजांस पटावी म्हणून त्यानें त्रिंबकजीच्या कुटुंबास अटकाव केला. हें जरी केलें तरी त्यामुळें एल्फिन्स्टनचें समाधान झालें नाहीं. कारण खानदेशादि सर्व ठिकाणीं फौजा जमविण्याचें काम जारीनें चालूं

होतें तें कांहीं बाजीरावानें थांबविलें नाहीं. त्याबरोबर एल्फिन्स्टननेंहि पण आपल्या बाजूनें तयारी चालविली. १५ मार्च १८१७ रोजीं एल्फिन्स्टननें कर्नेल स्मिथची फौज पुण्यास बोलाविली. २१ मार्चला गव्हर्नर जनरलला खलिता लिहून आतां बाजीरावाशीं सलोखा ठेवणें शक्य नाहीं व त्याच्या-संबंधीं पुढील चढाईचें धोरण आंखण्यासाठीं म्हणून गव्हर्नर जनरलकडून विशिष्ट अधिकार मागविले. आपली अशी तयारी केली, त्याबरोबरच त्यानें बाजीरावालाहि पण चांगली समज दिली. पण या त्याच्या धमकावणीस बाजीरावानें फारशी भीक घातली नाहीं. त्यानें युद्धाची तयारी झपाट्यानें चालविली. आपलें सर्व जडजवाहिर रायगडास धाडिलें. पुण्याच्या कारखा-न्यांत तोफा ओतण्याकरितां बैल जमा केलें. अशी बाजीरावाची तयारी सर्व बाजूंनीं चालली असतां एप्रिलला एल्फिन्स्टनकडून बाजीरावास झण-झणीत खलिता आला, त्यांत तुम्ही आपली फौजेची जमवाजमव व इतर युद्धाची तयारी ताबडतोब न थांबवाल तर आम्ही तुमच्याशीं युद्ध पुकारूं असा धाक बाजीरावास घातला होता. या धाकालाहि बाजीराव जेव्हां जुमानीना तेव्हां कॅ. फोर्डच्यामार्फत बाजीरावाची समजूत घालण्याचा प्रयत्न इंग्रजांनीं केला व त्रिंबकजीस आमच्या स्वाधीन करा अशी मागणी केली. इतकें करून एल्फिन्स्टन स्वस्थ न बसतां त्यानें जिकडे जिकडे म्हणून बंडावे ऐकूं येत होते तिकडे तिकडे फौजा रवाना केल्या. फौजा रवाना झालेल्या पाहून बाजीरावानें ६ मे रोजीं एल्फिन्स्टनला आपल्या वाड्यांत भेटीस बोलाविलें. या भेटींत बाजीरावानें आपलें अन्तःकरण खुलें करून आपल्या सर्व तक्रारी व म्हणणें खुलासेवार मांडलें त्याचा गोषवारा खालीलप्रमाणें आहेः—

बाजीरावाच्या बोलावण्यावरून साहेब आपली खासा मंडळी बरोबर घेऊन भेटीस गेला. प्रारंभीं औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यानंतर बाजीरावानें आपल्या पार्श्वगणांस बाहेर जाण्यास सांगितलें व मुख्य विषयास सुरुवात केली. " मी तुम्हांस आज मुद्दाम भेटीस बोलाविलें आहे. कारण तुमचा व तुमच्या सरकारचा माझ्यासंबंधीं उगाचच गैरसमज वाढत चालला आहे, तो दिल खुला करून बोलून टाकावा व तुमची माझी दिलसफाई व्हावी अशी माझी इच्छा आहे. मीं आज हे दिवस पाहिले व लहानाचा मोठा झालों तो केवळ तुमच्या आश्रयामुळें. १८०२ मध्यें मजवर पुण्याची

गादी सोडण्याचा प्रसंग आला त्या वेळीं मी निःशंकपणें तुमच्या आश्रयास आलों आणि तुमच्याच मदतीनें मला ती गादी मिळाली. तेव्हां हे सर्व उपकार विसरून मी तुमच्याविरुद्ध जाईन हें तुम्हांस शक्य तरी कसें वाटतें ? हा मुद्दा क्षणभर जरी बाजूला ठेविला तरी तुमची सत्ता येथें कशी स्थापन झाली, त्यानंतर तुम्हीं कसे बळावलात हें मला माहीत आहे. तसेंच कंपनी सरकारच्या प्रचंड सत्तेशीं ज्यांनीं ज्यांनीं म्हणून झुंज घेतली ते सर्व मदांध ठरून धुळीस मिळाले हें मीं प्रत्यक्ष पाहिलें. एवडा मोठा प्रचंड पराक्रमी हैदर, मी मी म्हणणारा टिपू, पण या दोघां बापलेकांची तुमच्यापुढें चटणी उडाली. गेलीं पन्नास वर्षें अवघा हिंदुस्थान गदगदा हलविणारे शिंदे-होळकर पण त्यांचा व तुमचा संग्राम होतांच त्यांची काय दशा उडाली हें कां मीं पाहिलें नाहीं ? इतकेंच काय, पण जेव्हां जेव्हां तुमची व एतद्देशीय फौजांची गांठ पडली तेव्हां तेव्हां त्यांचा पाडाव व भयंकर नुकसान झालेलें मीं पाहिलें. असें असतां मी आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा कसा पाडून घेईन. आतां खुद्द माझी स्थिति म्हणाल तर मजजवळ व्यवस्थित फौज नाहीं. पाश्चात्य पद्धतीनें मुद्दाम तयार केलेलें लष्कर मजकडे नाहीं. त्यांतून मला लढाईचा मोठा कंटाळा. तोफांनीं माझ्या कानठळ्या बसतात व त्यांची मला भीति वाटते, म्हणून सलामीच्या तोफा सुद्धां मी दूर करावयास सांगतों. असें असतां तुम्हीं व तुमच्या सरकारनें मजविषयीं उगाच गैरसमज करून घेतला आहे." अशा अर्थाचें बाजीरावानें पुष्कळच मिठ्ठास भाषण केलें; पण त्याचा परिणाम धूर्त एल्फिन्स्टनच्या मनावर कांहींच झाला नाहीं.

या भेटींतच एल्फिन्स्टननें बाजीरावास असें निक्षून सांगितलें कीं, एक महिन्याच्या आंत त्रिंबकजीस स्वाधीन करा आणि तोंपर्यंत जामीन म्हणून चोवीस तासांच्या आंत रायगड, पुरंदर, सिंहगड व त्रिंबक हे चार किल्ले आमच्या ताब्यांत द्या. एल्फिन्स्टनची ही भाषा ऐकून बाजीरावास राग आला असेल व तसा तो येणें हें रास्तहि होतें. कारण आतां त्रिंबकजी निसटला तो इंग्रजांच्या हलगर्जीपणामुळें; पण त्याबद्दल शासन मात्र बाजीरावास, अशांतला हा जबरदस्ताचा न्याय होता. पण ता. ६ मे रोजीं एल्फिस्टनची व बाजीरावाची भेट झाली. भेटींत एल्फिस्टननें किल्ल्यांची मागणी केली, आणि मागणीप्रमाणें चोवीस तास होतांच ता. ८ मेला

पुण्यास इंग्रजांच्या फौजेनें वेढलें. त्याबरोबर बाजीरावानें पुन्हां धूर्तपणा केला कारण या वेळीं त्याची तयारी त्याच्या मतानें पूर्ण झाली नव्हती म्हणून हे हातघाईवर आलेलें प्रकरण किल्ल्यांच्या सोडचिठ्या देऊन तात्पुरतें मिटविलें बाजीरावानें सोडचिठ्या दिल्या खऱ्या पण पुन्हां तो त्रिंबकजीला पकडण्याच्या बाबतींत थंडच राहिला. १३ मे रोजीं पुणें सोडून जाण्याचा प्रयत्न त्यानें केला. पुन्हां १७ मेला बाजीरावानें आपल्या फौजा इंग्रजांशीं युद्ध करण्याकरितां सिद्ध केल्या; पण त्याचा त्यासच विश्वास येईना म्हणून त्याचे हे तेजस्वी विचार जागच्या जागीं नाहींसे झाले, व २० मेला त्यानें इंग्रजांस शरणचिठ्ठी लिहून दिली; आणि त्रिंबकजीस पकडून देण्याबद्दल दोन लाखांचें बक्षिस व इनाम गांव देण्याचा जाहीरनामा काढला.

"त्रिंबकजी डेंगळा कंपनी सरकारच्या कैदेंतून फरारी झाला आहे व तो एकसारखे बंडावे करीत फिरत आहे. तरी त्याचा ठावठिकाणा लावून देणारास, तसेंच त्यास मेला अगर जिवंत सरकारांत स्वाधीन करणारास, दोन लाख रुपये बक्षिस व एक हजाराचा गांव इंग्रज सरकारचे विद्यमानें दिला जाईल. तसेंच त्रिंबकजीची पुरी चौकशी करून जो कोणी सरकारांत कळवील त्याजवर सरकारची सर्फराजी होईल. याविषयीं जो कोणी अनमान करील त्याजवर सरकारची इतराजी होईल. समस्त गरीब रयत, ब्राह्मण मराठे, वाणी व उदमी; तसेंच परदेशी, मुसलमान, बेरड, भिल्ल, मांग रामोशी व रहदार इत्यादि जे कोणी त्रिंबकजी डेंगळ्याचा पत्ता अमुक जाग्यावर आहे असें खात्रीलायक दाखवून देईल त्यास पांच हजार रुपये बक्षिस व एक चाहूर जमीन इनाम इंग्रजबहादुर यांचे विद्यमानें मिळेल. डेंगळ्याचा पत्ता माहीत असून जो कोणी सरकारांत कळविणार नाहीं त्याचें पारिपत्य करण्यांत येईल. त्रिंबकजी डेंगळा याचे मिलाफी असामी खालील प्रमाणें आहेत.

१ बापू गायकवाड शेटफळकर, २ नागोजी वाल्लुंज, ३ रविराव शिंदे लोणीकर, ४ माहादाजीराव नातेपुतेकर, ५ तिमापा वडारी, ६ गोधाजी डेंगळा, ७ सयाजी मुले, ८ आपाजी कुरडुवाडीकर, ९ निंबाजी जाधव फलटणकर, १० महिपतराव डेंगळा, ११ बापू बारडकर. १२ दाजी डफळे

याप्रमाणें बारा असामी आहेत. त्यांच्या कुटुंबाचीं मुलेंमाणसें बेड्या घालून बंदोबस्तानें हुजुर पोंहोचतीं करणें. त्यांचीं घरें जमीनदोस्त करणें

या बारा असामींपैकीं जे कोणी त्रिंबकजी डेंगळयास धरून आणून देतील त्यांस वरीलप्रमाणें इनाम मिळेल."

या वेळीं बाजीराव आपणाकडून हें आलेलें गंडांतर दूर ढकलण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत होता, त्यानें त्रिंबकजीस पकडण्यासंबंधीं जाहीर-नामा काढिला पण त्याला स्वतः होऊन पकडण्याचा उद्योग मात्र तो करीना. त्याचें कारण आंतून आंतून त्याची तयारी चालूच होती. शिंद्याचा सरदार जॉन बॅपटिस्ट यास बाजीरावानें फौज घेऊन आपल्या मदतीस बोलाविलें होतें, त्या वेळीं बाजीरावास शिंदे व भोसले यांनीं निक्षून कळविलें कीं, तुम्ही प्रथम पुढाकार घेऊन इंग्रजांशीं झुंज द्या म्हणजे आम्ही तुम्हांस सामील होतों. पण आम्हांस तोंडघशीं पाडून तुम्ही बाजूला राहणार असाल तर तें परवडणार नाहीं. मग तुमचा विचार तुम्ही पाहा; आमचा विचार आम्ही पाहूं. बाजीरावास हें पत्र त्याच्या सरदारांनीं मुद्दाम सांकेतिक भाषेंत लिहिलें होतें. इंग्रजांचे हातीं पडल्यास त्यांस कोणताच बोध होऊं नये; अशी काळजी मुद्दाम घेतली होती. या कामावर विठोबा नाईक गायकवाड या नांवाच्या हुजऱ्याची नेमणूक झाली होती. त्यास भोसले व शिंदे यांजकडें धाडिलें होतें. त्या नाइकास उद्देशून पत्र लिहिलें आहे. विठोबा नाईक यासच पेशवा समजण्यांत आलें आहे. तें पत्र असें:—'ही पेढी खरें पाहिलें तर विठोबा नाईकांचीच आहे, आणि जरूर लागेल तेव्हां ते ज्या हुंड्या करतील त्या आमच्याकडून स्वीकारण्यांत विलंब होणार नाहीं; पण तुमच्या पेढींत ऐवज (फौज) शिल्लकच नसेल तर तूर्त साव-कारांची (इंग्रजांची) कशीतरी समजूत काढावी. कांहीं दिवस विठोबा नायकानें तीर्थयात्रेच्या निमित्तानें बाहेर पडावें. आणि स्वहस्तानें हुंड्या पाठवाव्या म्हणजे ज्या ज्या ठिकाणीं ऐवजाची जरूर पडेल त्या त्या ठिकाणीं तो बिनतक्रार इकडून पाठविण्यांत येईल." या पत्रावर तारीख ११-९-१८१५ अशी आहे. या वेळीं बाजीरावाची राज्यरक्षणाची धडपड चालूं होती.

२० मे रोजीं बाजीरावानें किल्ल्याच्या सोडचिठ्या दिल्या व त्रिंबकजीस पकडण्याबद्दल जाहीरनामा काढला. बाजीरावानें एवढें केलें पण त्यांत एल्फिन्स्टनला समाधान नव्हतें. बाजीरावास सर्वतोपरी त्याच्या भाग्यासुद्धां व सत्तेसुद्धां साफ करावयाचें एल्फिन्स्टच्या मनांत होतें. पण दरम्यान कांहीं

दिवस तसेच गेले. याचें कारण असें कीं, गव्हर्नर जनरलकडून एल्फिन्स्टनला हवे असणारे हुकूम स्पष्टपणें आले नव्हते, पण तसे ते येतांच त्यानें २८ मे रोजीं कॅ. फोर्डबरोबर तहाचा नवीन मसुदा धाडला आणि ता. १ जून रोजीं स्वतः एल्फिन्स्टन बाजीरावाच्या भेटीस गेला व त्यानें नवीन तहाच्या कलमांची वाटाघाट केली. या तहानें बाजीराव नामशेष झाला. महाराष्ट्राबाहेरील चौतीस लाखांचा मुलूख इंग्रजांनीं घेतला. इतर सरदारांशीं त्याचा संबंध त्यांनीं कायमचा तोडून टाकिला. त्यामुळें पेशव्याचें महत्त्व व पुढारीपण नाहींसें झालें व पेशवे दरबारीं जाबसाल करण्याकरितां राहिलेले इतर दरबारचे वकील पुण्याहून ज्या त्या ठिकाणीं परत गेले. येवढी मोठी सत्ता नाहींशी होतांना बाजीरावास फार वाईट परत गेले. त्यानें हा तह मान्य करतांना नाना क्लृप्त्या व बतावण्या केल्या पण शेवटीं त्याचा एलफिन्स्टनपुढें व त्या वेळच्या त्याच्या एकंदर परिस्थितीपुढें नाइलाज झाला व त्यास तो अपमानकारक तह मान्य करण्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं. शेवटीं १३ रोजीं बाजीरावानें त्या तहावर सही करून मोठ्या जड अंतःकरणानें आपल्या सत्तेवर पाणी सोडिलें आणि तो निर्माल्यवत् झाला. वसईच्या तहापासून अवघ्या पंधरा वर्षांच्या आंत इंग्रजांनीं एवढा मोठा पेशवा पण पार पचविला व मराठ्यांचें राज्य फस्त केलें. अत्यंत संतापानें बाजीरावानें या तहावर सही केली. खरेंच आहे; कारण टोपीकराशीं स्नेह केल्यापासून त्याच्या भाग्यास ओहटी लागली, ती इतकी कीं, शेवटीं त्याचा भाग्यभानु खग्रास झाला. खरें पाहिलें तर वसईचा तह झाल्यापासून आज ना उद्यां इंग्रज आपणांस खाणार असें रावबाजीस एकसारखें वाटत होतें. तेव्हां या पायघोळ कंपनी सरकारच्या कचाट्यांतून सुटण्याची त्याची आंतूनआंतून तयारी चालू होती. त्रिंबकजीनें तर कारभार हातीं घेतल्यापासून एकसारखी धडपड या एका गोष्टकरितांच चालू ठेविली होती. त्यामुळें व त्याच्या साहसी स्वभावामुळें तो बाजीरावाचा विश्वाससर्वस्व झाला होता. त्याचा ताबा इंग्रजांनीं घेतल्यापासून बाजीरावाच्या मनांतून इंग्रज उतरला व आज ना उद्यां इंग्रजांशीं सामना द्यावयाचा असें त्यानें ठरविलें. व १३ जूनच्या नव्या व शेटवच्या तहानें तर ही गोष्ट अगदीं जवळ आली. नंतर चार महिनेसुद्धां लोटले नाहींत तों इंग्रज आणि पेशवे एकमेकांस भिडले, व हा तेजस्वीपणा बाजीरावानें दाखविला याबद्दल बाजीरावा-

आपल्या पतीच्या रक्षणासाठीं पंचप्राणांची कुरवंडी केली. अशा तऱ्हेनें त्रिंबकजीची बायको त्याच्या डोळ्यांदेखत शत्रूकडून मारली गेली. आपण पुरुष म्हणून मारलेला मराठा हा बाप्या नसून बाप्यास लाजविणारी स्त्री आहे आणि ती सुद्धां त्रिंबकजीची बायको आहे हें जेव्हां स्वान्स्टन यांस कळलें त्या ... त्यास मोठा अचंबा वाटला. त्रिंबकजी भिंत फोडीत उभा होता त्याच्या ...र जाण्याची कोणाची ताकद होईना; पण त्रिंबकजी स्वतः दैवावर ...न गेला होता. धनी राज्यास मुकून परांगदा झाला, जिवाची सोबतीण डोळ्यांदेखत मारली गेली, तेव्हां आतां कोणाकरितां धडपडावयाचें हेंच त्यास उमजेना ! शेवटीं निराश होऊन तो इंग्रजांचे स्वाधीन झाला. त्याचा शिरच्छेद करावा अशी कंपनी सरकारची इच्छा होती, पण आपलें हें कृत्य अत्यंत वाईट दिसेल व आपल्या इभ्रतीस धोका येईल म्हणून जनलज्जेसाठीं कंपनी सरकारनें त्रिंबकजीचा शिरच्छेद करण्याचा आपला बेत रहित केला, व त्यास बंगालमध्यें चुनारगड येथें जन्मठेप कैदेंत ठेविलें. त्याची ९० हजारांची मालमत्ता कंपनी सरकारनें जप्त केली; व ती स्वान्स्टन यास बक्षिस दिली. याप्रमाणें या नररत्नाची ओवाळणी मराठी साम्राज्याच्या पायीं झाली !

स. १८२४-२५ चे सुमारास बिशप हीबर नांवाचा एक विद्वान इंग्रज गृहस्थ हिंदुस्थानांत प्रवास करण्यासाठीं आला होता. प्रवासांत फिरतां फिरतां त्यानें ता. ११-९-१८२४ रोजीं चुनारगडावर त्रिंबकजी डेंगळ्याची भेट घेतली. त्यानें त्याचें वर्णन खालीलप्रमाणें केलें आहेः—

" तुरुंगांत कैद्याच्या कोठडींत त्यास ठेविलें असून त्याच्यावर देशी व युरोपियन अशा दोन्ही लोकांचा कडक पाहरा आहे. त्याच्या निजण्याच्या खोलीस सुद्धां लोखंडी जाळीच्या खिडक्या आहेत. आंतल्या बाजूस थोडीबहुत मोकळी जागा आहे. तेथें लहानशी बाग, एक पिंपळाचें झाड व टुमदार देऊळ आहे. त्यानें चार झाडें लाविलीं आहेत, त्याच्याजवळ चार नोकरचाकर आहेत. आंत-बाहेर जातांना त्यांचा अगदीं कसून झाडा घेण्यांत येतो. त्रिंबकजी लहानसा ठेंगू असून चेहऱ्यावरून तो चिडखोर दिसतो. अंगावर एक रेशमी धोतर अर्धें सोडलेलें व अर्धें अंगावर टाकिलेलें असतें. माझी त्याच्याशीं ओळख करून देण्यांत आली, तेव्हां त्यानें आंत नेऊन देऊळ, बाग दाखविली आणि थोडीं फुलें तोडून मला दिलीं. त्यावर

मीं त्यास म्हटलें ‘तुमच्यासारख्या सुप्रसिद्ध माणसाची भेट झाल्याबद्दल मला फार आनंद वाटतो.’ तेव्हां तो किंचित् हंसून म्हणाला, “ही भेट दुसऱ्या ठिकाणीं झाली असती तर मलासुद्धां आनंद झाला असता.” आज पांच वर्षें तो चुनारगडास आहे आणि मरेपर्यंत आतां तो येथेंच राहणार हें उघड आहे. कंपनी सरकारनें फार मोठा दंड घेऊन मा मुक्तता करावी. मी त्यांची बाजीरावापेक्षां जास्त निष्ठेनें चाकरी क असें विनंति वजा अर्ज त्यानें कंपनी सरकारास वारंवार केले; पण त्य कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्याच्या मताप्रमाणें याचें कारण म्हणजे एल्फिन्स्टन हा होय. तोच त्याचा परममित्र व हाडवैरी असें तो म्हणे. त्यांनींच माझा जीव वांचविला, तेच माझ्या घरादाराची अत्यंत काळजी घेतात; पण मला येथेंच कायमचे डांबून ठेवणारे तेच आहेत, असें त्रिंबकजी म्हणाला. एवढा शूर पुरुष असून त्यास लिहितां वाचतां येत नाहीं (पण हें म्हणणें खोटें आहे. त्यास लिहितां वाचतां येत होतें.) हें आश्चर्य ! तो भजनपूजनांत व नोकरांशीं गप्पा मारण्यांत आपला काळ घालवितो. नोकरांपासून पैन् पै हिशेब घेण्यांत तो दक्ष असतो. एकदां स्वयंपाक्यानें तूप चोरलें तर त्यानें त्याचा फार गवगवा केला.”

चुनारगड येथें कैदेंत असतांच त्रिंबकजी १६-१०-१८२९ रोजीं मरण पावला.

त्याची मुद्राः—श्रीमंत पंत प्रधान चरणीं तत्पर। मल्हारजी सुत त्रिंबकजी डेंगळे निरंतर ॥

त्याच्या मुद्रेप्रमाणें त्रिंबकजी अक्षरशः वागला.



विषयीं आदर वाटतो. नाहीं तर छोटासा संस्थानिक म्हणून त्याला सुद्धां जगतां आलें असतें. बाजीरावाची आणि एल्फिन्स्टनची शेवटली भेट ता. १७ ऑक्टोबरला झाली, त्या वेळीं बाजीरावानें काढलेले उद्गार मोठे मार्मिक आहेत. तो म्हणतो—

"...तुमचे आमचे ऐक्यतेस किती संवत्सरें झालीं, आगमनिगम भूत-...य पाहून तुम्हांशीं ऐक्यता केली. ते समयीं करारमदार, कित्येक ...च्या तजविजी करून रूपास आणावे याचा जिम्मा तुम्ही सर्व प्रकारें करता आजतागाईत काय झालें ह्याचें स्मरण करावें. असें बहुधा प्रकारचें बोलणें त्याचेपुढें ठेवून कुंठित करून बोलणें बंद झालें. इतकें तुम्ही करीत असतां तुमचे मनास मीं कदापि तोडिलें नाहीं. येणेंकरून ऐश्वर्य अथवा जो पदार्थ माझे अंगीं होता तो तेजहीन झाला. मी मूळ मंत्रावेगळा तुमचे करण्यानें झालों जो मी होतों तो आज नाहीं. तुम्ही कशास पुसता! तुमचे स्नेहाची जोड मात्र केली कीं जी कला अंगीं होती ती दवडून बसलों."

यानंतर बाजीराव व इंग्रज यांचें युद्ध होऊन बाजीरावाचा सपशेल पराभव झाला व तो इंग्रजांचें स्वाधीन झाला. बाजीरावाचा अत्यंत विश्वासु स्नेही डेंगळा हा शेवटपर्यंत त्याच्याबरोबर होता; पण आतां आपला अन्नदाता, स्नेही व यजमान इंग्रजांचें स्वाधीन होणार व तसें केल्यावांचून त्यास आतां गति नाहीं असें पाहतांच त्रिंबकजी गैबच झाला (गुप्तच झाला). कोणीकडे गेला याचा कोणास पत्ता लागेना आणि पत्ता लागावा म्हणून तो गेला होता कोठें? त्याच्यासारख्या मानी पुरुषास हें जीवित म्हणजे श्वानसूकरांचें जिणें वाटलें असेल. पण करतो काय बिचारा! दैव फिरलें. पन्नास-साठ किल्ल्यांचा धनी व दहावीस हजार स्वारांचा सेनानी, नेहमीं मनगटासारख्या मिशांस पीळ घालून हिंडणारा पेशवे दरबारचा मानाचा मानकरी पण त्याला दिवाभीतासारखें तोंड लपवून काळोखांत दिवस कंठण्याचा वखत आला. पण आल्या प्रसंगास तोंड देण्याचें त्यानें ठरविलें. पेशव्यांच्या लष्करांतून जी स्वारी नाहींशी झाली ती थेट त्यानें सासूरवाडी गांठली. त्याची सासूर-वाडी म्हणजे अहिरगांव. हा नाशिक जिल्ह्यांत आहे. येथें तो गुप्तपणें राहूं लागला.

ठाण्याच्या किल्ल्यांतून त्रिंबकजी निसटल्यापासून इंग्रजानें बाजीरावाकरवीं व स्वतः त्याला पकडण्यासाठीं जाहीरनामे काढिले, बक्षिसें लाविलीं, पण

त्रिंबकजी असा वस्ताद कीं तो त्यांच्या हातीं लागेना. पण महाराष्ट्रास–किंबहुना अखिल भारतवर्षास लागलेल्या फितुरीचा महारोग या वेळीं-हि नडला. एक स्त्री व त्रिंबकजीचा नोकर इंग्रजास फितुर झाले. त्यांनीं ब्रिग्जला त्रिंबकजीच्या ठिकाणाची माहिती दिली. त्याबरोबर कॅ. स्वान्स्टन हा एक हजार स्वार बरोबर घेऊन अहिरगांवी आला. त्या वेळीं [illegible] त्रिंबकजी सडा होता व आपले अज्ञातवासाचे दिवस कसे त[illegible] होता. तेव्हां इंग्रजांस त्रिंबकजीला पकडण्याचे शूर कृत्य करण्यास [illegible] चढला. त्यांनीं लगेच गांवाची नाकेबंदी केली आणि पहांटे त्रिंबकजी गाढ झोंपीं गेला असताना त्याच्या गळ्याभोंवतीं गळफांस टाकला त्रिंबकजीच्या वाड्यास गराडा घातला. वाडा दोनदां तळघरें-चळदासुद्धां शोधला; पण त्रिंबकजीचा पत्ता लागेना. शेवटी तिसऱ्यांदा मात्र त्रिंबकजीचें दुर्दैव ओढवलें. तो एका बळदांत लोखंडी चोरदाराच्या पलीकडे एक जिना होता त्या ठिकाणीं फरारी होण्यासाठी म्हणून भिंत फोडीत होता. त्यास धरण्यासाठीं म्हणून इंग्रजांचे लोक जाऊं लागले, तों त्यांस एका वीर भालाइतानें अडथळा केला व येणाऱ्या इसमास भाल्यानें ठार करण्याचा त्यानें सपाट चालविला. एकट्या माणसानें तीस असामी ठार केले. हें पाहून स्वान्स्टन घाबरला व या बेहोष माणसास कसे कह्यांत आणावें हेंच त्यास सुचेना. तेव्हा शेवटीं कंटाळून त्यानें त्या पराक्रमी भालाइतावर गोळ्या झाडण्यास हुकूम दिला. आपला प्राण घेण्याकरितां आतां बंदुकींतून गोळ्या सूं सूं करत येणार हें त्यानें पाहिलें; पण त्याची स्वामिनिष्ठा इतकी जाज्वल्य, कीं ह्याचें त्यास कांहींहि वाटलें नाहीं. आपल्यावर सूं सूं करीत येणाऱ्या गोळ्या ह्या प्राणघातक नसून त्यांच्यांत अमृततुल्य संजीवन सांठविलेलें आहे असें त्यास वाटत असल्यामुळें त्याचें आसन थोडें सुद्धां ढळलें नाहीं. तो भिंताडासारखा ताठ होता. त्याला कशाचीहि कदर नव्हती. यजमानाचें रक्षण हेंच आपलें दिव्यनिधान वैकुंठ अशी त्याची भावना होती. टोपीकर इंग्रजांच्या लोकांनीं सोडलेल्या गोळ्या त्याच्या अंतःकरणाचा भेद करून जातांच त्याचा वीर देह खालीं पडला. तो मराठा शेराच्या मरणानें मेला, त्याचें सोनें झालें! त्या पुरुषाला जवळ जाऊन पाहतात तों खरोखरीच आश्चर्य! तो पुरुष नसून पुरुषवेष धारण करणारी स्त्री होती. ती त्या वीर त्रिंबकजीची वीर पत्नी होती! धन्य आहे त्या पतिव्रतेची कीं जिनें